नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
राज्य मराठी विकास संस्था
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका


तुमचे काम लहान असो, मोठे असो....
किर्लोस्कर पंप
मिनिटाला ५००० ग्यालन पाणी खेचणारा, १४ इंची किर्लोस्कर पंप
KIRLOSKAR
तुमची गरज मनाजोगी भागवूं शकतील. कारण त्यांत मिनिटाला ५० ते ५००० ग्यालन पाणी काढणारे अनेक नमुने आहेत. शेतकरी, कारखानदार, घरमालक यांचा या पंपांनीं सर्वत्र विश्वास संपादन केला आहे.
शिवाय लोखंडी नांगर, बैलांनें व पॉवरवर चालणारे उसांचे चरक, शेंगा फोडण्याचीं यंत्रें, रहाटगाडगीं, इत्यादी अधिक धान्यनिर्मितीला उपयोगी पडणारीं यंत्रें करण्यांत किर्लोस्कर कारखानाच हिंदुस्थानांत अग्रेसर आहे, हे तुम्हांस माहीत आहेच. यापैकीं कोणता माल तुम्हांस हवा आहे? त्याचा कॅटलॉग व माहिती मागवा
किर्लोस्कर बंधु लि. किर्लोस्करवाडी (द. सातारा)

अनुक्रमणिका

अनुक्रमणिका



# दीपावली

## १९५०

संपादक:
रॉय किणीकर
चित्रकार: दलाल


• ती भयाण रात्र : साने गुरुजी • नव्या जगाची निर्मिती : मामा वरेरकर • आपण सारे खुनी आहों : वि. स. खांडेकर • सार्वजनिक जीवन : आचार्य अत्रे • भारताचें आर्थिक भवितव्य : पु. शि. रेगे • मला क्षमा कर : वि. वि बोकील • विठ्ठलाचा कानडांतील निवास : अ. का. प्रियोळकर • शेखर, मी चुकल्यें : पं. महादेवशास्त्री जोशी • महाश्वेता : कृ. द. दीक्षित • संगीत हेड क्लार्क : भाऊराव • पशु : शशिकला आळंदकर • चालणारी भिंत : ज. र. आजगावकर • तेथें चल राणी : श्री. बा. रानडे • मी नागिण, तूं केवडा : शांता शेळके • तेलाच्या बाटलीतील माणूस : मनमोहन • तिसरी घंटा : रॉय किणीकर • सीता : अच्युत बर्वे • अमर अश्रू : सौ. मृणालिनी देसाई • निभाव : शामराव ओक • दोन कटोरे : सोपानदेव चौधरी • याला म्हणतात प्रेम : गणेश त्रि. तावे • बा. भ. बोरकर • श्रीकृष्ण दाभोळकर मंगेश पाडगांवकर • योगेश्वर अभ्यंकर • सदानंद रेगे • भालचंद्र खांडेकर • पु. शि. रेगे • शंकर रामाणी • वि. म. कुलकर्णी


* * * * * * * * * * * * * *

### चित्रें :


• उत्कंठिता • नवमल्लिका • परितृप्ता
• पर्युत्सुका • गानमुग्धा • शुक-सारिका




* * * * * * * * * * * * * *


प्रकाशन कार्यालय :
दलाल आर्ट स्टूडिओ
४०-४२ केनेडी ब्रिज
मुंबई ४

प्रकाशन स्थळ :
मौज प्रिंटिंग ब्यूरो
खटाववाडी, गिरगांव
मुंबई ४

संपादक, मुद्रक, प्रकाशक, रॉय किणीकर


अनुक्रमणिका



'दीपावली'चा हा सहावा अंक आहे. म्हणजे यंदां दीपावलीला सहावें वर्ष लागलें.

गेल्या पांच वर्षांत 'दीपावली'नें वाचकांना काय दिलें आणि काय नाहीं याचा विचार करावयाचें कारण नाहीं. दीपावलीची मूळ कल्पना तें एक आदर्श वाङ्मय-वार्षिक व्हावें अशी होती. ती आजहि कायम आहे. परंतु दरवर्षी मनाप्रमाणें सगळ्याच गोष्टी जुळत नाहींत; मधेंच कांहीं ना कांहीं अडचणी येतात आणि मग संकल्पित रूपरेषा बाजूला राहून शेवटी एकदाचा कसाबसा अंक बाजारांत येतो. आमच्याप्रमाणेंच इतर दिवाळी अंकांचेंहि होत असावें.

'दीपावली'चें स्वरूप नेहमीच्या दिवाळी अंकाहून निराळें ठेवावें यासाठीं दरवर्षी आम्ही कांहीं तरी नवें देण्याचा प्रयत्न करीत आलों आहोंत. मराठींत वाङ्मय-वार्षिक काढण्याची पहिली कल्पना आमचीच. त्या पहिल्या अंकांत राजकीय, सामाजिक, आर्थिक आणि वाङ्मयीन सिंहावलोकन देतां आलें पण पुढें तें जमलें नाहीं. तें तसें पुढें जमलें नाहीं तरी त्या त्या वर्षांतल्या उत्कृष्ट ठरतील अशा सुप्रसिद्ध आणि अप्रसिद्ध लेखकांच्या लघुकथा, एकांकिका, विनोदी लेख, कविता आणि हास्यचित्रें आम्हीं दिलीं. भरपूर तिरंगी चित्रें आणि अंकाची कलात्मक सजावट हें तर जवळ जवळ दीपावलीचें वैशिष्ट्यच ठरलें आहे. या वर्षी ऑफसेट पद्धतीनें छापलेली सहा अष्टरंगी चित्रें देऊन आम्ही आता एक नवीनच पायंडा पाडीत आहों. आमचे परम स्नेही 'बॉम्बे फाईन आर्ट प्रेस'चे श्री. रामनाथ मदन यांच्याशीं त्या बाबतींत पहिले बोलणें होईपर्यंत ऑफसेटचीं चित्रें देणें किती खर्चाचें आणि जिकिरीचें आहे याची आम्हाला पूर्ण कल्पना नव्हती. परंतु श्री. रामनाथ हे मनानें खरे कवि आणि रसिक आहेत. आमची इच्छा आणि अडचण त्यांनीं लगेच ओळखली. आणि त्या भल्या दुपारीं त्यांचा टेलिफोन आला—आराम करून देऊं तें काम—देणें घेणें नंतर पाहूं—या निमित्तानें का होईना 'मराठींतल्या दिवाळी अंकांत एक "सेन्सेशन" तरी होऊन जाईल!

सेन्सेशन होवो न होवो पण या वर्षीची दीपावलींतलीं चित्रें वाचकांना आवडतील, आणि तीं संग्रहीं ठेवावीशीं वाटतील अशी आम्हाला खात्री वाटते पण हें सर्व श्रेय, बॉम्बे फाइन आर्ट प्रेसचे मालक भय्यासाहेब धोटे, प्रेसचे सूत्रधार डॉ. धाटे आणि प्रेसचे 'कारभारी' श्री. रामनाथ मदन या सर्वांना आहे. म्हणूनच त्यांचे आम्ही पहिल्यांदा आभार मानतो.

चित्रांच्या तोडीला तोड म्हणून कीं काय यंदा दीपावलीची सर्व छपाई सुद्धां सर्वांगसुंदर आणि उत्कृष्ट झाली आहे. त्याबद्दल मौजेच्या भागवत बंधूंचे आभार मानणें म्हणजे नदीतल्या ओंजळीनें नदीलाच अर्घ्य दिल्यासारखें होणार आहे. मौज प्रिंटिंग ब्यूरोचें हें सहकार्य आतां दरवर्षी आम्हाला मिळणार आहे ही आनंदाची बातमी येथें मुद्दाम नमूद करावीशी वाटते.

डी. डी. नेरॉय आणि कंपनीचे श्री. डी. डी. नेरॉय, बॉम्बे प्रोसेसचे श्री. कामत, शंकर आणि कंपनीचे श्री. विष्णुपंत कदम, या सर्वांचेहि आभार मानणें आवश्यक आहे. निकड ओळखून कमीत कमी वेळांत पिन्‌पॉइंटचे सफाईदार ब्लॉक्स करण्यांत या तिन्ही कंपन्यांचें श्रेय आहे. तें कांहीं खोटें नाहीं. पुण्याच्या रा. ज. देशमुख आणि कंपनीचे श्री. रामभाऊ देशमुख आणि मुंबईच्या 'फोनोफोटोग्रॉफिक्स'चे सूत्रधार श्री. भाऊसाहेब कुलकर्णी यांचें पहिल्यापासून 'दीपावली'वर प्रेम आहे. दीपावलीसाठीं एखादी गोष्ट हवी आहे एवढें समजलें कीं पुरे मग हे दोघेहि पडेल ती दगदग सोसून हंईल ती धावपळ पत्करून ती पुरी केल्याखेरीज राहावयाचे नाहींत.

आतां शेवटीं 'टॉम अँड बे.'(ॲडव्हरटायझिंग) लि.चे मॅनेजिंग डायरेक्टर श्री. तांबे यांचे आभार मानणें अप्रशस्त दिसत असलें तरी ते आम्ही मानतों. कारण दीपावलीच्या जाहिरातींचे टॉम अँड बे (ॲडव्हरटायझिंग) लि. हे सोल एजंट आहेत; परंतु त्यांचे नि आमचे संबंध तसे अगदीं व्यापारी स्वरूपाचे नाहींत; ते जिव्हाळ्याचे आहेत. महाराष्ट्रांतील 'टॉम अँड बे' ह्या जाहिरातसंस्थेनें गेल्या तीन वर्षांत एकदम चढत्या श्रेणींत मिळवलेलें अग्रेसरत्व वृत्तसृष्टींत असलेल्या सर्वांनीं मान्य केलें आहे याचें कारण श्री. तांबे यांचा अदम्य उत्साह आणि आशावाद हें होय.

शेवटीं पुढच्या वर्षीची एक नवी योजना जाहीर करून हें 'संपादकीय' संपवितों. पुढच्या वर्षी 'दीपावली'ची गुजराती आवृत्ति काढायचें आम्ही ठरवीत आहों. मराठींतून प्रसिद्ध होणारें वाङ्मय भारतांतील दुसऱ्या कुठल्याहि भाषिक वाङ्मयाहून श्रेष्ठ नसलें तरी तें किती निराळें आणि वैशिष्ट्यपूर्ण आहे याची त्यामुळें गुजराती वाचकांना कल्पना येईल. आणि शेजारच्या दोन प्रांतांतले स्नेहसंबंध अधिक दृढ होतील, असलेले गैरसमज दूर सरतील. खेरीज कै. पूज्य साने गुरुजींच्या प्रांतभारतीच्या कार्यालाहि हा छोटासा हातभार लावल्यासारखें होणार नाहीं काय?

असो. शेवटीं या अंकांत प्रसिद्ध झालेला 'नव्या जगाची निर्मिती' हा लेख, 'सगीत हेड क्लार्क' आणि 'तिसरा घंटा' (मूळ प्रत) या श्रुतिका छापण्याची परवानगी दिल्याबद्दल ऑल इंडिया रेडिओ स्टेशनचे केंद्राधिकारी यांचे खास आभार मानून आणि 'दीपावली'चे असंख्य वाचक, विक्रेते; जाहिरातदार आणि मान्यवर लेखक यांना ही दिवाळी सुखाची आणि समृद्धीची जावो अशी इच्छा व्यक्त करून हा मजकूर पुरा करतो.

—संपादक



आजवर हृदयाशीं धरलेल्या
सर्व आशा आकांक्षा का
एवढ्या क्षुद्र परिणामांत
धुळीला मिळणार ?...

# ती भयाण रात्र!

> कै. पूज्य साने गुरुजी यांनीं लिहिलेली
> अखेरची एक अप्रसिद्ध चिंतनिका

जिच्यांत मी सारखा कणा—
कण नं क्षीण होत चाललों आहे
अशी ती चौदावी रात्र !

या जीवनानें आत्म्याला जन्म द्यावयाचा आहे, जीवनाच्या उच्चतर स्थितीचा अनुभव द्यावयाचा आहे, दिव्यतेचा विकास करावयाचा आहे. आपल्यांतील क्षुद्रतेला मागसाळवलें पाहिजे, मोह जिंकले पाहिजेत—जडाला चिन्मय केलें पाहिजे, दुःखाला सुख केलें पाहिजे; आपण जीं जीं कर्में करूं त्यांत बुद्धि, विचार, सदसद्विवेकबुद्धि, न्याय, औदार्य हीं आणलीं पाहिजेत. ज्याप्रमाणें अग्नि जीवन व प्रकाश देतो त्याप्रमाणें या गुणांनीं या शरीरानें होणाऱ्या कर्मांत जीव ओतला पाहिजे. आंधळा, लोभी, स्वार्थी असा जो मानवी स्वभाव, तो जाऊन मानवानें सुंदरतेचा, अभेदवृत्तीचा पोशाख घातला पाहिजे. या जगावर एवढ्याचसाठीं आपण आहोंत—ही जादू आपण साधूं, ही किमया आपण साधूं तर जन्माला आल्याचें सार्थक. हें मानवाचें ध्येय आहे, सद्भाग्य, वैभव आहे.

सुखाचा त्याग करून कर्तव्याचाच एक विचार करणें, आपल्या भावनांच्या ऐवजीं सदसद्विवेकबुद्धीस स्थान देणें, हें आत्मशुद्धीचें रहस्य. यांत एक प्रकारची भव्यता असते. आपल्यांतील क्षुद्रता मागें सरकते, परंतु आपल्यांतील संदेश कर्तव्यापुढें मान वांकवतो. या जगात आपणांस न्याय मिळेल अशी आशा राखणें हें रड्या वृत्तीचें लक्षण आहे. जगानें न्याय न दिला तरी त्याच्याशिवाय आपण पुढें गेलें पाहिजे. अशा स्वतंत्र वृत्तींतच खरा मर्दपणा आहे. जगानें आमच्यासंबंधीं वाटेल तें मानावें, तें जगाचें काम आहे. जी न्याय्य दृष्टीनें आमची जागा आहे, ती जर जग आम्हांस देणार नसेल आम्ही मरेपर्यंत किंवा आम्ही मेलों तरीही देणार नसेल, तरीही जग योग्य वागत असेल असेंच समजावें. आपलां देश कृतज्ञ आहे, हें जग न्यायी आहे, जगांतील मतें निर्मळ व स्वच्छ आहेत,

जीवन सत्य व न्याय्य आहे, मानव सारे चांगले आहेत, या श्रद्धेनें आपण वागणें हें आपलें काम आहे.

मरणापेक्षां मला शरमेची भीति अधिक वाटते असें दिसतें. स्वेच्छेनें जरी झालें तरी परावलंबन तें परावलंबन. मला तें ओंगळच वाटतें. कोणत्याही स्वार्थी हेतूनें माझी वर्तणूक—माझें जीवन निश्चित व नियमित व्हावें, दुसऱ्याच्यासाठीं स्वतःला आळा घालणें, कोणत्याही इच्छाशक्तीचा गुलाम होणें यांची मला लाज वाटते. पोकळ अभिमान म्हणजे मला दास्य व गुलामगिरीच वाटते; आत्मश्लाघा व आत्मप्रीति अधःपात करणारी आहेत; केवळ उपयुक्ततावाद म्हणजे नीचपणा व क्षुद्रपणा आहे. कोणा व्यक्तीच्या किंवा एखाद्या स्वार्थी हेतूच्या आहारीं आपण जाणें, त्यांची पूजा करणें ही आकांक्षा मला तिरस्करणीय व त्याज्य वाटते. स्वतःचा स्वामी होण्याची फक्त माझी इच्छा आहे.

मला जर आरोग्य असतें तर अत्यंत स्वतंत्र व स्वावलंबी मी झालों असतों. माझ्याइतका स्वतंत्र मग कोणी नसता. पण स्वाश्रयी व स्वावलंबी व्हावयास थोडेंफार हृदयही कठीण करावें लागेल हेंही खरें.

मला अतिशयोक्ति करायची नाहीं. माझें स्वातंत्र्य हें अभावात्मक, निषेधार्थी आहे. माझ्यावर कोणाची सत्ता नाहीं, परंतु अनेक गोष्टी मला अप्राप्य राहिल्या, त्या मी मिळवूं शकलों नाहीं; त्या वस्तूची जर मी इच्छा करण्याइतका मूर्ख झालों तर माझ्या जीवनाच्या मर्यादा लगेच उघड्या होतील. म्हणून मी वस्तूंची इच्छा धरीत नाहीं; माझे विचार त्या वस्तूंवर मी खिळूं देत नाहीं. मन त्या वस्तूपासून दूर खेंचून घेतों. जें मला शक्य आहे, त्याचीच मी इच्छा करतों आणि यामुळेंच मी भिंतीवर जाऊन आपटत नाहीं; माझ्याभोंवतीं ज्या मर्यादा आहेत त्यांची जाणीव मला रहात नाहीं. माझ्याभोंवतीं भिंती आहेत याची मला ओळखही जणुं नसते. कारण मला कोठें जावयाचेंच नसतें. माझी शक्ति मिळवूं शकेल त्यापेक्षांही कमीची मी इच्छा करतों, माझ्या मार्गांत कांहीं अडथळे व अडचणी जर असतील तर त्यांचें स्मरण न व्हावें म्हणून फार थोड्यावर मी तृप्त रहातों. ज्याला आपली मान वर राखायची आहे, ज्याला स्वाभिमान राखायचा आहे, कोणाचेंही मिंधें व्हावयाचें नाहीं, त्यानें निःस्पृह, निरिच्छ व्हावें, संन्यास घ्यावा. आपले कपडे, आपल्या वस्तू दुसऱ्यानें ओढून नेऊं नयेत असें वाटत असेल तर आपणच काढून ठेवावे व दुसऱ्याचा हात आपल्या अंगास लागूं देऊं नये. ज्यानें स्वेच्छेनें आपल्या जीवनावर पाणी ओतलें आहे, तो मृत्यूला भीत नाहीं, मरणाकडे शांतपणें पाहतो; मृत्यु आला

तेरी जास्त काय माझ्याजवळून घेणार ? वासना सोडा व भूतदयेचा अभ्यास करा, पावलोपावलीं प्रेम करा हा बुद्धांचा मार्ग आहे, निर्वाणाचें—त्या परमशांतीचें तें रहस्य आहे.

काळोख पडत आहे व माझ्या छातींत दुखत आहे. मी आतां या नशिबावर व ईश्वरावर अवलंबून आहें. मनुष्याच्या लहरीवर मात्र अवलंबून नाहीं. मी सृष्टि व ईश्वर यांच्या हातांतील खेळणें आहे परंतु मनुष्याच्या वासनांचें, लहरींचें खेळणें नाहीं ही गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे. हें तत्त्व सोडता कामा नये, मनुष्याचें मिंधें होणें नको. हें खरें आहे कीं केमिस्ट चूक करून विष देऊन मला मारील, बँकेचें दिवाळें निघून मी भिकारी होईन; ज्याप्रमाणें भूकंपानें माझें घर धुळींत मिळेल व त्याविरुद्ध कांहीं करतां येणार नाहीं, त्याप्रमाणें मनुष्यही माझ्या बाबतींत कांहीं गोष्टी चुकीनें करील व त्याला इलाज नाहीं हें खरें. म्हणून केवळ स्वावलंबन, केवळ स्वतंत्रता ही एक भ्रांत कल्पना आहे. परंतु सापेक्ष—जितकें मिळणें शक्य आहे तेवढें तरी मला स्वातंत्र्य आहे ना ? आपल्या हृदयाच्या—अंतरंगाच्या किल्ल्यांत जाऊन बसणारा यति—जो सर्व दरवाजे बंद करून स्वतःच्या आत्ममंदिरांत बसून बाहेरचे आघात सहन करतो—त्याप्रमाणें मी आहें.

" ईश्वराला शरण जा, चिन्मयाला शरण जा, जडाचा गुलाम होऊं नकोस. " हाच माझा आदर्श आहे.

जगांत असद्भाव आहे, दुष्टपणा आहे, कृतघ्नता आहे, बेपर्वाई आहे म्हणून मनांत रडत बसणें, खिन्न होणें हा दुबळेपणा आहे; ह्या दुबळेपणाकडे मी अनेक वेळां झुकतों. दुसऱ्यानें आपल्याबद्दल उगीच गैरसमज करून घेतला, दुसऱ्यानें आपल्यासंबंधीं वाईट मत दिलें, अन्यायानें आपल्यासंबंधीं अभिप्राय दिला तर मला फार वाईट वाटतें. मर्दपणा, वीराचें कठोर हृदय—पर्वताची छाती—ती मजजवळ नाहीं. असावयास पाहिजे त्यापेक्षां फारच जास्त हृदय कोमल व हळुवार झालें आहे. इतका दुबळेपणा काय कामाचा ? परंतु ह्या बाबतींत प्रयत्नानें मी अधिक टणक होत आहें असें मला दिसून येत आहे. पूर्वीइतका खिन्न मी होत नाहीं हें खरें. जगाच्या दुष्टपणानें पूर्वीइतका अस्वस्थ व खिन्न आतां मी होत नाहीं. हा तत्त्वज्ञानाचा परिणाम का वयाचा परिणाम ? का माझ्यावर प्रेमही कांहीं करतात, कांहींच्या मनांत मजबद्दल आदर व पूज्यभाव आहे, थोडेतरी मला मान देतात, असें दिसून आल्यामुळें हा परिणाम झाला ? माझ्यांत स्वाभिमान उत्पन्न व्हावयास, आत्मविश्वास निर्माण व्हावयास, मी



## रे महान जीवना !

उभारुनी नभाप्रती मदीय बाहु मी उभा
अधीरलों विलोकण्या हिरण्मया तुझी प्रभा
घडींतुनी निघून चालली युगें तुझ्याविना
उरांत श्रांत मी म्हणून रे महान जीवना !
पिशापरी असीम मी तुझ्या भ्रमांत गुंगुनी
अखण्ड हिंडलों कधीं जनांतुनी वनांतुनी
लंघिलीं अनन्त योजनें कधीं धरेपरी
तुझाच ठाव घेतला नगावरून सागरीं
तुझ्याच कारणें असे अमाप व्याप साहिले
स्वप्नि, संभ्रमीं, तुझें अपूर्व रूप पाहिलें
मनीं मुखीं तुझ्या ऋचा तुझीच नित्य अर्चना
परन्तु राहिली उरांतली अपूर्ण कामना !
नभ तुनी निळ्या तुझाच वर्षते विशीलता
प्रभा ज्वलंत भासते तुझी, रवी प्रकाशतां
समीर आणितो कधीं तुझ्या अगम्य चाहुली
क्षमेचिया उरीं स्फुरे तुझा सदा स्वरावली !
प्रसादचिन्ह देखिलें कधीं तुझें जगांत मीं
जनांचिया व्यथेमुळें मनी कुणी भेदा श्रमी
कुणी अपार कष्टतां तृषार्त शान्तवावया
अमोल आंसवांत त्या मला दिसे तुझी दया !
मी तुझ्या झळाळत्या द्युतींत काजळीपरी
तुझाच स्पर्श वाहतों विनम्र या शिरीं उरीं
झुरे परी शरीर पंजरांत जीव-पांखरूं
स्वकीय दर्शनाविना कसें तयास सांवरूं ?
प्रकाशमंडलीं तुझ्या अधीर मी विरावया
खगापरी दिगन्त धुंडितों तुलाच गावया
स्पर्शुनी शिरास सोनपावलीं महामना !
गौरवीन ये जिवास रे महान जीवना !

—मंगेश पदकी

# जाहिरातींसाठीं

## विषय अनेक असूं शकतील !

पण कोणत्याही मालाची प्रसिद्धी कुठल्याही प्रकारानें आम्ही करूं शकतो. मालानुरूप जाहिरात-प्रकारांचें वर्गीकरण आणि खर्चाचें पद्धतशीर अंदाजपत्रकें करण्यामधील आमचा अनुभव मोठा आहे.

पद्धतशीर प्रसिद्धि केल्यानें मालाचा खप वाढून वार्षिक विक्री वाढते असा सर्वत्र अनुभव आहे. तेव्हां जाहिरात नियमितपणें करणें पर्यायानें हितावह आहे.

टेलिफोन नं. २६८०

卐

—तारेचा पत्ता—

"ALAMODE"

वर्तमानपत्रें ० होर्डिंग्स ० पोस्टर्स
सिनेमा ० स्लेंइज् ० ट्रॅमवेज्
० कमर्शिअल डिझाइन्स ० ब्लॉक्स

व

—— आर्ट प्रिंटिंग ——




श्री. शंकरराव किर्लोस्कर यांच्या स्वाक्षरीनिशीं मिळालेलें प्रशस्तीपत्र

## WE GIVE TEN BIG NAMES FROM OUR LEDGER

(1) OGALE GLASS WORKS LTD.
(2) KIRLOSKAR BROTHERS LTD.
(3) KIRLOSKAR OIL ENGINES LTD.
(4) MYSORE KIRLOSKAR LTD.
(5) DECCAN ENGINEERING LTD.
(6) SWASTIK RUBBER PRODUCTS LTD.
(7) SHAHU ARYAUSHADHI KARKHANA LTD.
(8) BRIHAN MAHARASHTRA SUGAR SYN. LTD.
(9) HAND MADE PAPER LTD.
(10) G. G. DANDEKAR MACHINE WORKS LTD.

**WHY YOUR'S IS NOT, WE DO NOT UNDERSTAND ?**

# टॉम अ‍ॅन्ड बे (अ‍ॅडव्हर्टायझिंग) लि.

१०७ सदाशिव पेठ, लक्ष्मी रोड, पो. बॉ. नं. ५७४, पुणें २.



त्रिखंड हिंडुनि धुंडितसे
न परि हरपलें तें गवसे
हरपलेल्या स्मृतींना
चिरंजीव करण्यासाठीं
श्री. के. व्ही. कुबल जी.डी.(आर्ट)
यांचा
हिंदमाता फोटो स्टूडिओ
लालबाग ट्राम टर्मिनस, मुं. १२
आणि
प्लाझा सिनेमा समोर, दादर, मुंबई
हे दोन्ही पत्ते तुमच्या दैनंदिनींत लिहून ठेवा.

नालायक असूं लायक आहे हें वाटण्यास, पूर्वींच असें थोडें प्रेम मला मिळतें तर, पूर्वींच हा उत्साह मला लाभता तर, पूर्वींच माझी पाट थोडी थोपटली गेली असती तर? याचीच मला सदैव तहान होती. मला ओलावा पाहिजे होता. ओलावा न मिळाल्यामुळें बी जळालें असें वाटूं लागतें कीं आपणांत वृक्ष निर्माण करण्याची, पानें, फुलें निर्माण करण्याची शक्तीच नाहीं. मी म्हणजे क्षुद्र व कुचकामाचा आहें, माझे सर्व प्रयत्न निरुपयोगी आहेत असेंच मला सदैव वाटलें असतें. परंतु थोडाथोडा धीर मिळत गेला. जो हळुवार व कोंवळ्या मनाचा आहे, त्याला यशाची आवश्यकता असते, उत्साह-उत्तेजनाची जरूरी असते. स्तुति हीसुद्धां नैतिक उत्तेजन आहे; मनुष्याच्या सत्कृत्याची स्तुति केल्यानें तो आणखी सत्कृत्यें करावयास प्रवृत्त होतो. मनुष्याची वाढ होत आहे तोंपर्यंत या गोष्टींची जरूर आहे. रोपा नीट वाढीस लागेपर्यंत स्तुति व उत्तेजनाचें पाणी घातलेंच पाहिजे. आपलें कौतुक होणें म्हणजे एक बळ देणारें अमृत आहे. आपण स्वतःला जाणतों असें आपणांस वाटत असतें, परंतु जोंपर्यंत तुलनात्मक स्वतःची किंमत आपणांस माहीत नसतें, समाजात आपलें स्थान कोणतें हें जोंपर्यंत आपणांस माहीत नसतें, तोंपर्यंत स्वतःचें नीट ज्ञान-स्वतःची नीट ओळख आपणास होत नाहीं. जर आपणांस नीट काम करावयाचें असेल, तर आपल्या बरोबरचे लोक आपणांबद्दल काय म्हणतात तेंही ध्यानांत घेतलें पाहिजे. बरोबरच्या लोकांस तुच्छ मानून चालणार नाहीं. त्यांच्याही मताला मान दिला पाहिजे. आपणांस काहींचा पाठिंबा आहे, आपल्यावर विश्वास व श्रद्धा आहे ही जाणीव असल्यानें आपण आपल्या मार्गांतल्या विरोधांस तोंड देतों, अडचणींना तोंड देतों. यामागील आधाराच्या जोरावरच आपण संकटें पाहून पळत नाहीं. जोंपर्यंत आजूबाजूच्या जगाच्या मताला आपण तुच्छ मानतों, तोंपर्यंत स्वतःचें मोजमाप करावयास आपणांस नीट माप, चांगलें प्रमाण मिळालें आहे असें नाहीं. आपली सापेक्ष शक्ति आपणांस कळत नसते. मी लोकांच्या मताला आजपर्यंत तुच्छ मानीत आलों, तरी माझ्या बाबतींत जर कोणीं अन्याय केला, तर मात्र माझें हृदय दुखावल्यावांचून रहात नसे. हे माझे जे दोन-दोष त्यामुळें माझें फार नुकसान झालें आहे. जगांत प्रेम, सहानुभूति, न्याय मिळावा म्हणून मी उत्सुक होतों, परंतु अभिमानामुळें मी त्याची मागणी केली नाहीं; तीं मिळवावयास मीं प्रयत्न केला नाहीं, त्यांचा नीट विचार केला नाहीं, अंदाज केला नाहीं.........मी अगदींच चुकलों असें मला वाटत नाहीं, कारण मी माझ्या हृदयाशीं व सदसद्विवेकबुद्धीशीं शक्य तितक्या अविरोधानें राहिलों; तरी पण जगाशीं मला जमवून घेतां आलें नाहीं याचा रागाच्याच उगीच खेद मनाला होतो. कारण नसत ही यामुळें मी खिन्न होतों. आता मन शांत झालें आहे, परंतु आतां कारकीर्द खलास होत आली आहे, भविष्य संपलें आहे, शक्ति क्षीण होत आहे, जीवन मरणाजवळ आलेलें आहे.

या सर्व गोष्टींकडे आतां मी केवळ इतिहास म्हणून पहात आहें

*   *   *

रात्र भयंकर गेली; आणि आज सकाळीं कफ तर फारच त्रास देत होता. जीवनाची मृत्यूशीं दोस्ती नाहीं, आप्तपणा नाहीं. यामुळें एक आशा आपल्या हृदयांत, सर्व शास्त्रें विरुद्ध आहेत तरी, सदैव उत्पन्न होत असते. ही अमर जीवनाची आशा बुद्धीला त्रास देत असते. जीवन चिकाटीचें असतें, तें सोडीत नाहीं आपला आशातंतु.

२

आपली बुद्धि सांगत असते कीं खेळ खलास झाला. परंतु देह तर अजून जगूं पहात असतो. मरण येईपर्यंत मरणाला तो मानणार नाहीं. परंतु हार्वे वाईट वाटावयास नको. निसर्गाची ही इच्छा आहे कीं जीवनानें मृत्यूशीं झगडत रहावें. आशा म्हणजे जीवनावरचें प्रेम. या आशेचें धड रक्षण करीत असणें. कोणाला माहीत? ईश्वर कदाचित् आपणांस वांचवील्ही, एखादा चमत्कार करीलही. शिवाय, सर्व उपाय हरलेच असें आतां नक्की ठरविण्याचा कोणता मार्ग आहे? हा दुबळा मर्त्य जीव प्रत्येक आधाराला धरूं पहातो, काडीलाही चिकटूं पहातो. परंतु असें करतो म्हणून त्याच्यावर कां रागवावें? कितीही साहाय्यक व मदत मिळालीं तरी खिन्नता, दुःख कमी होतात असें नाहीं. सर्व गोष्टींत ईश्वराची इच्छा पहावयास शिकणें हाच परमश्रेष्ठ मार्ग आहे, हाच खरा उपाय आहे. त्याच्या इच्छेपुढें मान वांकवणें व सर्व दुःखें सहन करणें हेंच आपलें काम. या मानवजातीचें भवितव्य ज्याच्या हातांत आहे, त्याच्या पायावर स्वतःचें बलिदान देणें हाच मार्ग आहे. शिपायाला जो हुकुम मिळतो त्याप्रमाणें तो वागतो. त्याला कुरकुर माहीत नसते. तो आज्ञा पाळतो व एक शब्द न काढतां मरतो. स्वतःच्या बलिदानाचा उपयोग काय हें समजून घ्यावयास जर तो थांबला, तर आज्ञा कशी पाळतां येईल?

आपणांस परस्परांचीं दुःखें किती कमी कळतात! त्या मृत्यूजवळ आपण जी बोलाचाली करूं लागतों, ती आपल्या अत्यंत जवळच्या व प्रेमाच्या माणसासही समजत नाहीं. कांहीं विचार असे असतात जे कोणाला सांगतां येत नाहींत, सांगावेसें वाटतही नाहीं. अशीं कांहीं दुःखें असतात कीं जीं स्वतःलाच फक्त भोगावीं लागतात, त्यांत कोणाला भागीदार करतां येत नाहीं, तीं दुसऱ्याजवळ खोलून दाखवतां येत नाहींत, हलकीं करतां येत नाहींत. दुसऱ्यांचा विचारच आपणांस हीं दुःखें लपवावयास लावतो. मी मरणार आहें ही गोष्ट माझ्या प्रिय माणसांस मी कोणत्या तोंडानें सांगूं? आपण एकटेच स्वप्न पाहातों, एकटेच दुःख भोगतों, आपण एकटेच मरतों, शेवटची कबर—तिच्यांतही एकटेच जाऊन पडतों. परंतु आपला एकान्त ईश्वराजवळ आपण भंगवितों. आपलें हृदय त्याच्याजवळ खुलें करतों. ईश्वराजवळ बोलण्याला कोण प्रतिबंध करणार? कोणाला तें ऐकूं जाणार? कळणार? आत्मगत भाषण मग संवाद होतो; आखुडीचें पर्यंतात, शांततेंत पर्यवसान होतें; त्याग सुखकर होतो, वाटतो, समाधान देतो; आपल्या पराजयाचें जें दुःख तें जाऊन आपण पुन्हा स्वतंत्र आहोंत, मुक्त आहोंत असें वाटूं लागतें. परस्परविरुद्ध गोष्टी कोणाला चुकवतां येतील; परंतु एकदां जगांतील वस्तूंचें स्वरूप पाहिलें, विश्वाच्या रचनेचें रहस्य ओळखलें, व तिच्यापुढें मान वांकवली कीं मग गडबड नाहीं, कांहीं नाहीं.

मोठी वाईट रात्र. उदासीन सकाळ. माझ्यासमोर असलेलीं तीं डॉक्टरचीं औषधें—त्यांचा आतां माझ्यावर परिणाम होईनासा झाला आहे. मोठ्या कष्टानें व केविलवाणेपणानें मी माझ्या जीवनाचा सारखा होत असलेला ऱ्हास पहात आहें. मृत्यूपासून सुटका काय केल्यानें होईल? सारख्या द्याव्या लागणाऱ्या झगड्यानें—अखंड कराव्या लागणाऱ्या धडपडीनें मी अगदीं विटून गेलों आहे—कंटाळलों आहें.

निरुपयोगी व अखंड झगडा म्हणजे आपल्या स्वाभिमानाचा तेजोभंग होय. सिंहाच्या भोंवतीं भुं भुं करणारी माशी, तें लहानसें मच्छर, त्याला आपल्या सर्व शत्रूंत असह्य होतें; तसेंच सर्वसामान्य माणसाला या अखंड चालणाऱ्या झगड्यांत होतें. पण जो आध्यात्मिक प्रवृत्तीचा मनुष्य असेल दैवी भावनेचा जो असेल, त्यानें शांतीचा व निरंतर सहिष्णुतेचा, दुःख सहन करण्याचा मंत्र शिकला पाहिजे. जें अपरिहार्य आहे, जें टाळतां न येण्यासारखें आहे, ज्याच्याविरुद्ध इलाज चालत नाहीं, जें मानलेंच पाहिजे, जें मानल्या शिवाय सुटका नाहीं, तें सर्व म्हणजे देवाची इच्छा, प्रभूची इच्छा होय. आपल्या हातीं असतें—पसंत करणें आपल्या स्वाधीन असतें—आपल्या कक्षेंत असतें, तर आपण दुसऱ्याच कोणत्या गोष्टींची निवड केली असती, पण आपणांस जें कांहीं नेमून दिलें आहे, जें आपल्या नियतीनें ठरवून दिलें आहे, जें आपल्या कपाळावर लिहिलें आहे तेंच मानणें, त्याचा स्वीकार करणें हें आपलें कर्तव्य आहे.

साराच विरस–कंटाळवाणेपणा–निरुत्साह. माझें हृदय सारखें मंदावूं लागलें आहे, थंड होऊं लागलें आहे. तरी पण केवढी प्रेमपूर्ण चिंता, किती कोमलता माझ्याभोंवतीं भरून राहिली आहे!.....पण निरोगी शरीराशिवाय इतर सर्व गोष्टी असल्या तरी कोण काय करूं शकणार? त्या सर्वांचा मला काय उपयोग? ज्या सर्व हालअपेष्टा सहन कराव्या लागल्या त्यांचा त्याला काय उपयोग झाला? त्यांनीं त्याची हिंमत वाढविली, सहनशीलता शिकविली; त्यांनीं त्याची शरणागति घडवून आणली.

जाऊं द्या. मला विसरूं द्या आतां स्वतःला. माझ्यावरील ही सारी उदासीनता आतां मला फेंकूं दे, या साऱ्या चिंतेंतून व काळजींतून मुक्त होऊं दे. जें जें कांहीं गेलें आहे, भूतकाळांत जमा झालें आहे त्याचा विचार न करतां अजून यापुढें जें जें मला आहे, गमवावें लागेल त्याचा विचार करूं दे. मला माझ्या जीवनांत ज्या ज्या कांहीं सवलती मिळाल्या–जीं जीं कांहीं सुखें मला मिळालीं त्यांचा मला आतां आस्वाद घ्यावयाचा आहे, व माझ्या वाटेला आलेल्या त्या परमेश्वरी कृपेस व प्रसादास मी पात्र होण्याचा प्रयत्न करावयाचा आहे.

हें दुबळें जीवन अतिशय विषयी व विलासी असतें. गेले पांचसहा आठवडे मी कांहींच केलें नाहीं; मी फक्त सारखा वाट पहात व माझी स्वतःची शुश्रूषा करीत होतों; आणि ह्याचा किती कंटाळा येतो माणसाला! मला कांहीं हवें असेल, ज्याची मला तहान आहे—तर तें म्हणजे कर्म होय. कामामुळेंच जीवनाला सुवास येतो, जीवनांत रंग भरतो. कर्माशिवाय व ध्येयाशिवाय जगणें—ध्येयहीन व कर्महीन जीवन म्हणजे भिकारडें जीवन. आळस म्हणजे ग्लानि व शैथिल्य, व शैथिल्यानें शेवटीं विरस व कंटाळा उत्पन्न होतो. शिवाय पुनः वसंतऋतु आला आहे, संदिग्ध इच्छा, उदासीन विमनस्कता, अंधुक आकांक्षा व निष्कारण सोडावे लागणारे निःश्वास यांचा जणुं तो हंगाम—यांचा ऋतु. आपण चांगले जागे असतांनाही स्वप्नांत रमतों त्या वेळीं. आपल्याला ज्याची कल्पना नसते, जें अज्ञात व अनवगत असतें त्याचा आपण संदिग्धतेनें [illegible] करीत असतों. त्या वेळीं ज्याला नांवगांव नसतें, जें नामरूपहीन असतें त्याला आवाहन करीत असतों; मात्र तें मरण किंवा दुःख असावयास नको.

मला आतां कांहीं करण्याची शक्ति उरली नाहीं; आतां जगणें मला कठीण वाटूं लागलें आहे. कांहीं थोडा काळ आपल्या मित्रांस दूर जाऊं देण्यास बरें वाटणें शक्य आहे; हा अनुभव आपणां सर्वांना परिचित असतो; पण नंतर...? जे चैतन्यमय आहेत, जिवंत आहेत, सजनशील आहेत त्यांना कायमची जागा करून देणें त्यापेक्षां कितीतरी चांगलें वाटतें.

मला जगण्याविषयीं आतां अनास्था वाटते असें का आहे? मला वाटतें, असें नाहीं. ज्याची मला तहान आहे, तें आरोग्य, निरोगीपण होय—कष्टांपासून मुक्ति होय. आणि माझी ही आशा आतां व्यर्थ झाल्यानें [illegible]





कशांतच राम वाटेनासा झाला आहे. तृप्ति. ग्लानि. संन्यास. सर्व अधिकारांचा त्याग. "तुझ्या धैर्यांतच तूं आत्म्याची प्राप्ति करून घेशील."

........ची भेट झाली. माझीं पत्रें तिनें मला वाचून दाखवलीं. एवढ्या माझ्या आशा आकांक्षा का एवढ्या क्षुद्र परिणामांत परिणत होणार–धुळींत मिळणार? आपण किती क्षुद्र प्राणी आहोंत! वाळूंत नाहींशा होणाऱ्या धारेप्रमाणें माझाही अंत होणार; आणि माझा शेवटचा जीवन-बिंदु नाहींसा झाला कीं सारें संपलें! खेळ खलास झाला!!

आपल्या इच्छांनीं आपण किती वंचित झालेलों असतों!...नियतीचे आपला नाश करण्याचे दोन मार्ग असतात.. एक आपल्या इच्छांना नकार देऊन व दुसरा त्यांना पूर्ण करून. पण ज्याला फक्त आंतून निश्चितपणें वाटतें कीं सारी देवाचीच ही इच्छा आहे तो या दोन्ही अधःपातांतून सुटतो, मार्ग काढतो. सर्व गोष्टी त्याच्याच मंगलासाठीं एकत्र येऊन झटत असतात, त्याचीच इच्छा अनुसरीत असतात.

भयंकर रात्र; सारखी–डोळ्याला डोळा लागत नाहीं–जिच्यांत मी सारखा क्षीण होत चाललों आहें–अशी चौदावी रात्र...

महान् कष्ट व तपस्येचा उद्यां उत्सव आहे. मनस्तापाचे दिवस व वेदनाच्या रात्री घालवणें म्हणजे काय याची मला पूर्ण कल्पना आहे. माझ हें दुख, ही माझी कसोटी–नम्रपणानें व धिमेपणानें मला सहन करूं दे....आतां मला कांहीं भविष्य उरलेला नाहीं. वर्तमानाच्या इच्छा व आकांक्षा यांची तृप्ति करणें आणि सारें आहे तसेंच व्यवस्थित मोडून निघून जाणें एवढेंच माझें कर्तव्य आहे. आतां माझ्याकडून कांहींही होणें शक्य नाहीं, यापुढें जगणेंही शक्य नाहीं, हें पाहून मला आता शेवटीं सुखानें व शांतीनें–तृप्तीनें हे माझे डोळे मिटण्याचा प्रयत्न करू दे.

केवढें भयंकर तडफडणें...केवढा कोंडमारा! माझें हृदय आणि शरीर आतां चालूं शकत नाहींत.



## तुझी माया—

भूमीपरी तुझी माया
  मुकी सांठूनियां पोटीं
वृक्षापरी आणी माझ्या
  फुलें बोलकीं हीं ओठीं

हवेपरी तुझी माया
  वेढूनी ही निराकार
माझ्या श्वासोच्छ्वासांत
  एक तिचा आविष्कार

नभापरी तुझी माया
  नित्य आणि निरंजन
घाली सौंदर्याचें निळें
  माझ्या डोळ्यांत अंजन

ऐसी गडे तुझी माया
  न ये पहाया मापाया
जग विसरून देवा
  भक्ताध्याच लागे पाया!

**बा. भ. बोरकर**

मामा वरेरकर



त्या जागृतींतूनच विध्वंसाचा जन्म होत असतो; त्या प्रलयंकर स्वरुपानं जुनं जग दादरलं जातं आणि

# नव्या जगाची निर्मिती

विचारी, अविचारी आणि अतिविचारी बंडखोरांच्या जयजयकारांत होऊं लागते

संवेदनाशील कवि-मनांतून परिस्थितीच्या प्राबल्यामुळं भविष्यवाणी निर्माण होते. भवितव्यतेवर आवरण पडलेले अनेक पडदे भेदून अंतर्मुख झालेली कवीची दृष्टि बाह्य जगताच्या व्यापाराच्या पसाऱ्याचा आढावा घेतांना सहजपणें जें पाहून जाते, भविष्य कालांत बुद्धिपुरस्सर भेद करण्याची इच्छा नसतांना सुद्धा त्या कालाचा अचूक आढावा जी दृष्टि घेऊं शकते—कळत किंवा न कळत घेऊं शकते—त्याच दृष्टीच्या अंतर्मुख संवेदनेंतून भविष्य कालाचं मार्गदर्शन होत असतं. कवीच्या या भविष्यवेत्त्या वाणीच्या स्फूर्तीनं सर्वांच्या हृदयांतल्या झोंपी गेलेल्या अज्ञात भावना जागृत होतात—जगांत वावरूं लागतात—त्या त्यांच्या हालचालींमुळं जगाच्या व्यवहारांत जी एक खळबळ उडते—ज्या खळबळीमुळं सकृत् दर्शनी सुरळीतपणें चाललेल्या जगाच्या व्यापाराची उलटापालट होते, त्याच या कवीनं स्फूर्ति दिलेल्या आणि तारुण्याच्या उद्दाम वृत्तींतून बुद्धिपुरस्सर निर्माण झालेल्या परिस्थितीला बंड असं म्हणतात.

आजवर जगांत अनेक बंडं झालीं आहेत. बंडाची यथातथ्य व्याख्या अजून कुणालाही करतां आलेली नाहीं. परिणामाच्या दृष्टिकोनांतून कोणत्याही बंडाची प्रतिष्ठा नसते. जगांत झालेलीं सारींच बंडं कांहीं यशस्वी झालेलीं नाहींत. त्याचप्रमाणें अयशस्वी झालेलं बंड देखील निरर्थक गेलं आहे असंही म्हणतां यायचं नाहीं. जगाच्या वहिवाटीच्या हिशेबाच्या दृष्टीनं यशस्वी आणि अयशस्वी बंडांचं मोल सारखंच आहे. कारण मुळांतच बंडखोराला यशापयशाची चाड नसते. बंडखोर जें बंड करतो तें ध्येयाच्या यशस्वितेसाठीं असलं तरीही यशाची चाड त्याच्या सूत्रपातांत नसते. अपयशाची जाणीव बंडखोराच्या टायीं नसेल तर त्याचं तें बंड केव्हांही यशस्वी होत नसतं; म्हणूनच जो अस्सल बंडखोर असतो तो यशापयशाची खिजगणती मुळींच धरीत नसतो. सुरळीत चालत असलेल्या जगाकडे सामान्य माणूस सहनशील वृत्तीनं पहात असतो. त्या सामान्य माणसाच्या

सहनशील वृत्तीच्या मागं कर्तृत्वशून्य अशा स्वास्थ्याची आवड असते. अस्वस्थ वृत्त कर्तृत्वाला जन्म देत असते. स्वास्थ्य म्हणजे जिवंतपणाचं लक्षण नव्हे, ऐश्वर्य नव्हे. ऐश्वर्य म्हणजे ईश्वरपणा. ईश्वरी वृत्ति म्हणजे सृष्टि, स्थिति आणि प्रलयाची वृत्ति. निर्माण करणं, रक्षण करणं आणि विध्वंस करणं या तिन्ही प्रकारच्या परिस्थितींतून ईश्वराचं अस्तित्व प्रतीत होत असतं. या तिन्ही वृत्तींच्या समुच्चयांतच ईश्वराचं ऐश्वर्य असतं. ईश्वरपणा असतो. तो ईश्वरपणा म्हणजे जिवंतपणा आणि या जिवंतपणाच्या जाणिवेंतूनच बंडाची निर्मिती होत असते.

स्वास्थ्य म्हणजे आळस, म्हणजे कर्तव्यशून्यता. जसं आहे तसं चाललं आहे, हेंच खरं, याच्यापेक्षां वेगळं कांहीं नको असं ज्या वेळीं जाणीव असलेल्या जिवाला वाटत असतं त्या वेळीं तो स्वस्थ राहून जगत असतो. त्या या स्वास्थ्याच्या जगण्यांत जिवंतपणा नसतो; मरणाची आवड नसली तरी मरतुकडेपणाची वृत्ति या स्वास्थ्याच्या मुळाशीं असल्यामुळ जें विद्यमान आहे त्याच्याबद्दल असंतुष्टपणा प्रदर्शित करून, जें विद्यमान नाहीं, पण जें विद्यमान झालं पाहिजे असं वाटतं, तें निर्माण करण्याची वृत्ति अस्वस्थपणांतून जन्म पावते. ही वृत्ति म्हणजे ईश्वरी वृत्ति आणि ही ईश्वरावृत्ति ज्या वेळीं उफाळून निघते, सकृत् दर्शनीं शांति आणि समाधान यांचा आभास होणाऱ्या परिस्थितींत बदल झाला पाहिजे अशा आग्रहानं स्वास्थ्याच्या परिस्थितींत खळबळ उडवून सोडते, त्या वेळीं त्या खळबळीला ‘बंड’ असं म्हणतात.

निर्मितीच्या सुरळीतपणाला खंड पाडून नव्या परिस्थितीचा प्रादुर्भाव करण्याचा पहिला संदेश कुठून मिळतो हें कुणाला सांगतां येत नाहीं. अनंतांत दृष्टि फेंकून जगाला संदेश देण्याचा अधिकार मिरवणारा कवि संदेश देण्याचा हा अभिमान स्वतः मिरवीत असतो. पण तो संदेश कुठून मिळाला याची, त्याची त्यालाच जाणीव नसते. कुठून तरी हा लहानसा मोड उगवला, वाढला, त्याचं लहानसं रोपटं झालं, कीं तें रोपटं मला पहिल्यानं दिसलं म्हणून तो कवि जगाला सांगूं लागतो. तें चिमुकलं रोपटं जगाला दिसतं. जगाची सामान्य दृष्टि संकुचित असते, आखूड असते, क्वचित् आंधळीही असते. हें पहा नवं रोपटं उगवलं आहे, असं कवि म्हणत असतो त्या वेळीं सामान्य माणूस म्हणतो, ‘काय हा वेडा बरळतोय. कुठंच कांही दिसत नाहीं आणि हा वेडा म्हणतोय कीं एक रोपटं उगवलंय. यालाच तें कसं दिसलं? आम्हांला कां दिसत नाहीं?’ सामान्य बुद्धि निर्बुद्धपणानं असा अट्टाहास करून त्या कवीला वेडा ठरवीत असते; तरीही तो कवि तितक्याच अट्टाहासानं नवं रोपटं उगवल्याची ग्वाही नगाऱ्यांच्या खणखणाटानं सगळ्या जगाला सांगत असतो. जें आपल्याला दिसलं आहे, जाणवलं आहे, जें जाणवल्यामुळं आपल्या मनाच्या स्वाभाविक स्वास्थ्यांत खळबळ उडाली आहे, जें जाणवल्यामुळ जगाच्या स्वास्थ्यांत नवीन निर्मिती होणार आहे असं आपल्याला वाटतं आहे, तें सांगितल्यावांचून राहावत नाहीं, तें सांगितलं नाहीं तर जगाचं अकल्याण होईल, तें सांगितलं नाहीं तर जग स्वास्थ्याच्या कर्दमांत लोळत राहील, तें सांगितलं नाहीं तर जगाच्या नव्या निर्मितीला बाध आणण्याचा अपराध आपल्याकरवीं घडेल, म्हणूनच मोठमोठ्यानं नगारा पिटून तो सांगत असतो, ‘झोपलेल्या जगा, पहा, हें नवं रोपटं उगवलं आहे. हें रोपटं वाढलं पाहिजे. या रोपट्याचा मोठा वृक्ष झाला पाहिजे. तो फुलला पाहिजे. शाखापल्लवांनीं सुशोभित झाला पाहिजे. जगाला व्यापून टाकणाऱ्या त्याच्या अफाट शाखापल्लवांखालीं जग विश्रांती घेऊं लागलं, कीं तो फलद्रूप झाला पाहिजे. त्याच्या फुललेल्या फुलाचं फळ होणार आहे आणि त्या फळाच्या निष्पत्तींतून नव्या जगाची निर्मिती होणार आहे. म्हणून या रोपट्याकडे आधीं लक्ष द्या, त्याची जोपासना करा, खतपाणी घाला, त्याला वाढूं द्या, पल्लवित होऊं द्या, पुष्पित होऊं द्या आणि मग त्या मोहोरलेल्या पुष्पाचं फळ झालं कीं त्याचा आस्वाद घ्या.’ असं तो कवि अट्टाहासानं जगाला सांगत असतांना देखील जग त्याच्याकडे लक्ष देत नाहीं. जग त्याची हेटाळणी करतं. आंधळं जग त्या डोळस कवीला वेडा म्हणतं, भ्रमिष्ट म्हणतं. केव्हां केव्हां असंही होतं, स्वास्थ्याच्या कैफानं धुंद झालेलं तें जग त्या कवीचा जीव घेतं. जगाला अट्टाहासाच्या कंठरवानं नव्या निर्मितीचा संदेश देणारा तो कवी अंतर्धान पावतो; नष्ट होतो; पण त्याचा तो जिवंत संदेश अनंताच्या पोकळींत कुठं तरी वावरत राहिलेला असतो. स्वास्थ्यानं आळसावलेल्या जगाच्या कर्णरंध्रांत न शिरलेला तो संदेश कुणातरी अकल्पित जिवाच्या ज्ञानेंद्रियाला जाणवतो. त्या ज्ञानेंद्रियाच्या जाणिवेवर झालेल्या त्या संदेशाच्या परिणामामुळं तो जीव अस्वस्थ होतो. त्या अस्वस्थपणांतून कर्तृत्वाची भूमिका जन्म पावते. त्या भूमिकेंतच तें रोपटं उगवलेलं आहे हें त्या अस्वस्थ जिवाच्या नजरेला येतं. कर्तृत्वाच्या खतानंच त्या चिमुकल्या रोपट्याची वाढ होणार आहे असा त्या नष्ट झालेल्या कवीचा संदेश त्या अस्वस्थ जिवाला कार्यप्रवण करूं लागतो. कार्यप्रवणतेच्या स्फूर्तींतून निर्माण झालेली एका जिवाची खळबळ, धुंद झालेल्या असंख्य जिवांना धक्के देऊं लागते. सकृत् दर्शनीं सौम्य

## दोराआडून ऐकलं

गोरी : कसं काय काकूबाई काय केलंत दिवाळीला?

काळी : काय करणार बाई! ना मिळत साखर, ना गुळ, ना शुद्ध तुप!!

गोरी : अस्सं, मग?

काळी : मग काय? आयती तयार मिठाई आणायचं ठरवलं झालं इकडच्यांनीं!

गोरी : जळ्ळं मेलं कसचं तें! कुठं मिळते हो खात्रीची मिठाई?

काळी : असं कसं म्हणतां? चांगल्या दुकानांत गेलं कीं मिळतो चांगला खात्रीचा माल! तुम्हांला मुळीं जायलाच नको!

गोरी : (रागानें-गप्प राहाते.).

काळी : तुम्हांला हवी का खात्रीची मिठाई? चला तर माझे बरोबर! दादर B. B. ला कोहीनूर सिनेमासमोर एस्. मंगळदास मिठाईवाले आहेत ना, त्यांचेकडे मिळते शुद्ध तुपाची अन् खात्रीची मेवा मसाला युक्त मिठाई-अगदीं डोळे झांकून खरेदी करावी माल चोख. वागणूक सरळ. आपलं बाई हेंच ठिकाण!

वाढणारे ते धक्के हळुहळू वाढत असतात. त्या अस्वस्थ जिवांच्या तळमळीच्या अतिरेकासरशीं धुंद झालेल्या समाधानी जगाला मिळत असलेले धक्केही अमर्याद स्वरूपांत जाणवत असतात. एका जिवाच्या अस्वस्थतेंतून असंख्य जिवांचं स्वास्थ्य भंग पावतं. आणि त्या स्वास्थ्यभंगांतूनच ईश्वरी तेजानं प्रभावित झालेला तो जीव असंख्यांना जागृति देऊन जी परिस्थिति निर्माण करतो त्या परिस्थितीलाच विद्रोह म्हण- तात, बंड म्हणतात.

कवीच्या स्फूर्तीनं ऐश्वर्य प्राप्त झालेला, बंड निर्माण करणारा तो अस्वस्थ जीव बंडखोर ठरतो. त्या बंडखोराच्या ज्ञात आणि अज्ञात धक्क्यांनीं कर्तृत्वशून्य झालेल्या सामान्य जिवांच्या ठायींची असमर्थपणाची जाणीव नष्ट होऊन सामान्यांच्या ठायीं असामान्यत्व येऊं लागतं. एका व्यक्तीच्या ठायीं प्रादुर्भूत झालेल्या चैतन्यां- तून, अचेतन झालेल्या असंख्यांच्या वृत्तींत ईश्वरी चैतन्याचा प्रभाव प्रत्यक्षांत येऊं लागतो. त्या चैतन्याच्या लहानशा रोपट्याच्या मुळाशीं असंख्य हस्तांनीं विचाराचं खत घातलं जातं. त्या विचाराच्या खतांत अविचाराचे किडेही वळवळत असतात. विचाराच्या दडपणाखालीं रगडून जाणाऱ्या त्या अविचारांच्या किड्यांचंही रूपांतर होऊन तो अविचार विचारांत विलीन होऊं लागतो. विचार आणि अविचार यांच्यांत, स्वास्थ्याच्या काळांत जाणवणारा तीव्र भेद नष्ट होऊन विचार- अविचाराच्या खतानं त्या रोपट्याची महान् वृक्षांत परिणती होते. विचारी अविचाराच्या खतानं मस्त झालेला तो वृक्ष शाखापल्लवांनीं साऱ्या जगाला ज्या वेळीं व्यापून टाकतो, त्या वेळीं सुखासीन वृत्तीनं धुंद झालेल्या जगाला स्वतःच्या सामर्थ्याची जाणीव होऊं लागते. वृक्ष मोहरूं लागतो, पुष्पित होऊं लागतो. फलनिष्पत्तीचा आदेश देऊं लागतो. एका जिवाच्या जागृतींतून निर्माण झालेल्या विचारी अविचाराच्या विद्युल्लहरी असंख्य जगाला हादरे देऊं लागतात आणि त्या हाद- ऱ्यांनीं जागृत झालेलं जग बंडाचं निशाण उभा- रून प्रलयंकर महादेवाच्या तांडवाची जाणीव देत अफाट विश्वांत नव्या निर्मितीची फलनिष्पत्ति करूं लागतं.

त्या जागृतींतूनच विध्वंसाचा जन्म होत असतो. त्या विध्वंसाच्या प्रलयंकर स्वरूपानं जग क्षणभर हादरून गेल्यासारखं दिसतं. स्तिमित झालेले सामान्य जीव घाबरून मागं हटत अस- तात, त्या वेळीं निर्मितीच्या जाणिवेनं नवी सृष्टि निर्माण करण्यासाठीं उभा राहिलेला तो असमा- धानाचा संदेश देणारा स्फूर्त जीव, तो बंडखोर घाबरलेल्या जिवांना, भविष्यकालीन स्वास्थ्याच्या जयंतीचं आश्वासन देऊन, कार्यप्रवण करण्यास जो समर्थ होतो, तो विचारी अविचाराच्या ईश्वरी तेजाच्या सामर्थ्यामुळंच.

हतबल करणाऱ्या अतिविचारी वृत्तीमुळं प्रग- मनशील विचारांना प्रतिगामित्व येत असतं. पुरोगामी प्रवृत्ति अविचारांतून जन्म पावते खरी, पण त्या अविचाराला अधिष्ठान असावं लागतं तें निर्माणशील विचाराचं. सात्त्विक विचारांतून अतिविचार जन्माला येतो. अतिविचारी वृत्ति स्वास्थ्याला कार्यप्रवण करूं शकत नाहीं. पण अतिविचारी वृत्तींतून ज्या वेळीं अविचाराचा प्रादुर्भाव होतो त्या वेळीं त्या विचारी अविचार वृत्तीच कार्यप्रवणतेची आत्यं- तिकता जन्म पावते. विचार ही सात्त्विकता, अतिविचार ही राजस वृत्ति आणि अविचार हा तमोगुण विचार, अतिविचार आणि अविचार या सत्त्व, रज आणि तमोगुणात्मकतेंतून विचारी अविचाराची जी निर्मिती होते तीच बंडखोरी. विचारी अविचार हेंच बंडखोराचं ब्रीद, विचा- राच्या आत्यंतिकतेनं, उत्पन्न होणाऱ्या अति- विचारी वृत्तीनं माग हटणारं पाऊल पुढं टाकायला स्फूर्ति देणारा अविचार, हेंच बंडखोराचं ब्रीद, दस्तुरखुद्द विचारी अविचाराच्या सामर्थ्यावर संदेह घेणाऱ्या पाश्चा- त्त्या ईश्वरी प्रयत्न करणाऱ्या महती विश्वमित्रा- पासून, गुलामी वृत्तीनं दुबळ्या झालेल्या भारती- यांना अहिंसात्मक सत्याग्रहाच्या सामर्थ्यानं कार्य- प्रवण करणाऱ्या महात्मा गांधींपर्यंतच्या साऱ्या बंडखोरांनीं जी नवी सृष्टि निर्माण केली ती या विचारी अविचाराच्या बळावरच. जगांतले सर्व बंडखोर यशापयशाचे धनी झाले ते या बंड- खोराच्या विचारी अविचाराच्या ब्रीदामुळंच. त्या विचारी अविचाराच्या सामर्थ्यानंच आज भारत स्वतंत्र झाला आहे; बंडखोराच्या या ब्रीदाचा साऱ्या जगात जयजयकार झाला आहे.



वि. स. खांडेकर



कुणी तरी गळा दाबीत
असल्यासारख्या स्वरांत
माधवराव ओरडले—

# आपण सारे खुनी आहों !

माणसं दयेवर जगत नाहींत
तीं न्यायावर जगतात.

दिवाळीची एक रात्र मौजेंत घालवायची म्हणून आम्ही सारे दोस्त क्लबांत जमलों होतों. बारा वाजेपर्यंतचा वेळ गप्पा, हास्यविनोद व पत्ते यांत कसाबसा गेला. पण लहानपणीं पहांटेपर्यंत जागायची जी हौस असते ती पन्नाशी उलटलेल्या आमच्यासारख्या प्रौढांना कुठून असणार ? सारीं पिकूं लागलेलीं पानें. बाराचे टोले पडतांच जो तो जांभया देऊं लागला. अनेकांना जागरण न करण्याचा डॉक्टरांचा सल्ला आठवला. कुणाच्या तरी रक्तदाबाची चिकित्सा सुरू झाली. लहानपणीं खेळाच्या आणि तरुणपणीं प्रेमाच्या गोष्टींत मनुष्य रमून जातो हें स्वाभाविकच आहे. पण उतार वयांत बहुत्तर रोगांच्या चर्चेत त्यानें भाग घ्यावा ही थोडीशी आश्चर्याची गोष्ट नाहीं का ? यांतला कुठला रोग आपल्याला केव्हां होईल याचा नेम नसल्यामुळें प्रत्येकाची माहिती मिळविण्याची इच्छा प्रौढ माणसामधें प्रबल होत असेल. नाहीं कुणी म्हणावें ?

रोगाच्या पुढची पायरी म्हणजे मृत्यु ! दिवाळीच्या मंगल प्रसंगीं असल्या अशुभ गोष्टी संभाषणांत येऊं नयेत म्हणूनच कीं काय, आमच्यापैकीं कुणीतरी म्हणाला, ‘ आपण सारे व्हरांड्यांत बसूं या. तिथं कॉफी घेऊं नि मग घरीं जाऊं. ’

हवापालटाचा केवळ विशिष्ट रोगावरच परिणाम होतो असें नाहीं. तो माणसाच्या गप्पांवरसुद्धां होतो. व्हरांड्यांत आल्यावर आम्ही सारे एकदम स्तब्ध झालों. बाहेर पसरलेल्या अमावास्येच्या काळोखानें आम्हांला क्षणार्धांत अंतर्मुख केलें कीं काय देव जाणे ! आम्हीं क्लबांत आलों तेव्हां सारें शहर दिव्यांनीं कसें फुलून गेलें होतें ! जणु कांहीं सुंदर कळ्यांनीं लगडलेलें सुरंगीचें झाडच. पण आतां तो दीपोत्सव विसर्जन पावला होता. रस्त्यावर मिणमिण करणारे नगरपालिकेचे दिवे काळोखाच्या गुहेंत चमकणाऱ्या काजव्यांसारखे भासत होते. मघांचा प्रकाशाचा पूर पार ओसरला होता. नुसतें वाळवंट उरलें होतें तिथें ! बाळपणींच्या मधुर स्मृतींइतकेंच त्या आनंदाचें अस्तित्व उरलें होतें. मघांशीं आम्हीं पाहिलेली नगरी—ती होती यौवनानें मुसमुसलेली सुंदर तरुणी ! दीपकटाक्षांनीं प्रत्येक प्रेक्षकाचें मन वेधून घेण्याचें सामर्थ्य तिच्या अंगीं होतें. आतांची नगरी—सारें सौंदर्य लोप पावलेल्या एखाद्या वृद्धेसारखी दिसत होती ! यौवनाची मोहिनी किती क्षणभंगुर असते याचा अनुभव ती घेत होती !

असे किंवा असलेच कांहींतरी विचार आमच्यापैकीं प्रत्येकाच्या मनांत येत असावेत. तसें नसतें तर दहाबारा बडबडे लोक तीनचार मिनिटें स्तब्ध बसले नसते !

पण अनेक माणसें एके ठिकाणीं मुकेपणानें बसलीं कीं ती शांतताहि मोठी विचित्र वाटते, हळुहळू असह्य होते. देवाला प्रसाद लावावा, गुरवानें पुनःपुन्हा गाऱ्हाणें घालून ‘ बोल सायबा ’ म्हणून हात जोडावेत, पण

मूर्तीला चिकटलेल्या तांदळांतला एक दाणासुद्धां खालीं पडूं नये! असें झालें म्हणजे कौल लावणाऱ्या माणसाची जी मनःस्थिति होते तिचा अनुभव आम्हांला येऊं लागला. कुणीतरी बोलावें, कांहींतरी विषय काढावा, कॉफी येईपर्यंत कानांना कांहींतरी काम द्यावें, असें प्रत्येकाला वाटूं लागलें.

प्रो. दामल्यांनीं ही कोंडी फोडली. ते म्हणाले, "इथल्या नव्या नव्या दैनिकाचा संपादक मोठा डोकेबाज दिसतो हं! लवकरच एक खळबळ उडविणारी लेखमाला सुरू करणार आहे तो! तिचें नांव आहे—'आपण सारेच खुनी आहोंत!"

"आपण सारेच खुनी आहोंत?" तिघां-चौघांच्या तोंडांतून नकळत एकदम शब्द बाहेर पडले. जणुं कांहीं ते कुठल्यातरी नाटकांत काम करीत होते आणि तें वाक्य त्यांनीं एकदम उच्चारणें नाट्याच्या परिणामकारकतेच्या दृष्टीनें आवश्यक होतें. त्यांच्या प्रश्नाच्या पाठोपाठ एक-दोघांचें उपहासाचें अस्फुट हास्य ऐकूं आलें.

गोरे वकील सिगारेटचा धूर नाकांतून सोडीत उद्गारले, "अहो वर्तमानपत्र आणि वेश्या यांच्यांत फार साम्य आहे! दोघांनींहि गिऱ्हाईकं गांठण्यासाठीं दररोज नवनवी रंगरगोटी करावी लागते! त्यांतलाच हा एक प्रकार आहे झालं! तीस वर्षांचा अनुभव जमेला धरून मी सांगतों तुम्हांला, खुनी म्हणून फांसावर चढलेला मनुष्य सुद्धां अनेकदां निर्दोष असतो. हत्येच्या दृष्टीनं नव्हे, हेतूच्या दृष्टीनं मनुष्य वाटतो तितका स्वभावतः दुष्ट नाहीं. पण तो मूर्ख आहे. महामूर्ख आहे!"

हे तंव कुणी संपादक नव्हता हें आमचें भाग्य! नाहींतर गोऱ्यांच्या पहिल्याच वाक्यामागशीं मारामारी सुरू झाली असती आणि मौजेनें पत्ते खेळण्याकरितां आलेल्या डॉक्टरांना इथंसुद्धां गिऱ्हाईकें मिळालीं असतीं!

गोऱ्यांना दुजोरा देत आणि आपलें अर्धवट टक्कल पडलेलें डोकें खाजवीत डॉक्टर उद्गारले, "अहो, हीं अलीकडचीं नवीं नवीं पाश्चिमात्य खुळं आहेत. मानसशास्त्राचं स्तोम माजवायचं आणि माणसाला सांगत सुटायचं कीं, तूं मूर्ख आहेस, तूं लंपट आहेस, तूं विकृत आहेस! माणसाला गाढव ठरविण्यांत मोठा आनंद वाटतो या युरोपियन विद्वानांना. पण मी तुम्हांला सांगतों, या बडबडींत भुसा फार, दाणे थोडे. मधें फ्रॉइडचं एक खूळ आलं होतं ना?"

कोंपऱ्यांतल्या आरामखुर्चीत डोळे मिटून पडलेले माधवराव दांडेकर एकदम उठून बसले आणि म्हणाले, "मी तुमच्यासारखा विद्वान् नाहीं. व्यापार करून चार पैसे कमीवणारा एक साधासुधा माणूस आहे मी! मला या विषयावर वादविवाद नाहीं करतां येणार. पण जगांतल्या प्रत्येक मनुष्याचा अनुभव पढिक पांडित्यापेक्षां अधिक मोलाचा असतो. मी माझ्या अनुभवावरून सांगतों, आपण सारे खुनी आहों. प्रत्येकानं आपलं आयुष्य प्रामाणिकपणानं आठवून पहावं, म्हणजे त्याच्या लक्षांत येईल कीं, कधीं ना कधीं आपल्या हातून खून झाला आहे!"

माधवराव काय म्हणताहेत हें आम्हाला कळेना! वादासाठीं वाद करणाऱ्या व्यक्ती जगांत पुष्कळ असतात. पण माधवरावांचा स्वभाव तसा मुळींच नव्हता. शांत, गोड आणि विचारी असा हा पन्नाशी उलटलेला सधन मनुष्य जें बोलत होता त्याचा अर्थ—

गोरे वकील उलट तपासणीसाठीं प्रसिद्ध होते. त्यांनीं तत्काळ माधवरावांना प्रश्न केला, "आपण सारे खुनी आहों असं तुम्हांला खरोखरच वाटतं?"

"खरोखर. ईश्वरसाक्ष सांगतों हवं तर!" एरवीं माधवरावांच्या या शब्दांनीं आमच्या मुद्रांवर स्मित उमटलें असतें. पण—पण त्यांच्या ठांशीव बोलण्यामुळें आम्ही चकित झालों. ते थट्टा करीत नव्हते हें उघड होतें.

गोऱ्यांनीं गंभीरपणानें प्रश्न केला, "आपण या शब्दांत आम्ही सारे तर येतोंच पण तुम्हीसुद्धां येतां."

"कबूल!"

"मग तुम्ही—तुम्ही—"

"असे चांचरूं नका!"

"तुम्हीसुद्धां खुनी आहां?"

"तुमचा आरोप मला मान्य आहे."

या उत्तराचा अर्थ कुणालाच कळेना. गोरे वकील एवढे बोलभांड, जहांबाज, कज्जेदलाल. पण उकळत्या दुधावर पाण्याचा शिडकाव होतांच तें जसें खालीं जातें, तसे ते एकदम स्तब्ध झाले.

माणसाचें मन नुसतें विचित्र नाहीं. तें विकृतहि आहे. आम्ही दोघेतिघे एकमेकांकडे साभिप्राय दृष्टीनें पाहूं लागलों. सात-आठ वर्षांपूर्वी माधवरावांची चाळिशींत आलेली पत्नी गोल पातळ नेसूं लागली होती! पुढें लवकरच तिनें चेहऱ्याची रंगरंगोटी करायला सुरुवात केली. बायकाबायकांत तिच्या या क्रांतिकारक सुधारणांची चर्चा होऊन शेवटीं ती आम्हां नवऱ्यांपर्यंत येऊन पोंहोंचे. माधवराव आपल्या कामासाठीं दिल्लीला किंवा कलकत्त्याला महिना-महिनाभर जात. अर्थात् त्यांची पत्नी प्रोषितभर्तृका होई. पति परगांवीं गेल्यानंतर पतिव्रतेनें कसें रहावें, केंस कसे बांधावे, डोळ्यांत काजळ घालावें कीं घालूं नये इत्यादि गोष्टींची

संस्कृत काव्यांतून आम्हांला मिळालेली माहिती या आधुनिक प्रोषित-भर्तृकेच्या लगणुकीशीं विसंगत वाटूं लागली. साहजिकच तिच्या वर्तना-विषयीं जीभ चावत चावत चर्चा करण्याचा बायकांनीं पायंडा पाडला. माधवरावांचा मुलगा आणि मुलगी हीं दोघें थोडींफार उडाटपूच होतीं. त्यामुळें त्यांच्या पत्नीविषयीं निर्माण झालेला हा निराधार संशय तसाच कायम राहिला. वेताल आईचीं मुलें बेफाम व्हायचींच, असें कांहींतरी आमच्यापैकीं अनेक दांपत्यें त्या वेळीं एकांतांत पुटपुटलीं देखील !

हें सारें आम्हांला एकदम आठवलें आणि मनांत आलें,—माधवरावांना या गोष्टीचा कधीं काळीं पत्ता लागलेला होता कीं काय ? आपल्या पत्नीशीं फाजील सलगी करणाऱ्या मनुष्याचा कांटा त्यांनीं गुप्तपणानें नाहींसा केला असेल का ? यांत अशक्य काय आहे ? गुन्हा गरिबाला सुखासुखी पचत नाहीं. पैसेवाल्यांचें तसें नाहीं. त्यांच्या पायांत मोडलेला कांटा कितीहि मोठा असूं दे; सोन्याच्या सुईनें हां हां म्हणतां ते तो टोकरून बाहेर काढतात, दूर फेंकून देतात.

आमच्या मनांत काय चाललें आहे हें माधवरावांना कळणें शक्य नव्हतें. पण आम्ही गोंधळलों आहों हें त्यांनीं ओळखलें. खुर्चींत नीट सांवरून बसत ते म्हणाले, " माझ्या हातून झालेल्या खुनाची हकीगतच मी तुम्हांला सांगतों. तुम्ही मला सज्जन मानतां. मीहि स्वतःला भला माणूस समजतों. पण सज्जनांच्या हातूनसुद्धां या जगांत खून होऊं शकतात. दुर्जनापेक्षां सज्जनांच्या हातूनच अधिक खून होतात असें म्हटलें तरी चालेल. "

माधवराव पेशानें व्यापारी असले तरी त्यांच्या रक्तांत रसिकपणा भरपूर होता. शॉ हा त्यांना आवडता ग्रंथकार. आपल्या या लाडक्या लेखकाची हुबेहुब नक्कल करूनच त्यांनीं शेवटचें वाक्य उच्चारलें असावें असें आम्हां सर्वांना वाटलें.

माधवराव बोलूं लागले, "एका गोष्टीबद्दल प्रथमच तुमची माफी मागून ठेवतों मी ! कुठलीहि हकीगत मला नीट रंगवून सांगतां येत नाहीं. त्यामुळें माझा अनुभव ऐकल्यानंतर डोंगर पोखरून उंदीर निघावा तसं कदाचित् तुम्हांला वाटेल. पण मी जें सांगणार आहें, तें तुमच्यासाठीं नाहीं. स्वतः-साठींच सांगणार आहें मी. कुठेंतरी मन मोकळें करून ती गोष्ट सांगावी असें कितीतरी दिवस वाटतंय् मला ! आज सहा वर्षं एखाद्या पिशाच्चा-सारखी त्या गोविंदाची आठवण माझा पाठलाग करतेय् !"

गोविंदा ? कुठला गोविंदा ? आम्ही प्रश्नार्थक दृष्टीनें एकमेकांकडे पहात आपापसांत मूकपणानें बोललों. माधवरावांशीं संबंध आलेला गोविंद नांवाचा इसम कुणालाच ठाऊक नव्हता !

माधवरावांनीं खांकरून बोलायला सुरवात केली, "सात वर्षांपूर्वींची गोष्ट आहे ही ! रात्रीं पावणेदहा वाजतां अगदीं दमून घरीं आलों होतों मी. येऊन पाहातों तों टेबलावर कलकत्त्याची अगदीं जरूरीची तार पडलेली ! मुंबईला जाणारी पावणेअकराची गाडी साधायची म्हणून मी जेवलोंसुद्धां नाहीं. दोन केळीं खाल्लीं. थोडी कॉफी घेतली. इतक्यांत ड्रायव्हर वर येऊन म्हणाला, " बाईसाहेब, भाऊसाहेब आणि ताईसाहेब यांना बाहेर जायचंय. "

मीं रागानं विचारलं, " कुठं ? "

" कसला शात्र आहे म्हणे ! साडेदहाला सुरू होणार आहे तो ! चार दिवसांपूर्वींच तिकिटें काढून ठेवलीं आहेत त्यांनीं ! "

' टांगा करून जायला सांग त्यांना ! ' हे शब्द माझ्या अगदीं ओठावर आले होते. पण मी ते आंवळ्या आंत गिळले. हें ऐकून तुम्ही सारे हंसाल मला. गोरे तर मिशांखालीं फादतील. त्यांची बायको अजून त्यांना भिते. मुलं तर त्यांच्या वाऱ्यालासुद्धां उभीं राहत नाहींत. मलासुद्धां त्यांच्या प्रमाणं प्रतापराव व्हावं असं अनेकदां वाटतं. पण जें आहांत नाहीं ते पोहऱ्यांत कुठून येणार ? तें जाऊं दे. मी काय सांगत होतों ? हं हं मी रागारागानंच ड्रायव्हरला सांगितलं " तूं येऊन जा त्यांना. मी जाईन टांगा करून स्टेशनावर ! "

बायकापोरांना साध्या बाबतींत दरडावायची हिंमत नसलेल्या या दुबळ्या मनुष्यानें खून कसा केला असेल कुणाला ठाऊक, हा विचार आम्हां सर्वांच्याच मनांत एकदम आला. आम्ही एकमेकांकडे पाहून साभिप्राय स्मित केलें. आणि पुढें ऐकूं लागलों.

"त्या दिवशीं बायकोमुलांवरला राग मीं स्वतःवर काढला. टॅक्सी न करतां टांगा करून स्टेशनावर गेलों मी. गाडीला फक्त पंधरा मिनिटें उरलीं होतीं. मी गडबडीनें टांग्यांतून उतरलों. हमाल हे पूर्वजन्मींचे कावळे असतात कीं काय हें मला माहीत नाहीं. माझ्याभोंवतीं गुरू झालेली त्यांची कावकाव पाहून तशी कल्पना मात्र त्या वेळीं माझ्या मनांत आली. त्या कलकलाट करणाऱ्या चारपांच लोकांच्या पलीकडे एक साध्या पोषाखांतला पोऱ्या उभा होता. तोहि मोलमजुरी करणारा दिसला. या भांडखोर लोकांपेक्षां त्यालाच चार पैसे देणं बरें म्हणून मीं नोकरानें त्याला विचारलें, "काय रे ? येतोस का आंत सामान घेऊन ? "

मान हालवून तो झुकझुक पुढें झाला. त्याचें ते चालणें पाहून आजारी आहे कीं काय हें मला कळेना !

तो माझ्याजवळ यायच्या आधींच दोघेतिघे हमाल ओरडले, "साहेब, तुमची गाडी चुकणार ! हा आंधळा गोगलगाईप्रमाणें चालतो. तो आंत पोहोंचेपर्यंत गाडी निघूनसुद्धां जाईल."

"तूं आंधळा आहेस ?" मीं दचकून त्या तरुणाला विचारलें.

"कमी दिसतं मला साहेब. पण तुमची गाडी नाहीं चुकूं देणार मी ! गाडी चुकली तर मला पै देऊं नका."

त्याच्या स्वरांतला प्रामाणिकपणा मला आवडला. त्याच्या डोक्यावर सामान चढवून मी तिकीट काढायला गेलों तेव्हां तो म्हणाला, "साहेब, माझं एक प्लॅटफॉर्म काढा. साध्या ड्रेसांत मला आंत सोडत नाहींत कधीं कधीं !"

गाडीकडे जातांना मी त्याच्याकडे बारकाईनें पाहत होतों. त्याचा धक्का कुणाला लागला नाहीं. तो पुरा आंधळा नव्हता हें यावरून उघड होत होतें. मात्र तो फार जपून चालत होता. जिना आला तेव्हां पहिली पायरी त्यानें आधीं चाचपून मग तो बेतानें चढूं लागला.

तीन डागांचे सहा आणे मीं त्याला दिले. इतर हमालांप्रमाणें तो आणखी पैसे मागेल, बायफळ बडबडत राहील, 'साहेब, मी आंधळा आहें' म्हणून भुणभुण करील, 'गरिबाच्या पोटाकडे पाहा' म्हणून तोंड वेंगाडील, अशी माझी कल्पना होती. पण त्यानें तसें कांहींच केलें नाहीं ! एक पावली आणि एक दुगेली मीं त्याच्या हातावर ठेवली होती. तीं नाणीं त्यानें अगदीं डोळ्यांजवळ नेऊन पाहिलीं, मग तीं डाव्या हातांत घेऊन उजव्या हातानें तीं चाचपलीं आणि आर्जवी स्वरानें दुणेली पुढें करीत तो म्हणाला, "दोन आणेल्या द्या मला साहेब !"

मीं ती दुणेली घेतली आणि त्याच्या हातावर दोन सुट्या आणेल्या ठेवल्या. लगेच त्यांतली एक पुढं करीत तो म्हणाला, "साहेब—"

मीं विचारलें "हें रे काय ?"

तो उत्तरला, "प्लॅटफॉर्मचं तिकीट !"

'मी त्याच्याकडे पहात राहिलों. व्यापारांत पडलेल्या माणसानें अप्रामाणिकपणाचे इतके नमुने पाहिलेले असतात कीं, मनुष्य अतिशय प्रामाणिक असूं शकतो या गोष्टीवर त्याचा विश्वासच बसत नाहीं ! त्यामुळें रेताड वाळवंटांत अमृताचा झरा दिसावा तसे त्याचे ते शब्द मला वाटले. —'प्लॅटफॉर्मचं तिकीट !'

मीं त्याला त्याचें नाव विचारलें ! तो माझ्याकडे चकित होऊन पाहूं लागला. आतांपर्यंत कुठल्याहि प्रवाशानें त्याला नांव विचारलें नसावें. तो हळूच म्हणाला, "गोविंद."

मीं खिशांतून एक रुपयाची नोट काढली आणि ती त्याच्या हातांत ठेवीत म्हणालों, "गोविंदा, तुझा एक आणा मी घेतों. पण त्या एक आण्याची किंमत फार मोठी आहे. म्हणून त्याच्याबद्दल माझा हा रुपया तूं घेतला पाहिजेस !"

तो कां कूं करूं लागला. पण आग्रह करून तो रुपया मीं त्याला घ्यायला लावला. इतक्यांत गाडीची तिसरी घंटा झाली. गाडी सुटतां सुटतां त्याचे शब्द मीं ऐकले, "साहेब, गोविंदाची आठवण ठेवा हं !"

बोलतां बोलतां माधवराव थांबले. बहुधा तो प्रसंग त्यांच्या डोळ्यांपुढें उभा राहिला असावा. आम्ही सारे मात्र अचंब्यांत पडलों. मोलमजुरी करणाऱ्या एका गरीब पोराचा खून आपण केला असें माधवराव म्हणतात ! त्यांना वेडबीड तर लागलें नाहीं ना ?

माधवराव पुढें बोलूं लागले, "कलकत्त्याहून परत आल्यावर एकदां हुबळीला जायचं होतं मला. त्या दिवशीं घरांत गाडी होती. पण मला एकदम गोविंदाची आठवण झाली. गाडींतून गेलों तर त्याची गांठ पडणार नाहीं असं वाटलं. तो टांगे थांबतात तिथंच—तिसऱ्या वर्गाच्या उतारूंपाशीं—असे म्हणून मीं मुद्दाम टांगा केला. बायकोला माझं तें वागणं मोठं विक्षिप्तपणाचं वाटलं. नवरा असाच सुधारत गेला तर लवकरच संन्यास घेईल अशी भीति कदाचित् तिच्या मनांत निर्माण झाली असावी !

अपेक्षेप्रमाणें गोविंदा मला दिसला. त्यालाच घेऊन मी गाडीवर गेलों. गाडी सुटायला नेहमींपेक्षां थोडा अधिक उशीर झाला. म्हणून आग्रह करून त्याला मीं डब्यांत बोलावलं, थोडं फराळाचं खायला दिलं. उभ्याउभ्यानंच खात होता तो तें ! मी बसायला सांगितलं तेव्हां तो संकोचला. शेवटीं मीं त्याला खालीं बसविलें, तेव्हां आपला उष्टा हात बैठकीवरून हळूच फिरवून तो म्हणाला, "या डब्यांत बसायला इतक्या मऊ मऊ गाद्या असतात हें माहीत नव्हतं मला साहेब !"

हळुहळू त्याची सारी हकीगत मीं विचारून घेतली. पहिल्या–पहिल्यांदां तो थोडासा गोंधळला. मग मात्र सारं मोकळेपणानं सांगूं लागला. मला वाटलें, प्रत्येक माणसाला आपलं सुखदुःख कुणापाशीं तरी सांगावं अशी फार फार इच्छा असते. पण अनेकांना तें ऐकून घेणाराच मिळत नाहीं. वक्ते फार पण श्रोते थोडे अशी माणसांच्या मनांतल्या जगाची स्थिति असते !

गोविंदाची हकीगत इतरांपेक्षां कांहीं फारशी निराळी नव्हती. असले लाखों गोविंद आपल्या दुर्दैवी देशांत वावरत आहेत. बिचारे धडपडतात, तडफडतात, प्रामाणिकपणानें आयुष्याचा प्रवास करूं इच्छितात, पण त्यांना कोणत्याच प्रकारची अनुकूलता मिळत नाहीं. आईबाप गरीब. त्यांचें पोट हातावर. त्यांना पोरें पुष्कळ. तीं होऊं नयेत असं पुढं पुढं वाटूं लागतं. पण तीं न होऊं देण्याचा उपाय ठाऊक नसतो. विचारी देवापुढं पुनः

पुन्हा हात जोडतात. पण इकडे मुलें होतच राहतात ! मिळकत थोडी, कुटुंब मोठं. त्या पोरांनीं शाळेंत घालून कसें भागणार ? गोविंदा तर आई-बापांचा पहिला मुलगा. त्याच्या पाठीवर पांच सहा भावंडं. सातव्या वर्षीच तो लहानमहान कामं करूं लागला पण तो कुठंहि टिकेना. त्याला दिसे कमी. जिथं तिथं हा दोष आडवा येऊं लागला. आईबापांनीं निरनिराळ्या देवांना खूप नवस केले. पण एकहि देव त्यांना पावला नाहीं. गोविंदाची दृष्टि सुधारली तर नाहींच. उलट ती हळूहळू बिघडत चालली.

अशीं आठदहा वर्षं गेलीं. गोविंदाला सारं समजूं लागलं. अधू डोळ्यांमुळं घरीं बसून रहायचं त्याच्या जिवावर येई. पण जवळजवळ आंधळ्या झालेल्या मुलाला नोकरी कोण देणार ? तो बसून खातो म्हणून आईबाप त्याच्यावर रागावूं लागले. आपली धाकटी बहीण कशी गोरीपान आहे ! पण तिला कांहीं चांगला परकर मिळत नाहीं म्हणून गोविंदाला फार फार वाईट वाटे. विचार करतांकरतां शेवटीं त्यानें घर सोडून पळून जाण्याचें ठरविलें.

कुठल्या तरी मोठ्या स्टेशनावर आपल्याला काम मिळेल या आशेनं तो इथं आला. स्टेशनावर उभा राहूं लागला. दिवसा त्याला फार कमी काम मिळे. त्याचा आंधळेपणा उतारूला चटकन् कळे. रात्रीं मात्र चार पैसे निश्चित मिळत. त्याचा आंधळेपणा अंधारांत खपून जाई. शिवाय कांहीं टांगेवाले त्याचे दोस्त झाले होते. ते त्याला गिऱ्हाईक मिळवून देत. पोटापुरतं त्याच्या पदरांत पडे. धर्मशाळेंत रहायचं, पुरीभाजी–पावचहा–जें मिळेल त्यावर दुपारची आणि रात्रीची वेळ भागवायची. एखादे दिवशीं नुसतं पाणी पिऊन पथारी पसरायची आणि महिन्याकांटीं चार दोन रुपये शिल्लक पडले तर ते घरीं पाठवायचे असा त्याचा क्रम सुरू झाला. त्यांतच त्याला आपल्या आयुष्याचं सार्थक वाटत होतं. त्याची देवाकडे फक्त एकच प्रार्थना होती—"आहे एवढी दृष्टि तरी शाबूत ठेव !"

—माधवराव एकदम थांबले.

कॉफी आणायची का, हें विचारायला नोकर आला होता. त्याचा आम्हां सर्वांना असा राग आला ! आमच्याकडे पहात माधवराव त्याला म्हणाले, "पांच मिनिटांनीं घेऊन ये."

तो निघून गेला. पण सूत काढतां काढतां तें मधेंच तुटलं म्हणजे मनुष्य जसा चिडतो तशी आमची स्थिति झाली. माधवराव तें आतां कसें सांधणार आहेत तें आम्हांला कळेना.

ते पुढें सांगूं लागले, "गोविंदाची हकीगत ऐकून मला दया आली.





## हवी गड्या रे कणखर छाती !

हवी गड्या रे कणखर छाती ! कणखर छाती !
शहराच्या संस्कृतींत इथल्या जगण्यासाठीं ! !
दुबळ्यांच्या स्व नांना उरला इथें न थारा
शीलाहुनिही मोल इथें बघ ये व्यभिचारा
गरळ उरीं तरि उसनें हांसूं इथल्या ओठीं
हवी गड्या रे कणखर छाती ! कणखर छाती !
गरिबांच्या घामावर येथें नित्य दिवाळी
घोर वंचना लिहिलेली श्रमिकांच्या भाळीं
देव इथें बघ बळी चालले दगडासाठीं
हवी गड्या रे कणखर छाती ! कणखर छाती !
अन्न न म्हणुनी विकिते कन्या इथली माता
उजळ सदोदित दंभाचा गर्वोन्नत माथा
मिटून डोळे पाप पचविते इथली माती
हवी गड्या रे कणखर छाती ! कणखर छाती !
इथलीं यंत्रें तेल मागती बघ दलितांचें
इथ सभ्यता अर्घ्य घेतसे अन् पतितांचें
न्याय इथें अन्याय, शांतता म्हणजे भीती
हवी गड्या रे कणखर छाती ! कणखर छाती !
एकाचें संकट दुसऱ्याची सुवर्णसंधी
नादानांच्या घरांत संतत धनसमृद्धी
फिरते हिंसा गात: "अहिंसा हीच शाश्वती"
हवी गड्या रे कणखर छाती ! कणखर छाती !
सत्य बोलती त्यांच्या पायीं इथें शृंखला

इथें उपाशी माणुसकीनें जो जगणारा
नाण्यांच्या तालावर नाचे इथली नीती
हवी गड्या रे कणखर छाती ! कणखर छाती !
दिव्य तुझ्या स्वप्नांमधल्या त्या विश्वासाठीं
हवें चालण्या क्रूस आपुला घेउन हातीं

सृजन नवें मग पवित्र या रक्ताच्या पोटीं
हवी गड्या रे कणखर छाती ! कणखर छाती !
शहराच्या संस्कृतींत इथल्या जगण्यासाठीं !

—मंगेश पाडगांवकर

मी तिथल्यातिथं त्याला एक पत्र लिहून दिलें. एका बड्या डोळ्यांच्या डॉक्टरांच्या नांवाची चिठ्ठी होती ती! मी परत आल्यावर ते डॉक्टर रस्त्यांत मला भेटले. ‘आपण गोविंदाच्या डोळ्यावर उपचार करीत आहों, यामुळं त्याला थोडं स्पष्ट दिसूं लागलं आहे, पण ऑपरेशनशिवाय त्याचे डोळे सुधारणार नाहींत, तें ऑपरेशन फार कठीण आहे,’ असें त्यांनीं मला सांगितलें. ऑपरेशन मुंबईला चांगलें होईल, त्याला हजार रुपये खर्च येईल, असेंहि त्यांनीं मला बजावलें. गोविंदा निराश होऊं नये म्हणून ऑपरेशनची गोष्ट त्यांनीं त्याला सांगितली नव्हती. मीं मनांत म्हटलें, ‘हजार रुपये कांहीं आपल्याला फार जड नाहींत. पुढं सवडीनं कधीं तरी करून टाकूं गोविंदाचं ऑपरेशन!’




त्यानंतर दिल्ली आणि कलकत्ता येथें माझे दोन–अडीच महिने गेले. परत आल्यावर मी मधला जमाखर्च सहज पाहूं लागलों. डोळ्यांच्या डॉक्टराचं एक बिल त्यांत दिसलं. तें पहातांच मला गोविंदाची आठवण झाली. अस्सं उठावं आणि त्याला घेऊन मुंबईला जावं असं क्षणभर वाटलं मला. पण मी जागेवरून कांहीं हललों नाहीं. स्टेशनवर योगायोगानं भेटलेल्या एका पोरासाठीं हजार रुपये खर्च करावेत कीं नाहीं याचा माझं मन विचार करूं लागलं. एकदां वाटे, ‘तें आपलं कर्तव्य आहे–तो माणसाचा धर्म आहे.’ मग मनांत येई, ‘असे लाखों गोविंद जगांत आहेत. त्या सर्वांचीं दुःखं दूर करायला कुबेराची संपत्ति तरी पुरेल का? उठल्यासुटल्या धर्माचें स्तोम माजविण्यांत काय अर्थ आहे? व्यवहार, व्यवहार म्हणून जगांत कांहीं आहेच कीं नाहीं?’

अशा मनःस्थितींत मीं तीन चार दिवस काढले. चवथे दिवशीं आमचे चिरंजीव माझ्याकडे आले. उसने पैसे घेऊन तो रेस खेळायला गेला होता आणि हजार रुपये गमावून बसला होता! ते पैसे भरणं मला प्राप्तच होतं. पेढीची पत होती, घराण्याची अब्रू होती, माझ्या नांवाची किंमत होती. त्या गाढवानं एक नांव सांगितलं. मीं मुकाट्यानं त्या नांवाचा हजाराचा चेक फाडून दिला!

तो चेक दिल्यावर मात्र मला स्वतःचा संताप आला. आरशापुढं जाऊन चार थोबाडींत मारून घ्याव्या किंवा देवळांत जाऊन देवापुढं नाक घांसावं असं वाटूं लागलं. लगेच मी गाडींत बसलों नि स्टेशनावर गेलों. तिथल्या गडबडींत गोविंदा कुठंच दिसेना. त्याची चौकशी कुणाकडे करावी हेंहि कळेना! इतक्यांत गोविंदाची न् माझी ओळख झाली त्या दिवशींचा टांगेवाला मला दिसला.

‘गोविंदा कुठल्या धर्मशाळेंत राहतो रे?’ मीं त्याच्याजवळ जाऊन प्रश्न केला.

त्यानें एटकन तोंड फिरविलें. त्याच्या या वागणुकीचा अर्थच मला कळेना. वाटलं, गोविंदाचं आणि या टांगेवाल्याचं कडाक्याचं भांडण झालं असावं ! या अशिक्षित लोकांत प्रेम आणि द्वेष या दोन्ही भावना मोठ्या उत्कट असतात.

मी त्याच्याकडे पाहूं लागलों. तो डोळे पुशीत होता. मी मनांत चरकलों.

'काय झालं रे?' मी गोंधळून विचारलें.

'गोविंदा गेला साहेब...'

'गेला ?'

'हो.'

'मेला ?'

त्यानें मान हालविली आणि पुन्हा डोळे पुसले.

'काय झालं रे त्याला ? औषधपाणी कुणी केलं कीं नाहीं ?'

'तो मोटारीखालीं सांपडला साहेब !'

'मोटारीखालीं ? कुठं ?'

'इथंच.' पलीकडे बोट दाखवीत तो म्हणाला.

'कधीं ?'

काल रात्रीं.

'काल रात्रीं?' कुणीतरी गळा दाबीत असल्यासारख्या स्वरांत मी ओरडलों.

'होय साहेब ! तो एका डागदाराकडं गेला होता मधें. त्याच्या औषधानं त्याला थोडं बरं दिसायला लागलं. मग त्याला जास्ती काम मिळायला लागलं. मागच्या महिन्याला दहा रुपये पाठविले त्यानें घरीं! बापाचं शाबासकीचं पत्र आलं. तें घेऊन दिवसभर नाचत होता नुसता! पुन्हां आईनं भेटायला बोलावलं होतं. 'पुढल्या महिन्याला खूप पैसे घेऊन जाईन,' असं तो माझ्यापाशीं म्हणाला. सारखं काम मिळायला लागलं. दिवस नाहीं नि रात्र नाहीं. मागं तो संभाळून हळूहळू चालायचा. पण थोडं बरं दिसायला लागल्यावर पळायला लागला लेकाचा! सावधपणा गेला साहेब त्याचा. नि काल रात्रीं–तिथं–तिथं अंधार असतोच नेहमीं—'

आवंढा गिळून तो टांगेवाला म्हणाला, 'फार चांगलं पोरगं होतं साहेब!' त्या जाग्रेकडे पहात मी कितीतरी वेळ उभा राहिलों होतों.

सहा वर्षे होऊन गेलीं या गोष्टीला. पण स्टेशनावर गेलों कीं अजून गोविंदाची आठण होते मला ! काळजांत कुणीतरी सुरी खुपसल्यासारखं वाटतं. गोविंदाची मूर्ति डोळ्यांपुढं उभी राहते. ती म्हणते, 'साहेब, तुम्ही माझा खून केला. तुमच्या दयेनं मारलं मला. माणसं दयेवर जगत नाहींत. तीं न्यायावर जगतात. तुम्ही मला त्या डाक्तराकडं पाठविलं नसतं तर स्वतःला आंधळा मानून मी जन्मभर सावधपणानं चालत राहिलों असतों. पण—तुम्ही—तुम्ही मला अर्धेमुर्धे डोळे दिले. तुमच्या दयेनं माझा खून केला !"

शेवटचीं वाक्यें उच्चारतांना माधवरावांचा स्वर एकदम घोगरा झाला. ते बोलायचे थांबले. वाजतां वाजतां सतारीची तार एकदम तुटावी तसं आम्हां सर्वांना वाटलं.

नोकर उनउनीत कॉफी घेऊन आला. सर्वांच्यापुढं त्यानें कॉफीचे पेले ठेवले.

हवेंत गारठा जाणवूं लागला होता. पण पेल्याला हात लावण्याची इच्छा कुणालाच होईना !

आचार्य अत्रे



एक तासभर माझ्या
तोंडाला जें येईल तें मी
तुताऱ्यासारखा ओरडत होतो!
आणि शेवटीं

# सार्वजनिक जीवन

या लोकप्रिय अजोड शब्दांना
शिव्या देत मी खालीं बसलों.

सकाळची सात वाजायची वेळ, 'टाइम्स' वाचीत मी बिछान्यावर लोळत पडलों होतों. माझा हा नेहेमीचाच शिरस्ता आहे. इतक्यांत दाराबाहेरची घंटा वाजली. आणि नोकर आंत मला सांगायला आला कीं, "कुणीतरी पाच सात माणसं भेटायला आलीं आहेत." इतक्या सकाळीं कशाला येतात हीं माणसें दुसऱ्याला त्रास द्यायला कोणास ठाऊक अशा त्रासिक नजरेने मी माझ्या नोकराकडे पाहिलें आणि "बसव त्यांना दिवाणखान्यात" असें अर्धवट शब्दांनीं नि अर्धवट खुणेनें त्याला सांगितलें.

पांच मिनिटांनी मी दिवाणखान्यांत गेलों तों दिवाणखाना अगदीं भरून गेला होता. पाच सात कां म्हणालों आट नऊ माणसें होती. खेडेगांवचीं माणसें होतीं तीं. लांबून कोणत्या तरी जिल्ह्यांतून आलीं होती. बरोबर त्यानीं माझ्या परिचयाचीं मुंबईतील दोन तीन माणसेंही आणलीं होती.

'आतांच उठला वाटतं?" त्यापैकीं एक जण मुद्दाम हंसूं उकरून काढावें तसा चेहेरा करून मी आंत येतांच मला म्हणाला.

मी कांहीं बोललोंच नाहीं.

"आम्हांला वाटलं इतक्या लौकर तुम्ही उठला असाल कीं नाहीं कोणास ठाऊक?" पहिल्या माणसापेक्षां जास्त मोठ्यानें हंसून दुसऱ्यानें पृच्छा केली.

त्याला एक चांगला तडाखा देण्याचा विचार क्षणार्ध माझ्या मनांत डोकावला. पण ता तसाच दाबून अगदीं थंड स्वरांत मी विचारलें, "काय. विशेष कांहीं काम?"

"काम म्हणजे—तुमच्याकडें दुसरं काय काम असायचं—" तिसरा माणूस आणखी वरच्या पट्टींत हंसून बाहेरगांवाहून आलेल्या त्या माणसापैकीं एका कडे वळला व त्याला म्हणाला, "गणपतराव, कुठें आहे तुम्ही आणलेलें पत्र?"

गणपतरावांनीं आपल्या शरीराची एक बाजू उंच करून कडोसरीला खोचलेला एक मळकट रंगाचा घडीदार कागद बाहेर काढला. आणि त्याच्या घड्या साफ करून अन् त्याला जास्त सभ्य स्वरूप देऊन तो माझ्या हातांत ठेवला.

"रामभाऊनीं आम्ल्याला पत्र दिलं आहे" दुसऱ्या एका माणसानें हलकेंच खुलासा केला.

पत्राच्या तळाशीं केलेल्या लपेटदार मोडी सहीची गुंतावळ किलकिल्या डोळ्यांनीं सोडविण्याचा निष्फळ प्रयत्न करीत मी म्हणालों, "रामभाऊ? रामभाऊ कोण?"

त्याबरोबर गणपतराव चटकन् उत्तरले, "रामभाऊ कुळकर्णी, वकील हो. त्यांची न् तुमची तर फार दोस्ती आहे असे ते म्हणत होते."

"मुम्बईला आले म्हणजे ते तुमच्याकडेच उतरतात—" दुसरा म्हणाला.

'परवा त्यांच्या मुलीचें लग्न झालें तेव्हां त्यांनीं तुम्हांला आमंत्रण धाडलें होतें बघा." तिसरा म्हणाला, "अन् तुम्हीही येणार होता पण आयत्या वेळीं तुमची कांहीं तरी भानगड निघाली अन् तुम्हीं तार पाटविलीत कीं येता येत नाहीं म्हणून—गांवकऱ्यांची फार निराशा झाली त्यावेळीं—"

"असं असं, म्हणजे आपले रामभाऊ कुळकर्णी वकील म्हणता होय? असें उंचेले गोरटेले आहेत तेच ना?" कांहींतरी बोलायचें म्हणून मी बोलून गेलो.

"उंचेले कुठले?" गणपतराव मध्येच म्हणाले, "अहो बुटकेले अन् काळगेले आहेत बघा—तुमच्या तोंडवळ्याशी त्यांचा तोंडवळा जुळतो—अन् वयानें देखील तुमच्या एवढेंच असतील!"

"अगदीं!" गणपतरावांचा दुसरा एक गांवकरी म्हणाला, "रामभाऊंना परवांच त्रेसष्ठावें वर्ष लागलं!"

त्या नाकाडल्याच्या नाकाचा कडकडून चावा घ्यावा असें त्यावेळीं मला वाटलें.

इतक्यांत मुंबईकर माणूस कौतुकाचा वाजवीपेक्षा जादा आविर्भाव तोंडावर आणून हळूच पुटपुटला, "तुम्हांला किती एकसष्टावें का बासष्टावें—"

"बावन्नावें—" मी शांतपणें उद्गारलों. माझ्या वयाची त्यांनीं चालविलेली आगंतुक चिकित्सा मला अगदीं असह्य झाली.

"पण चेहऱ्यावरून तर तुमची चाळीशी देखील ओलांडलेली वाटत नाहीं. का हो शकराव?" दुसऱ्या एका मुंबईकरानें त्याच्या खुर्चीच्या दांड्यावर बऱ्याचशा कष्टानें बसलेल्या एका माणसाच्या पाठीवर थाप मारून त्याचें मत विचारलें. पण तो उत्तर द्यावयाच्या आंतच खुर्चीच्या दांड्यावरून खालीं निसटला.

तिकडे दुर्लक्ष्य केल्यासारखें करून माझ्या इतक्या परिचयाचे 'रामभाऊ कुळकर्णी' ही व्यक्ति कोण असावी ह्याचा मी मनांतल्या मनांत विचार करूं लागलों. 'कुळकर्णी' आडनावांच्या शाळेमधल्या अन् कॉलेजमधल्या सर्व वर्गबंधूंचे आणि त्यानंतर आतापर्यंत भेटलेल्या सर्व माणसांचे चेहेरे मनांतल्या 'रुपेरी पडद्या' वर मी चटकन् सरकवून पाहिले. पण त्यामध्यें हे 'त्रेसष्ट वर्षांचे बुटकेले अन् काळगेले रामभाऊ कुळकर्णी वकील' कांहीं मुळा आढळून येईनात. तेव्हां तो नाद सोडून देऊन मी त्यानीं मला लिहिलेलें ते पत्र स्वतःशीं वाचूं लागलों.

पहिल्याच संबोधनाशी मी ठेचाळलों "परमपूज्य देशकार्यधुरंधर साहित्यमुकुटचिंतामणि भाऊसाहेब ह्यांच्या चरणसेवेशीं—"

"भाऊसाहेब!" भातांत एकदम खडा लागावा तसा अडखळून मी मधेंच थांबलों, "भाऊसाहेब कोण?"

"तुम्हांला ते भाऊसाहेब म्हणतात—" गणपतरावांनीं मधेंच हंसून खुलासा केला. 'ठीक आहे' मी मनांतल्या मनांत पुटपुटलो. बोलून चालून मी सार्वजनिक मालच कीं नाहीं? तेव्हां कुणीही मला वाटेल तीं नावें ठेवावींत, भाऊसाहेब नाहीं तर दाजीसाहेब—मी पुढें वाचूं लागलों,

"आमच्या गांवीं सालाबादप्रमाणें श्री. काळभैरवनाथ ह्यांची वार्षिक जत्रा भरत असते. आंजूबाजूच्या दहा कोसांतली दहावीस हजार माणसें जमत असतात. अशा प्रसंगीं आपल्या सारख्या थोर आणि विद्वान् देशभक्ताच्या तोंडून निघणाऱ्या ज्ञानामृताचा फायदा जनतेला मिळावा अशीं सर्व गांवकरी मंडळींची इच्छा आहे. आपण ह्या भागांत आजपर्यंत कधी आलेला नाहींत. आपला लौकिक अनेक वर्षांपासून आमच्या कर्णरंध्रावर आदळत आहे. आपल्याला बघण्यासाठीं आणि आपलें व्याख्यान श्रवण करण्यासाठीं आम्हीं सर्व मंडळी चक्रवाक पक्ष्याप्रमाणें डोळ्यांत तेल घालून अक्षरशः वाट पहात आहोंत. आपण न आल्यानें हजारों लोकांची निराशा होईल. तरी आमच्या गावीं या निमित्तानें आपली पायधूळ झाडण्याचे आमच्यावर उपकार करावेत. याच मुहूर्तावर एक मोफत वाचनालय आणि तालीम सुरू करण्याचा गावकऱ्यांचा विचार आहे. वाचनालयाचें उद्घाटन तुमच्याच हस्तें करण्याचा आणि तालमीच्या इमारतीचा दगड तुमच्याच हातून बसविण्याचा मंडळीचा विचार आहे. आपण येणार असें गृहीत धरूनच आम्हीं आपले नाव आमच्या जाहीरातींत आणि पत्रकांत जाहीर केलें आहे. इ. इ." मी पत्र वाचीत असताना मला बोलावण्यास आलेले 'गांवकरी मंडळी'चे ते पांचसात प्रतिनिधी अत्यंत केविलवाणीं तोंडें करून माझ्या चेहेऱ्याकडे बघत होते.

पत्र वाचून मी तें खालीं टेबलावर ठेवतों आहे नाहीं तोंच गणपतराव लगटपणाच्या स्वरांत म्हणाले, "रामभाऊनीं मला सांगितलंच कीं माझें पत्र वाचल्यावर नाहीं म्हणावयाची भाऊसाहेबांची मुळीं छातीच नाहीं—"

"माझें नांव भाऊसाहेब नाहीं" मी मध्येंच दुरुस्ती केली.

"तेंच तें—जें काय असेल ते" गणपतराव दांत विचकून मोठ्यानें हंसण्याचा प्रयत्न करून म्हणाले.

"पुढल्या सोमवारपासून जत्रा सुरूं होते." दुसरे एक ग्रामस्थ म्हणाले, "अन् शनिवारीं संपते. सहा दिवसांपैकीं कोणत्याही एका दिवशीं आपण आला तरी चालेल—"





अनुक्रमणिका

"आहीं-नाहीं-कोणत्याही दिवशी करें ?" तिसरें एक जण सात्त्विक आवेशाचा आव आणून म्हणाले, "यात्रेच्या पहिल्या दिवशींच साहेबांचं आम्हाला व्याख्यान ठेवायचं आहे. त्या दिवशीं तर खरी गर्दी जमणार. मागाहून गर्दी ओसरल्यावर साहेबांना तिथं कशाला न्यायचंय" तो हातानीं अभिनय करून पुढें कांहीं तरी 'चमत्कारिक' बोलणार होता. पण त्यानें कसेंबसें स्वतःला आवरलें. मीही सुटकेचा एक मोठा निःश्वास टाकला.

"गांवकरी लोकांनी तर आम्हांला साफ सांगितलं" चौथे एक जण म्हणाले "कीं हे साहेब जर आले नाहींत तर आम्हांला दुसऱ्या कोणाचीं मुळीं व्याख्यानंच ऐकायचीं नाहींत. अहो, असतील दुसरे पुष्कळ व्याख्यानें देणारे पैशाला पासरीभर-त्यांना काय चाटायचंय-"

"गेल्या वर्षी पुण्याच्या शनवारवाड्यासमोर साहेबांचं व्याख्यान होतं. काय गर्दी-काय गर्दी ! मी होतो ना तिथं-कसली सभा होती बघा-कांहीं आठवत नाहीं-" डोकें खाजवीत पांचवा म्हणाला.

अजून कोणाला कांहीं बोलायचं असल्यास बोलून घ्या अशा अपेक्षेनें मी सर्वांच्या तोंडाकडे क्रमशः पाहिले. पण त्यानंतर आतां मी बोलावें अशी त्यांची अपेक्षा दिसली. तेव्हां मला बोलायला संधि दिल्याबद्दल मनांतल्या मनांत त्यांचे आभार मानून मी म्हणालो, "तुमच्या रामभाऊ कुळकर्णी वकीलांना कळवा कीं म्हणावं तुमचं पत्र पावलं. आभारी आहे. पण कामाच्या गर्दीमुळें यंदा कांहीं मला येता येत नाहीं-माफ करा म्हणावं.

त्याबरोबर डोक्यावर पुटई कोसळून पडावी असें सर्वांनीं चेहरे केलें, आणि एकमेकांकडे मोठ्या दुःखानें बघूं लागले.

मुंबईकर म्होरक्यापैकीं माझ्याशीं विशेष सलगी दाखवणारा एक जण म्हणाला, "नाहीं, नाहीं साहेब अं. हैं-हैं, नाहीं चालायचं. आमच्यासाठीं तरी तुम्हांला ह्यांना 'हो' म्हटलंच पाहिजे."

दुसरें मुंबईकर म्हणाले, "आम्ही तर ह्या मंडळींना सांगितलं कीं साहेब दुसऱ्यांना काय वाटेल तें म्हणोत पण आम्ही तर त्यांना हात धरून घेऊन आल्यावाचून राहणार नाहींत !"

"कामाची गर्दी तर साहेब आपल्यामागें नेहमीं असायचीच" तिसरे मुंबईकर म्हणाले. "पण तेवढ्यांतल्या तेवढ्यांत एका दिवसासाठीं सवड काढायची दुसरे काय ? शहरांतल्या लोकांना तर आपलीं व्याख्यानं ऐकायला नेहमींच मिळतात. त्यांना एक दिवस नाहीं आपलं व्याख्यान ऐकायला मिळालं तर त्याचं कांहीं विशेष होणार नाहीं. खेडेगांवच्या लोकांसाठीं एवढी तसदी आपण घेतली पाहिजेत-"

"ते सगळं खरं" मी वेडेवांकडे तोंड करीत म्हणालो, "पण मला मुंबईबाहेर जायला या महिन्यांत मुळीं वेळच नाहीं त्याला मी तरी काय करूं-"

"आतां तुम्ही असं म्हटल्यावर आमची कंबरच मोडली. नाहीं का ?" आपल्या ग्रामस्थ बंधूकडे पहात गणपतराव म्हणाले. सगळ्यांनीं त्यांच्या म्हणण्याला होकार देऊन कंबर मोडल्याचा अभिनय केला. "म्हणजे गांवाला परत जायची आतां आम्हांला सोयच राहिली नाहीं. गांवकरी पायताणानं आमची थोबाडंच फोडतील !"

"असं नका करूं साहेब !" दुसरा एक जण अगदीं पाया पडल्याचा अभिनय करून म्हणाला, "आम्हीं एक दिवसापेक्षां तुमचा जास्त वेळ मुळींच घेणार नाहीं. तुम्हीं इथून शनिवारी रात्रीं दहाची गाडी घ्या. सोमवारीं सकाळीं दहाला तुम्ही आमच्या गांवांत पोहोंचाल. जेवण झाल्यावर दोन तास



अनुक्रमणिका

खुशाल विश्रांति घ्या. संध्याकाळचं व्याख्यान झालं, तुमचं की तुम्हांला साडेसाताच्या गाडींनं बसवून देतो कीं मंगळवारीं सकाळीं सात वाजतां पुन्हां इथं आपले परत!"

"नाहीं तर, तुम्ही म्हणत असाल तर इथून तुम्हांला स्पेशल मोटारनें घेऊन जाण्याची आम्हीं व्यवस्था करतो." तिसऱ्या गृहस्थानें सुचविलें.

"विमानाची सोय असती, तर आम्ही विमानानें देखील तुम्हांला घेऊन गेलों असतो!" चौथा मोठ्यानें हसून म्हणाला. त्याला सर्वांनी खदाखदा हंसून साद दिली.

"पण काय वाटेल तें झालें तरी आम्ही तुम्हांला घेऊन हें जाणारच!" समोर येऊन गणपतरावांनी आपल्या मांडीवर जोरानें थाप मारली.

इतक्यांत दाराची घंटा जोरानें वाजली. आणि कोणातरी दोन गृहस्थांना घेऊन नोकर आंत आला.

दिवाणखान्यांत असलेल्या माणसाकडे दुर्लक्ष करावयाला हीं चांगली संधि आहे अशा भावनेनें मी आलेल्या गृहस्थापैकीं एकाला डोळ्यांनीं खुणावून विचारलें, "काय हो, कां आलांत?"

"पंढरपूरच्या उत्सवांत तुमचा कार्यक्रम ठेवावा अशी आमच्या चाळींतल्या सर्व लोकांची इच्छा आहे." तो बोलूं लागला. त्याला मधेंच थांबवून मी म्हणालो, "गणपतीला अजून पुष्कळ अवकाश आहे. पुढं बघूं. पुन्हां केव्हां तरी मला ऑफिसांत भेटा नाहीं तर पत्र टाका—" तेव्हां तो गृहस्थ पुढें कांहीं न बोलतां नमस्कार करून तसाच निघून गेला. पण त्याच्याबरोबर आलेला दुसरा गृहस्थ मात्र तसाच रेंगाळत मागे राहिला. तेव्हां मी आश्चर्यानें त्याला विचारलें, "काय हो, आपलें काय काम?" तेव्हां तो माणूस अर्धवट दांत विचकून म्हणाला, "मी इथं एक पत्र ठेवून गेलों होतो परवा. आपण वाचलेंच असेल. आज रात्रीं आमच्या क्लबचें नाटक आहे. आपण अध्यक्ष आहात. तेव्हां आपल्याला आठवण करून द्यायला आलों होतो."

"तुमच्या क्लबच्या नाटकाचा मी अध्यक्ष आहे?" घेरी आल्यासारखे डोळे फिरवीत मी म्हणालों, "मला माहीत नाहीं."

"आपल्याकडून पत्राचें उत्तर आलें नाहीं म्हणून आम्हीं गृहीत धरलं कीं आपणाला आमची विनंति मान्य आहे." त्या गृहस्थानें अगदीं सरळ माझ्यावर चाल केली.

"हें पहा, मला तुमचा क्लबही माहित नाहीं आणि नाटकही माहीत नाहीं." मी चिडून म्हणालों, "अन् शिवाय आज रात्रीं मला वेळही पण नाहीं—"

"पण तुम्ही आला नाहींत तर लोकांची फार निराशा होईल—" तो गृहस्थ लोचटपणें मधेंच उद्गारला.

"होऊंद्या लोकांची निराशा झाली तर" मी माघार न घेतां बोललों, "लोकांच्या सर्वच आशा सर्वकाळीं पूर्ण झाल्या पाहिजेत असं थोडंच आहे—"

"पाच मिनिटें येऊन गेला तरी चालेल" त्या गृहस्थानीं शेवटचा खडा टाकून पाहिला.

फार हुज्जत त्याच्याशीं घालण्यांत अर्थ नाहीं, असा विचार करून मी म्हणालों, "ठीक आहे. जाईन डोकावून मी जमल्यास तरी अंकाच्या मधल्या सुट्टींत."

तो गृहस्थ खूष होऊन निघून गेला. मी समोर बघूं लागलों. दोन संकटें मी कशीबशीं टाळली. पण 'काळभैरवनाथा' च्या जत्रेचें जें संकट आधींपासून मला वेढा घालून बसलें होतें, तें कांहीं टळलें नव्हतें. उलट, तें गळ्यांत पडण्याच्या अगदीं बेतांत आलें होतें.

"मग आमचं काय ठरलं?" गणपतरावांनीं आपला लगादा पुन्हां निकरानें सुरू केला.

"अहो. आपलं काय ठरायचंय? आपलं ठरलंच!" एका मुंबईकरानें माझ्या वतीनें गणपतरावांना परस्पर उत्तर देऊन टाकलं.

"रविवारीं साहेबांना घेऊन जायला तुम्ही आपला माणूस पाठवा अन् त्याना खुशाल घेऊन जा." दुसऱ्या मुंबईकरानें पहिल्याला सांथ दिली.

"चला उठा!" तिसरा मुंबईकर आणखी पुढं जाऊन म्हणाला, "साहेबांच्या पाठीमागें सत्रा हजार कामें. त्यांना डोकं खाजवायला वेळ नाहीं. अन् आपण कशाला त्यांचा आणखी वेळ घ्या—"

त्याबरोबर सगळे एकदम उठले.

गणपतराव म्हणाले, "मग आम्ही आज जातो संध्याकाळा, अन् ह्या किशाला ठेवून जातो इथं तुमच्यासाटीं—"

"तुम्ही खुशाल जावा! मी अगदीं नक्की साहेबांना घेऊन येतो!" स्वयंसेवकासारखा खादीचा पोषाख केलेला खप्पड गालाचा किशा मोठ्या उत्साहानें किंचाळला.

मला निसटायला त्यानीं कुठें फटच ठेवली नाहीं. दिवाणखान्यातून बाहेर जातां जातां त्यापैकीं एक जण आठवण झाल्यासारखा चेहेरा करीत मागें वळून म्हणाला, "अन् हो साहेब, आमच्या गांवातल्या मुलानीं बंगाल फंडासाटीं तुमचं एक नाटक करायचं टरवलं आहे. त्याची आम्हांला परवानगी पाहिजे आहे."

"अरे, त्याची कशाला परवानगी मागायची आहे?" मुंबईकरानें मधें बोलायची तेवढी सुद्धां संधि गमावली नाहीं, "साहेबांनीं आपलीं नाटकं करायची साऱ्या जगाला परवानगी देऊन टाकली आहे—" त्याच्याकडे दुर्लक्ष्य करून मी शांतपणें म्हणालों, "परवानगीबद्दल तुम्हांला पंचवीस रुपये द्यावे लागतील—"

"पण बंगाल फंडासाठीं नाटक आहे साहेब" पहिला माणूस म्हणाला.

"बंगाल फंडाला मी तुमच्या आधी मदत केली आहे. तुम्हांला करायची असेल तर तुम्ही करा, तेवढ्यासाटीं माझ्या खिशांत पुन्हां तुम्ही कशाला हात घालताहात?" मी किंचित् चिडून म्हणालो.

इतक्यांत पुढें गेलेले गणपतराव मागें वळून आंत आले आणि म्हणाले, "असं करा साहेब, तुम्ही ह्या वेळेला आम्हांला फुकट परवानगी द्या. दुसऱ्या वेळेला आम्हीं तुमचं नाटक केलं तर पंचवीसच काय पन्नास रुपये आम्ही तुम्हांला देऊं—"

"होय साहेब!" बाकीच्या सगळ्या ग्रामस्थानीं अगदीं 'कोरसां'त 'होकार' दिला.

"बरं आहे तुम्ही म्हणतां तर–" ओठांतल्या ओठांत मी अर्धवटपणें पुटपुटलों. काळभैरवनाथवाले खूष झाले आणि मला नमस्कार करून निघून गेले. घड्याळांत दहा वाजून गेले होते. 'टाईम्स' वाचायचा तसाच राहिला होता. आठवड्याच्या लेखाचा आरंभ त्या दिवशीं करायचे मी ठरविलें होतें. पण सकाळ तर जवळ जवळ सगळी संपून गेली होती. 'लोक' ह्या सामान्य नामाला मनातल्या मनांत कांहीं तरी शिव्या पुटपुटत मी डोक्यांत असलेल्या कांहीं विचारांचीं सूत्रें गोळा करू लागलों तोंच पोस्टमननें दार खडखडावलें. एक मनिऑर्डर येणार होती ती आली असावी या आशेनें मी स्वतःच दार उघडलें. पण पत्र किंवा मनिऑर्डर या पैकीं कांहींच घेऊन पोस्टमन आला नव्हता. मी विचारलें, "काय?"

अगदीं लाडिकवाण्या आवाजांत पोस्टमन म्हणाला, "आज आपला सिनेमा लागलाय त्या ह्या थेटरांत. पास पाहिजे होता."

"किती माणसांचा?" मी निर्विकार मुद्रेनें विचारलें.

"चार!" हाताचीं चार बोटें वर उडवीत पोस्टमन उद्गारला.

टेबलावर पडलेल्या कागदाचा एक कपटा फाडून त्यावर 'चार माणसांचा पास' मी घाईघाईनें खरडला आणि पोस्टमनच्या हातांत टाकून दार एवढ्या मोठ्यानें लावलें कीं म्हटलें त्यापासून त्याला कांहीं तरी बोध व्हावा. त्या पोस्टमनला काय वाटलें असेल कुणास ठाऊक? दार बंद असल्यानें मला कांहीं त्याचा चेहेरा पहावयाला मिळाला नाहीं.

रविवार उजाडायला कांहीं फार दिवस लागले नाहींत. किशानें तर सकाळपासून येऊन घरांत मुक्काम ठोकला. रविवारीं संध्याकाळीं परगांवला जावयाचें ह्या विचारानें मी सकाळपासून अगदीं अस्वस्थ होऊन गेलों. त्यामुळें त्या विश्रांतीच्या दिवसाचें अगदीं वाटोळें होऊन गेलें. मनाला थोडीशी कांहीं तरी उसंत मिळाली असती, पण किशा यमदूतासारखा दिवसभर समोर वावरत होता. आणि मधून मधून आपल्या गावचें 'राजकारण' मिटक्या मारीत मला वर्णन करून सांगत होता. रात्रीं नऊ वाजता मी नोकराला टॅक्सी बोलवायला सांगितली. सुतळीनें करकचून आवळून बांधलेली एक छोटीशी वळकटी खांद्यावर मिरवीत किशा माझ्या अगोदर टॅक्सींत जाऊन बसला. आणि स्टेशनावर गाडी थांबतांच उडी मारून माझ्या आधीं बाहेर पडला.

"तिसऱ्या क्लासांत लई गर्दी होते. मी जाऊन माझी जागा पकडतो. तुम्ही तिकीट काढून आपल्या डब्यात बसा. मीही आलोंच!" असें घाईघाईनें बोलून किशा स्टेशनाबाहेरच्या अंधारांत आणि गर्दीत एकदम अदृश्य झाला. मला त्याला जें कांहीं सांगायचें होते तें तसेंच माझ्या तोंडांत राहिलें. टॅक्सीवाल्याला मी पैसे देऊन सेकंड क्लासचें तिकीट काढलें आणि प्लॅटफॉर्मवर जाऊन गाडीची वाट पहात बसलों. गाडी उशीरानेंच आली आणि जी आली ती अगदीं भरून आली. अंधारांत सेकंड क्लासचा डबाही मला सांपडेना. शेवटीं गाडी सुटायच्या आधीं एक मिनिट एका डब्यांत मला वरची जागा कशीबशी मिळाली. किशाचा तर पत्ताच नव्हता. मी वर चढून माझी वळकटी सोडतो आहे तोंच गाडी सुरू झाली. अर्धा पाऊण तास झाला तरी मला कांहीं झोप येईना. खालीं झोपलेल्या माणसाला "दिवा विझवू कां?" म्हणून मी विचारलें. तो म्हणाला, "असूं द्या कीं," माझ्या वजनानें वरचा 'बर्थ' तुटून आपल्या अंगावर पडणार ह्या भीतीनें तो भेदरून गेल्यासारखा मला दिसला. तेव्हां जें काय व्हायचें तें उजेडांतच झालेलें बरें ह्या विचारानेंच दिवा विझवायला तो कबूल नसावा.

'सार्वजनिक जीवनामुळें माणसाच्या आयुष्याची होणारी परवड' या विषयावरील निरनिराळ्या मुद्यांचा स्वतःच्या मनाशीं विचार करीत असतां केव्हां मला झोप लागली तें मला कळलेंच नाहीं. पहाटे पाच वाजायच्या सुमारास कुठल्या तरी एका लहानशा स्टेशनवर गाडी थांबली होती. मला एक भयंकर स्वप्न पडत होते. आमचे एक लहानपणचे मारके मास्तर माझ्या हातावर सपासप छड्या मारून मला विचारीत, "जाशील का पुन्हां व्याख्यानाला–जाशील?" आणि मी मोटमोठ्यानें किंचाळ्या मारून त्यांना सांगत होतो कीं, 'नाहीं–आतां नाहीं जाणार!" इतक्यांत किशानें डब्याचें दार जोरजोरानें खडखडावयाला सुरुवात केली. मी दचकून जागा झालों. आणि घाई घाईनें खालीं उतरलों.

"साहेब, आले स्टेशन, उतरा लौकर. नाहीं तर गाडी सुटेल." डब्याला जणु कांहीं आग लागली आहे अशा स्वरांत किशा बाहेरून ओरडत होता.

मी माझें सामान घाईघाईनें बाहेरच्या अंधारांत फेकून दिलें आणि डब्यांतून प्लॅटफॉर्मवर उडी मारली. बाहेर अजून चांगलाच अंधार पसरला होता. दोन तीन माणसें डोक्यावरून आणि अंगावरून उपरणीं घेऊन कुडकुडत उभीं होतीं. मी तो 'मीच' आहे अशी त्यापैकीं एकानें खात्री करून घेतली आणि आपल्या उपरण्याखालून वाळलेल्या शेवंतीचा एक लहानसा एकपदरी हार झटकन् बाहेर काढला अन् घाईघाईने माझ्या गळ्यांत घालून तो किरट्या आवाजाने ओरडला, "महात्मा गांधीकी जय!"

मी रागावून म्हणालों, "महात्मा गांधींचा इथें काय संबंध?"

तेव्हां त्यानें चटकन खुलासा केला, "कांहीं तरी ओरडाया पाहिजे नग का?"

त्या प्रश्नानें मी निरुत्तरच झालों. मला जिथें जायचें होतें तें गांव स्टेशनापासून दहा पंधरा मैल दूर होतें.

किशानें हार घालणाऱ्या माणसांला दरडावून विचारलें. "शिरपतराव, रामलालची मोटर घेऊन आलांत ना?"

शिरपतराव विव्हळत विव्हळत म्हणाले, "अहो कसंची मोटर अन् काय घेऊन बसलां आहांत राव. आठ दिवस झाले. रामलालची मोटर 'पंचर' होऊनशान पडली आहे. तवा पाटलाची गाडी घेऊनशान आलों. ह्या विनाना-मोटर्सींचा कुठं काय भरंवसा असतो व्हय राव? आपली पहिली बैलांची गाडी तीच खरी!"

"अन् गांवाबाहेरून बावन बैलांच्या गाडींतून मिरवणूक काढायचं काय झालं?" किशानें पुन्हा दुसरा प्रश्न केला.

"अन् ते कशाचं ज्मायचंय आतां?" शिरपतराव आपल्या विव्हळण्याचा सूर अधिक वाढवून म्हणाले, "त्यो लाळंचा रोग झालाय म्हां समदया बैलांना!"

पाटलाची गाडी जुंपून स्टेशनावरून निघायला चांगले आठ वाजले. गाडीला तट्टया नव्हता. आंत चौघेजण दाटीवाटीनें कसेतरी आम्ही बसलों. खालून गाडीचे एकसारखे धक्के खात आणि वरून उन्हाचे चटके सोशीत आम्ही अकरा वाजायच्या सुमारास कसेबसे एका गांवठणांत येऊन पोहोंचलों. सकाळपासून माझ्या पोटांत कांहीं नव्हतें आणि त्यांत वरून उन्हाचा मारा. त्यामुळें माझा जीव अगदीं कासावीस होऊन गेला होता. गांवाच्या बाहेर एक पिंपळाचा पार होता. त्यावर दहाबीस माणसें आमची वाट पहात बसलीं होतीं. त्यांत मला पूर्वी येऊन भेटलेले गणपतराव आणि त्यांच्या बरोबर आलेलीं कांहीं माणसें, ह्यांचे चेहरे मीं तावडतोब ओळखलें.

"काय व्यवस्थित झाला ना सगळा प्रवास?" सस्मित मुखानें माझें स्वागत करीत गणपतराव म्हणाले, "या, रामभाऊ या. असे मागें कां?

आपल्या पडक्या दांताचे प्रदर्शन करीत एक पांढऱ्या केंसांचे 'बुटकेले आणि काळगेले' गृहस्थ हात जोडीत पुढें आले. मला चिठ्ठी लिहिणारे रामभाऊ कुळकर्णी वकील ते हेच हें मीं तावडतोब ओळखलें.

"कां, आतां तरी ओळख पटली की आमच्या रामभाऊंची?" गणपतरावांनीं मला विचारलें. पण मीं उत्तर द्यायच्या आधींच रामभाऊंनीं तावडतोब खुलासा केला, "माझा ह्या बाबतींत थोडासा गैरसमज झाला. हे नाहीं, ह्यांचे थोरले बंधु माझ्या वर्गात होते."

"मला थोरले बंधु नाहींत. मीच थोरला!" मी थंडपणें म्हणालों.

जेवणें झाल्यानंतर वळकटी अंथरून मी तिजवर कुठें कलंडतो आहे तोंच रामभाऊंचा वंशवेल पुन्हां माझ्या भोंवती वेढा घालून बसला. झाडून सगळ्यांनीं आपापल्या शाळेंतील वह्यावर किंवा कागदाच्या तुकड्यावर माझ्या स्वाक्षर्‍या घेतल्या. बंड्यानें आपल्या वर्गाच्या हस्तलिखितावर माझा अभिप्राय लिहून घेतला. सद्यानें 'यंदाच्या गणपतीच्या मेळ्यासाटीं आम्हांला विनोदी संवाद लिहून द्या' असा तगादा लावला. यमीनें 'मला आवडणारें पुस्तक' या तिच्या वर्गाच्या बाईनें लिहावयास सांगितलेल्या निबंधाचें मुद्दे माझ्याकडून टिपून घेतले आणि सद्यानें 'लोकसत्ते' मधले चालू आटवड्याचे कोडे माझ्याकडून सोडवून घेतले. इतके होतां होतां पांच वाजले. व्याख्यानाचे बोलावणें घेऊन किशा आणि त्याचे चार पाच स्वयंसेवक आले. कपडे करून मी, रामभाऊ सौ. सीताबाई, त्यांची सर्व मुलें आणि वाटेंत आम्हांला येऊन मिळणारे दहावीस लोक असे आम्ही पायीं चालत चालत काळभैरवनाथाच्या देवळाकडे गेलो. देवळासमोरच्या उघड्या पटांगणांत दोन चार हजार लोकांची सभा भरली होती. निरनिराळ्या दुकानाची पालें औंडक चौंडक पडलेली होती. दोन तीन रहाटगाडगीं मोटमोठ्यानीं करा करा आवाज करीत फिरत होती आणि त्याच्या पाळण्यांत बसलेले लोक मोटमोठ्यानें ओरडत होते. एका बाजूला एक पोवाड्याचा फड बसला होता. तर दुसर्‍या बाजूला कोणी तरी एक दाढीवाला बावाजी एकतारीवर मोटमोठ्यानें भजन करीत होता.

सार्‍या पटांगणांत एवढा गलगा, गडबड आणि आरडाओरड चालली होती कीं तो बाजार बघून माझी तर कंबरच खचून गेली. कुठून आपण ह्या लचाडांत सांपडलो असें मला होऊन गेलें.

"तुमचें एकदां व्याख्यान सुरू झालें म्हणजे हें सगळें एकदम शांत होईल !" माझ्या चेहेर्‍यावरून माझ्या मनांत काय विचार चालले असावेत त्याचा कयास बांधीत रामभाऊ म्हणाले.

एका वडाच्या झाडाखालीं लाकडाच्या फळ्याचें व्यासपीठ बांधून तयार केलें होतें. शेदोनशे माणसें व्यासपीठाभोंवतीं विरळ वर्तुळ करून बसलेलीं होती.

मी गणपतरावांना जरा टोंचून म्हणालो, "तुम्ही तर बोलला होता कीं व्याख्यानाला दहावीस हजारांची गर्दी होईल म्हणून—"

"दर वर्षी होते. विचारा ह्यांना. काय हो ग्यानबा ?"

आपल्या शेजारच्या एका माणसाचा दंड हालवून गणपतराव म्हणाले, "यंदा काय झालंय कोणास ठाऊक. रुपयांत दोन आणे जत्रा नाहीं—"

"त्यो लाळंचा रोग झालाया ना जनावरांना" ग्यानबानी यंदा जत्रा का कमी त्यांजवर आपल्या अकलेप्रमाणें प्रकाश टाकला.

"किशा, अरे गावांत जा अन् आणखी एकदा दवंडी पिटून या, म्हणावं व्याख्यानाला सुरुवात झाली." गणपतराव किशाच्या अंगावर खेकसून ओरडले. त्याबरोबर किशा "बघतां काय ? जा ना ?" आपल्या स्वयंसेवकाच्या अंगावर ओरडला, पण आपल्या जागेवरून तोही हालला नाहीं आणि त्याच्या हाताखालचे स्वयंसेवकही हालले नाहींत.

होतां होतां तास दीड तासानें आणखी शेदीडशें माणसें जमा झाली आणि मग सभेच्या कामाला सुरुवात झाली. कुस्त्या, बोथाटी, लेजीम इत्यादि आरंभीचे कार्यक्रम झाले आणि मी व्याख्यानाला उभा राहिलो. तेव्हां सात वाजून गेले होते. चोहोकडे अंधार पडला होता. आणि आजूबाजूचा गलगा पराकाष्ठेचा वाढला होता. आजपर्यंत आयुष्यांत मी नाना तर्‍हेच्या सभापुढें व्याख्यानें दिलीं होती. पण त्या दिवशींची ती सभा बघून माझी तर अगदीं दांतखिळी बसली. मी बोलायला सुरुवात करणार तोंच शेजारीं बसलेले रामभाऊ हलूच पुटपुटले, "आज मजा आली पाहिजे बरं का !" रामभाऊच्या टाळक्यावर फांगली एक थप्पड मारावी असें मला त्यावेळीं वाटलें. एक तासभर माझ्या तोंडाला जें येईल तें मी गुरमार्खे ओरडत होतो. मी काय बोलत होतो तें मलाही कळत नव्हतें आणि श्रोत्यांनाही फारसें समजत नव्हतें. तरी पण तें मधून मधून टाळ्या वाजवीत होते. भोंवतालचा खकाणा माझ्या नाकातोंडांत उधळत असल्यानें मी मधून मधून जोरानें खोकत होतो. तो माझा 'विनोद' आहे अशा समजुतीनें कांहीं श्रोते मोटमोठ्यानें हंसत होते. माझें व्याख्यान संपवून स्वतःला नि श्रोत्यांना शिव्या देत मी खाली बसलों तेव्हां साडेआठ झाले होते. रामभाऊंना मी म्हणालो, "आतां मला कांहीं जेवायचें नाहीं. लवकर मला आतां स्टेशनावर पोंहोचवा !" जसें कांहीं आपल्याला बोलतें माहितच नाही असा चेहेरा करीत रामभाऊ म्हणाले, "म्हणजे आतां तुम्ही जाणार ? मला वाटले इतक्या लांब आल्यासारखे दोन तीन दिवस तरी रहाल. आमच्या येथून चार पाच मैलावर पांडवलेण्यां आहेत. तीं पहाण्यासारखी आहेत—"

'पांडवलेणी गेलीं खड्ड्यांत !' असें मनांतल्या मनांत म्हणत मी गणपतरावांना म्हणालो, "गणपतराव, काय वाटेल ते झालें तरी आज रात्रीं मला परत मुंबईला गेलेंच पाहिजे !"

"पण मुंबईला जायला आतां गाडी कोणती ?" रामभाऊंनी शांतपणें विचारले.

"म्हणजे ? मुंबईला जायला आतां गाडी नाहीं ?" मीं घाबरून विचारलें.

"नवाची गाडी तर कांहीं आतां सापडणार नाहीं." गणपतराव म्हणाले, "सवाशांच आपण निघायला पाहिजे होत पण तुमच्या व्याख्यानाला रंग भरला. मधेंच तुम्हाला मला कांहीं थांबवितां येईना !"

"उद्यां सकाळची आठांची पॅसेंजर नक्की मिळेल तुम्हांला." रामभाऊ मला आश्वासन देत म्हणाले, "अन् तोंपर्यंत दुसरी मुळीं गाडीच आहे कुठं ?"

झालें. निकाल लागला. म्हणजे पुन्हा रामभाऊच्या घरांत जाऊन तेथल्या पोरवड्यांत रात्रभर मुक्काम करावा लागणार, ह्या विचारानें माझ्या अंगावर अगदीं शहारा आला. रामभाऊच्या फाटक्या धोतराचा डिकेमालीचा वास मला आठवला आणि ओंकारी येते आहे असें वाटलें. कुंडलींतल्या ग्रहांना मनांतल्या मनांत शिव्या देत मुकाट्यानें मी रामभाऊबरोबर गेलों. रात्रीं जेवण झाल्यानतर मी सौ. सीताबाईच्या तडाख्यांत सांपडलों. असहकारितेच्या मोहिमेपासून तों देशाला स्वातंत्र्य मिळेपर्यंतच्या सर्व [illegible] चळवळींवर त्यांनीं रचलेलें आपलें कवित्व मला आळवून आळवून आणि विव्हळून विव्हळून म्हणून दाखविलें. शेवटीं गांधीजींच्या मरणावरची नोहीं कविता वाचायला त्यांनीं सुरुवात केली. पहिली ओळ त्यांनीं उच्चारली तोंच त्या मोटमोठ्यानीं हुंदके देऊन रडायला लागल्या. रामभाऊंनीं तर हंबरडाच फोडला. आजूबाजूला सतरंजीवर लोळत असलेलीं आणि अर्धवट झोंपलेलीं मुलेंहा जागी होऊन किंचाळूं लागलीं. अशा परिस्थितींत आपण न रडतां तसेंच स्वस्थ बसून राहिलो तर तें हास्यास्पद दिसेल म्हणून मीहि डोळ्याला हातरुमाल लावून फुसफुसूं लागलों. गांधीजींच्या सीताबाईच्या कवितेचें वाचन संपल्याच्या सुमारास सांघिक आक्रोशाचा स्वर एवढा वाढला कीं, आजूबाजूच्या घरांतील लोक कांहीं तरी भलताच समज होऊन तेथें धावत आले आणि तेही त्या आक्रोशाच्या कार्यक्रमांत सामील झाले. सीताबाईचें 'काव्य रोदन' संपावयाला रात्रीचे दोन वाजले. सकाळीं सहा वाजतां गणपतराव गाडी घेऊन

येणार होते. पण बैलाच्या गाडीचा आवाज कानीं पडायच्याएवजीं मोटरच्या शिंगाचा आवाज ऐकूं आला. तेव्हां रामलालच्या गाडीचें पंक्चर दुरुस्त झालें असावें अशा समजुतीनें मी धडपडत उठलों. तों गणपतराव दारांतून माझ्या नांवानें ओरडतच आले. " हे दुनाखे मास्तर आले आहेत साहेब तुमच्याकडे. " ही काय नवी नवीन उमटली आहे ह्या विचारानें डोळे चोळीत चोळीत मी जपूं लागलों. त्या गांवापासून पंधरा मैलांवर असलेल्या दुसऱ्या एका गांवांतल्या 'ए. व्ही. स्कूल'चे दुनाखे हे हेडमास्तर होते. गणपतरावांनीं त्यांची माझी ओळख करून दिली. दुनाखे हंसून म्हणाले, " मी आपल्या एम. टी. सी. क्लासांतला आपला विद्यार्थी आहें. मुम्बईच्या पत्त्यावर मीं आपल्याला एक पत्र पाठविलें होतें. आपल्याला मिळालें नाहीं वाटतें ? "

मी म्हणालों, " नाहीं बुवा. कां ? " दुनाखे म्हणाले, " आज आमच्या शाळेचें गॅदरिंग आहे आणि अध्यक्ष म्हणून मी आपलें नांव जाहीर करून बसलों आहें—"

" अहो, पण आतांच्या गाडीनें मला गेलें पाहिजे दुनाखे. वास्तविक कालच रात्रीं मी जायचा." अगदीं रडकुन्डीला आलेल्या मुलाच्या स्वरांत मी बोलूं लागलों.

" तें काय वाटेल तें झालें तरी तुम्ही आज आमच्या समारंभाला आलें पाहिजे साहेब " दुनाखे तितक्याच रडक्या आवाजांत गयावया करून म्हणाले, " तुम्ही आलां नाहीं तर माझी अब्रू जाईल. तुम्ही समारंभाचीं आमंत्रणें स्वीकारतां आणि आयत्या वेळेला येत नाहीं असा आधींच तुमच्याबद्दल गैरसमज पसरलेला आहे. त्यांत तुम्ही न येण्यानें भर पडेल. आमच्या सोसायटीचा प्रेसिडेंट छातीवर हात मारून म्हणाले कीं तुम्ही येणें शक्य नाहीं. त्याच्याशी मी दहा रुपयाची पैज मारली कीं काय वाटेल तें झालें तरी भी त्यांना घेऊन आल्यावांचून रहाणार नाहीं."

" तेव्हां मी आलों नाहीं तर दहा रुपयांचा तुम्हांला चट्टा बसेल हेंच ना तुमचें म्हणणें ! " मी खिशातून दहा रुपयांची एक नोट बाहेर काढीत म्हणालों.

" तेवढ्यानें भागणार नाहीं साहेब. कदाचित् मला माझी नोकरी गमवावी लागेल ! " दुनाखे डोळ्यांत अश्रू आणून म्हणाले, " आदल्या रात्रीं अश्रूंच्या महापुरांत बुडतां बुडतां मीं वाचलों होतों. म्हणून पुन्हा अश्रूंचें दर्शन होतांच मी घाबरून दुनाख्याला एकदम होकार देऊन टाकला. " बरें आहे. " मी म्हणालों, " एवढंच असेल तर मी येतों."

" आपल्याला आम्ही यत्किंचित्ही तसदी देणार नाहीं. म्हणूनच मोटार घेऊन आलों आहें. समारंभ झाला कीं संध्याकाळच्या गाडीला आपल्याला सरळ स्टेशनावर पोहोचवतों. " दुनाखे म्हणाले. त्यांच्या डोळ्यांतले अश्रूबिंदू पार नाहींसे झाले आणि त्यांच्या चेहेऱ्याची कळी एकदम उमलली.

" बरें आहे साहेब, येतों." गणपतराव कोपरापासून हात जोडून म्हणाले, " आतां तुम्हांला आम्ही मास्तरांचे ताब्यांत दिलें आहे. आमच्या जबाबदारींतून आम्ही सुटलों. असाच दयालोभ ठेवा. अन् पुन्हा कधीं बोलावलें तर या ! "

माझ्या जाण्यायेण्याच्या खर्चाचें काय असें मी गणपतरावांना विचारण्याच्या आधींच स्वारी तडक पसार झाली. रामभाऊच्या घरांत आदला दिवस जसा गेला तसाच तो दिवस दुनाखे मास्तरांच्या घरांत गेला. दुनाखे मास्तरांच्या पंचाला डिकेमालीचा वास येत नव्हता अन् त्याची बायको कविता करीत नव्हती एवढाच काय तो फरक. आतां मुंबईला आपण केव्हां परत जाऊन पोहोंचणार ह्याचा विचार करावयाचेंच मीं सोडून दिलें. दुनाखे मास्तरांच्या शाळेचा समारंभ संपल्यानंतर त्यांच्या संस्थेच्या ज्या प्रेसिडेंटनें ' मी येणार नाहीं ' अशी दुनाखे मास्तरांशीं पैज मारली होती त्यांच्या 'जटाशंकर टॉकीज'चें उद्घाटन दुसऱ्या दिवशीं रात्रौ माझ्या हस्तें त्यांनीं करवून घेतलें. " इतक्या लांब तुम्ही आल्यावर तुम्हांला तसे आम्ही थोडेंच सोडणार आहोंत. " जटाशंकर परदेशी माझ्या गळ्यांत प्रेमानें हात घालून म्हणाले. मग माझी काय छाती होती 'नाहीं' म्हणण्याची ? बुधवार रात्रौ सिनेमगृहाचें उद्घाटन झाल्यानंतर गुरुवारी दुपारीं एक थाटाची मेजवानी देऊन त्या संध्याकाळीं शेटजींनीं मला आपल्या मोटरींतून एका स्टेशनावर आणून सोडलें. शेटजींना कांहीं महत्वाचें काम असल्यामुळें ते कांहीं मजबरोबर स्टेशनापर्यंत येऊं शकले नाहींत. दुनाखे मास्तरही आदल्या दिवसापासून कुठेंतरी बेपत्ता झाले होते. मुंबईपर्यंत तिसऱ्या वर्गानें परत जाण्याइतकेच पैसे माझ्या खिशांत उरले होते. गुरुवारीं रात्रीं मला कोणत्याही गाडींत जागा मिळाली नाहीं. जी गाडी यायची ती अगदी भरून यायची. सबंध भर मी स्टेशनवर तशी कुडकुडत घालविली. घसा बसला आहे, डोळे दुखताहेत, अंग ठणकतें आहे. अशा अवस्थेंत मी शुक्रवारीं रात्रीं साडेदहा वाजतां दादर स्टेशनवर येऊन पोहोचलों. बाहेर एक टॅक्सी नव्हती कीं व्हिक्टोरिया नव्हती. हमालाच्या डोक्यावर सामान देऊन मी रखडत रखडत अर्ध्या पाऊण तासानें घरीं आलों. वाटेनें गणपतराव, रामभाऊ, सीताबाई, दुनाखे मास्तर, जटाशंकर ह्यांना मी मनांतल्या मनांत काय शिव्या दिल्या असतील त्या इथें सांगतां येत नाहींत. घरीं येऊन कोचावर मी अंग टाकतों आहे तोंच टेलिफोनची घंटा वाजूं लागली. रात्रीच्या अकरा वाजतां टेलीफोन करणारा हा महात्मा कोण म्हणून मी टेलिफोन चिडून घेतला आणि ' कोण आहे ? ' म्हणून दरडावून विचारलें. तोंच माझा आवाज ओळखून दुसऱ्या बाजूनें कोणीतरी मोठ्यामोठ्यानें बोललें, " साहेब का ? आतां इथें त्या ह्याचें व्याख्यान होतें. पण ऐन वेळीं ते कांहीं आले नाहींत. तेव्हां तुम्हीं यावें असें लोकाचें म्हणणें आहे. फार नाहीं. अर्ध्या तासासाठीं तुम्ही आलांत तरी चालेल. लोक सगळे खोळंबून बसले आहेत. " मी कांहीं बोलण्याच्या आधींच " आलों मी आतां गाडी घेऊन " असें म्हणून त्या माणसानें टेलिफोनबंद देखील करून टाकला. माझ्या डोळ्यासमोर अंधारी आली. सारें जग माझ्याभोंवती फिरूं लागलें.

' तुमबिन कोन सहारा, प्रभुजी ! ' शेजारच्या घरांतल्या ' रेडिओ ' वरून आर्त स्वरांत कोणी तरी हें ध्रुवपद आळवीत होतें.



अनुक्रमणिका

वि. वि. बोकील



" मंगळसूत्र देखील घाटेंत तोडून, फेकून दिलं मी—आणि तुम्ही आतां म्हणतां—

# मला क्षमा कर...

तुम्हांला क्षमा करणं भाग आहे मला ! पण मला आतां कोण क्षमा करील ! "

लग्न झाल्या दिवसापासून आज दहा वर्षे मुक्ता तेंच करीत आली होती.

पूर्वेच्या बाजूला फटफटूं लागलं कीं चार घरांपलीकडे राहणाऱ्या फकिरा इस्माईलच्या खुराड्यांतून कोंबड्यांचा एकच आरडाओरडा होई. तो कानांवर पडला कीं मुक्ता डोळे चोळीत जाग्यावर उठून बसे. अंगावरचं मळकट पांघरूण दूर ढकली आणि त्याच पांघरुणानं शेजारींच अस्ताव्यस्त पसरलेल्या यशवंताला झांकून ठेवी. यशवंताची उमर चार वर्षं. त्याच्या पलीकडे पसरलेल्या भास्कराला यंदांच्या आखाडांत सातवं सरूवं आठवं लागलं होतं. भास्कराच्या पलीकडं काशिनाथपंत तोंड उघडं ठेवून घोरत पडलेले दिसायचे. पंतांचे वरच्या बाजूचे दोन दांत पडल्यामुळं श्वासोच्छ्वासाबरोबर येणाऱ्या वाऱ्यानं त्यांच्या करड्या मिशांचं झुडूप लयींत खालीवर होत असलेलं पाहून मुक्ता अंग शहारल्यासारखं करी आणि जागची उठून उभी राही.

मुक्ता कोठीच्या खोलींतून सैंपाकघराकडे जाई. काकी जागीच असे. तिला मुक्तेची चाहूल लागे, पण काकी मावसलुनेला सकाळच्या कामांत हातभार लावायला कधींच उठली नाहीं.

सैंपाकघरांतील काळ्याभिन्न झालेल्या भिंतींत ठमकलेल्या फुटक्या आरशासमोर उभी राहून मुक्ता दोन्ही हातांनीं केंस सारखे करी. अजून सैंपाकघरांत अंधारच असायचा. पण मग मुक्ता स्वतःशींच विचार करी कीं उजेड असून तरी काय दिवे लागणार या भिकार आरशाने?

कारण तो आरसा म्हणजे एक जाडशी कांच—एवढाच त्याचा अर्थ राहिला होता. मुक्तानं नवीन आरसा कधीं मागितला नाहीं—आणि पंतांनीं कधीं त्या आरशांत डोकावून पाहिलं नाहीं.

आधीं तो आरसा धड नव्हता. त्याच्या मूळच्या चौकोनाचे आतां सात कोन झाले होते. गवरीच्या आणि लाकडांच्या धुरानं त्याच्यावर राप चढला होता आणि दोन ठिकाणीं त्याला वेड्यावांकड्या चिरा गेल्या होत्या.

तरीपण नित्याची संवय म्हणून मुक्ता रोज सकाळीं त्याच्यापुढं उभी राही आणि आरशांत एकदांहि न पाहतां केस सारखे करी !

यंत्र !

यंत्राप्रमाणं राबण्याची तिला संवय लागून गेली होती !

चूल भरावी, गोठ्यांतल्या म्हशीसाटीं आंबोणाचं घमेल तयार करावं, म्हशीच्या पुढं एखादी कडब्याची पेंडी सोडावी आणि नंतर घरांत चुलीला पोतेरं घालावं—

तेंच तें पोतेऱ्यासाठीं राखून ठेवलेलं फुटकं भांडं. त्याला आतां आकार राहिला नव्हता, त्याचा रंग ओळखतां आला नसता किंवा त्याच्या खरेदीची वेळ कुणालाच सांगतां आली नसती. पोतेऱ्याचा बोळा तर हातांत धरण्याच्याहि लायकीचा नव्हता.

पण मुक्ता विनतक्रार रोज त्यानंच पोतेरं घाली.

डोक्यावर पदर घेऊन मुक्ता घराची झाडलोट करी आणि चांगलं दिसूं लागलं कीं एका गवरीच्या खांडावर चार थेंब रॉकेल ओतून ती परसदारीं पाऊल टाकी.

परसं विस्तीर्ण होतं. पण मन वेधून घ्यावं असं कांहींच त्यांत नव्हतं.

मध्यभागीं एक जुनाट विहीर, मोडका आणि सदैव कुरकुरणारा रहाट, आंघोळीसाठीं काळ्या पाषाणाचा एक भला जंगी शीलाखंड, आणि त्याच पाषाणाची एक कुंडी, जन्मात कधीं न वाळणारा पाण्याचा ओहोळ आणि एक प्रशस्त अळवाची खांच !

विहिरीपासून दहापंधरा हातावर तीन दगड मांडले होते. त्यांवर एक मोठा हंडा भकास मुद्रा करून टेकला होता. पोतेऱ्याच्या जुनाट पातेल्याप्रमाणें हंड्याचीहि विचारपूस करण्याची सोय नव्हती. तव्वल चार घागरी पाणी पोटांत पडलं तरी त्याचा गळा दाटून येत नसे.

हंड्याखालीं आजूबाजूच्या वाळक्या काटक्या सारून अग्नि प्रज्वलित करण्याचं दिव्य कठीण होतं. फुंकून फुंकून छाती भरून यावी, गाल दुखूं लागावे, धुरानं डोळे चुरचुरून लाल व्हावे, तेंव्हां कुठं अर्ध्या तासानं एखाद्या ठिणगीचं अस्तित्व समजून यावं !

दहा वर्षं मुक्ता हें करीत आली होती.

पण तिनं एका शब्दानं कधीं तक्रार केली नाहीं.

या साऱ्या गोष्टी तिच्या अंगवळणीं पडल्या होत्या. एक काम संपलं कीं दुसरं. दुसरं संपलं कीं तिसरं—

तिला कशाचा तिरस्कार वाटला नाहीं, त्रास झाला नाहीं, कांहीं नाहीं.

आजहि मुक्ता नेहमींच्याच निर्विकार मुद्रेनं विहिरीवर उभी राहिली होती. संथपणानं तिनं रहाटावरील दोरीचा फांस करून घागरीच्या मानेंत अडकावला. ओंचे मागं सारून तिनं घागर आंत सोडली. सरसर करीत दोर सरकूं लागला. एकदोन वेळां दगडावर आपटल्यामुळं घागरीनं आवाज दिला. आणि पाण्यावर घागर पडल्याचा बुड्डुक बुड्डुक आवाज कानावर पडतांच मुक्तेनं खालीं न पाहतांच दोराला हिसडा दिला !

झाडावर पांखरांचे थवे किलबिल करीत होते. मुक्तेनं त्यांच्याकडं आस्थेवाईकपणानं पाहिलं असतं तर तिलाहि त्याच्या उडण्या-बागडण्यांत आणि किलबिलाटांत मौज वाटली असती—

पण तिनं जगांतल्या कोणत्याच चमत्काराकडे न्याहाळून पाह्यचं नाहीं असं एखादं विलक्षण व्रत घेतलं होतं कीं काय कोण जाणे !

झाडांना हिरवा रंग तिला मोजवूं शकत नाहीं, फुलांचे चित्रविचित्र रंग तिला रिझवूं शकले नाहींत किंवा पक्ष्यांचे रम्य आवाज तिला भुलवूं शकले नाहींत.

घागर भरल्याची खूण म्हणून दोराला ओढ बसतांच ती रहाट ओढूं लागे. घागर वर येई आणि हंड्याची भरती होई.

काहींतरी हरवलं आहे, काय हरवलं तें सांगतां येत नाहीं. कुठं हरवलं तें ठिकाण सांगतां येत नाहीं, असा एखादा भांबावलेला मनुष्य वागतो त्याप्रमाणं मुक्ताचं जीवन होऊन बसलं होतं.

होतां होतां हंडा भरत गेला. नेहमींच्या दीर्घ परिश्रमानंतर अग्निनारायणानं डोकं वर करून उगवत्या सूर्यनारायणाला वंदन केलं.

मुलं उठलीं तर पहावं म्हणून मुक्ता घरांत जाण्यासाठीं उठून उभी राहिली. धुरामुळें पाणावलेले डोळे तिनं पदराच्या टोकानं पुसून टाकले आणि ती चालू लागणार तोंच—

मोटारीचा आवाज अवचित कानीं पडला त्यासरशीं ती थबकून उभी राहिली आणि परसाच्या एका अंगाला अगदीं खेटून जाणाऱ्या सडकेकडे पाहूं लागली. पुण्याहून सिंहगडकडे जाणारी ही सडक देशपांड्यांच्या वाड्याला मागल्या बाजूनं जणूं काय 'खो' देण्यासाठींच सज्ज होती. हें गांव म्हणजे तिचा अखेरचाच टप्पा होता. पुढें दीड मैलांवर सिंहगडाची चढण लागत होती.

मुक्ता आंत जायची थांबली खरी पण तिनं विशेष औत्सुक्यानं मोटारीकडे पाहिलं नाहीं. असेल कुणीतरी बड्या बापाचा बेटा! महिना पंधरा दिवसांनीं एखादी दुसरी मोटर नेहमींच धूळ उडवीत या वाटेनं जात असे. थांबल्या वस्तूकडे क्षणभर पाहून घेण्याचा मनुष्यस्वभाव आहे.

मोटारीनं पुन्हा आवाज दिला. एकदां—दोनदा—तीनदां—आणि नंतर मोटर थांबलेली तिनं पाहिली. मोटारीच्या पुढल्या दारांतून एक तरुण बाहेर आलेला दिसला आणि त्याला पहातांच क्षणभर—हो, क्षणभरच मुक्ता दचकल्यासारखी झाली.

पाठमोरा दिसला तरी तिनं त्याला तावडतोब ओळखलं—दहा वर्षांनंतर आज प्रथमच ती त्याला पहात होती—तरीपण तिनं त्याला बरोबर ओळखलं—तोच तो—शंकाच नको!

सहजच तिनं आपल्या छातीवर उजवा हात ठेवला आणि तिला कळून चुकलं कीं आपली छाती धडधडूं लागली आहे. हें धडधडणं नेहमींचं नाहीं. ओलाव्यासाठीं तिनं जिभेचा शेंडा ओठांवरून एकवार फिरवला. घशाला कोरड पडल्याचा तिला भास झाला.

हें लक्षण कांहीं ठीक नाहीं, तिनं स्वतःला बजावलं. जखमा सहजासहजीं कायमच्या बऱ्या होत नाहींत. खपलीचं संरक्षण वरवरचं [illegible] मुक्तानं मनाशीं कसला तरी निर्धार करून आव्हानाच्या आवेशानं आपली मान किंचित् मागच्या बाजूस झुकवली आणि घरांत जाण्यासाठीं ती दोनतीन पावलं पुढें सरकली—

पण तितक्यांत त्या तरुणानं मोठ्या आर्जवीनं केलेली याचना तिच्या कानांवर आली. "बाई, थोडं पाणी मिळेल का ?"

आणि नंतर तिला घरांत पळून जाणं अशक्य झालं.

मुक्ता पाठमोरी होती ती वळली. चार डोळे भिडले. आणि निमिषार्धांत परस्पराची ओळख पटली. तो तरुण अजून सडकेवरच उभा होता, पण तेथूनच तो आश्चर्यातिशयानं ओरडला, " हॅलो ! कोण ? मुक्ता ? मुक्ताच नं ? "

मुक्तानं मानेनंच होकार दिला. तिला आपल्या अन्दाजाचा या क्षणीं भरंवसा वाटला नाहीं.

सडकेच्या बांधावरून उडी मारून तो तरुण पुढें आला. अचानक घडलेल्या आनंदामुळें त्याचे डोळे विलक्षण तेजानं चमकत होते. एकदोन क्षणांत तो मुक्ताच्या सन्निध आला असता,—इतक्यांत मोटारीच्या मागच्या बाजूस पडद्याआड बसलेल्या व्यक्तीनं पडदा वर सारून किंचित् चिडखोर आवाजांत म्हटलं, " ए सदानंद, आतां आणखी कुठं निघालास—? बऱ्या वाईट, दर मैलाला तुला डोंबारणी अन् कोल्हटणी भेटतात. "

मुक्तानं आवाजाच्या रोखानं जळजळीत दृष्टिक्षेप टाकला. सदानंद मागं पाहून दटावणीच्या सुरांत म्हणला, " शट् अप ! माणूस पाहून बोलत जा कीं जरा. तुझ्यासारखी एक डोंबारीण बरोबर असल्यावर पण जाऊं दे. माझी बालमैत्रीण आहे ही. "

" अय्या ! " म्हणून म्हणत मोटारींतली ती स्त्री दार उघडून खालीं उतरली. मुक्तानं झटकन् तिला आपादमस्तक न्याहाळून घेतलं. पायांत उंच टांचेच्या सँडल्स, भडक रंगाची वेलबुट्टी काढलेली पांचवारी रेशमी साडी, आंतील कांचोळी स्पष्ट दिसावी इतक्या झिरझिरीत कापडाचा तंग ब्लाऊझ, संगमरवरासारखा शुभ्र आणि जाईजुईच्या फुलांसारखा भरदार गळा, लालचुटूक ओठ, बॉब केलेले केस—आणि विशेष म्हणजे डोळे !

आणि मुक्तानं आपल्या फाटक्या, मळक्या, विटक्या नेसूकडे लाजून पाहिलं. डोंबारीण ! खरंच, आपल्यापेक्षां डोंबारीण काय जास्त अमंगळ असूं शकेल ?

दोन वाघिणी समोरासमोर उभ्या राहाव्यात तशा त्या दोघी स्त्रिया दोन हातांच्या अंतरावर उभ्या राहिल्या तेव्हां खोट्या खेळकरपणाचा आव आणून सदानंद मुक्ताला उद्देशून म्हणाला,—" अरेच्या ! विसरलोंच कीं ! ही अलका. दोन वर्षांपूर्वी मुंबईला मी वैमानिकाचं शिक्षण घेत असतांना यांची प्रथम गांठ पडली—सिनेमांत असतात. पुण्याला त्यांचं एक पिक्चर चालू झालंय."

मुक्तानं वरकरणीं हसून समेट झाल्याचा देखावा केला—अलका तर अभिनय सम्राज्ञीच होती. तिच्या हास्याचा अभिनय अगदीं बेमालूम होता. दोन जातिवंत वाघिणींना लवकर एकमेकापासून दूर करण्याचा सदानंद विचार करीत होता.—आठवण झाल्यासारखं करून तो म्हणाला, "अलका, आपल्याला गेलं पाहिजे. सर्वांच्या आधीं आपण गडावर जाणार म्हणून तूं काल पैज मारली होतीस, आठवतंय—? "

मुक्ता गडबडीनं अलकेचा हात धरून म्हणाली, " पण तशी मी तुम्हांला जाऊं द्यायची नाहीं. आम्ही खेडवळ असलों तरी पाहुणचार कसा करायचा हें आम्हांला शिकवावं लागत नाहीं. चला आंत. उठलीं असतील सगळीं जणं. नाहींतर उठवतें मी त्यांना. धारेची वेळ झालीच आहे. "



TOM & BAY LTD. POONA

पण सदानंद मुक्तेचा मार्ग अडवून म्हणाला, " छे: छे: ! मुक्ता, उगीच कशाला त्रास घेतेस ? "

" त्रास कसचा आलाय त्यांत ? ह्या बाजूला—चला आंत. "

पण अलकेनं हरकत घेतल्यामुळें मुक्ताचा पाहुणचार तिथंच थांबला ! मुक्तानं अंदाज पाहिला कीं यांना अडवून धरण्यांत अर्थ नव्हता.

—टाकींत पाणी घातल्यावर मोटारीचं यंत्र धडधडूं लागलं.

—मोटर वळण्यावर दिसेनाशी होईपर्यंत मुक्ता सडकेच्या बांधाआड उभी होती. धुळीचे लोट पहात असतांना तिच्या मनांत विचार आला कीं, थोड्या वेळानं ही धूळ खालीं बसेल. सदानंदाची आठवण पुन्हा विरून जाईल.

मुक्ता घरांत आली.

मुलं अजून झोंपलींच होतीं. नित्याप्रमाणें चुलीपुढं बसून काकी रात्रींचीं खरकटीं भांडीं घांशीत होत्या.

बाहेरच्या दाराजवळ ओट्यावर बसून मुखप्रक्षालन करण्याचा पंतांचा शिरस्ता होता. पंतांचं तोंडधुणं म्हणजे गल्लींतल्या पोराबाळांची रोजची करमणूक होती. तान्हीं मुलं भेदरून जावीं अशाच त्या गर्जना होत्या. पण पंतांचा स्वभाव ठरून गेला होता. त्यांनीं आजवर जननिंदेचें भय मुळींच जुमानलं नव्हतं. नव्हे, लोकांच्या निंदेचा आपण विषय आहोंत ही शंका देखील त्यांच्या मनाला कधीं शिवली नाहीं.

बारा वर्षांपूर्वी त्यांची पहिली बायको याच घरांत बाळंतरोगानं मेली.

पहिली बायको मेली तरी पंत निर्विकार होते. दुसरी बायको आणण्याची घाई त्यांनीं शब्दानंही व्यक्त केली नाहीं आणि कदाचित् पुण्याच्या त्यांच्या एका स्नेह्यानं मुक्तेचं स्थळ सुचवलं नसतं तर—तर पंत निर्विकार मनानं विधुर राहिले असते.

पहिली बायको मेल्याचं दुःख नाहीं. दुसरी बायको घरांत आल्याचा आनंद नाहीं. कोणत्याही भावनेचा प्रखरपणा त्यांना हलवूं शकला नाहीं. वाडवडिलार्जित शेतजमिनींचा पसारा मोठा होता. नाहीं म्हटलं तरी पंधरावीस खंडकऱ्यांशीं हमेशा कटकटीचे प्रसंग यायचे. पण पंतांच्या तोंडून रागाचा शब्द कधीं बाहेर पडला नाहीं कीं दयेमुळं डोळ्यांच्या पापण्या ओल्या झाल्या नाहींत.

हा त्यांच्या स्वभावांतला थंडपणा घरांतही कायम होता.

आज दहा वर्षं त्यांनीं मुक्तेशीं संसार केला. दोन मुलं झालीं. विस्कटलेली घडी पुन्हा सांवरली. तरी पंतांच्या थंड स्वभावांत काडीइतका बदल झाला नाहीं. दुसऱ्याला काय वाटेल याचा विचार करीत बसणं म्हणजे कालाचा अपव्यय होय अशीच त्यांची समजूत असावी.

—मागें एकदां मुक्तेनं वेणी घालण्यासाठीं आरसा पाहिजे म्हणून मागणी केली.

पंतांचं उत्तर आलं, " घरांतला आरसा काय झाला ? "

मुक्ता चिडून म्हणाली, " तो मीं फोडून टाकला. "

पंतांनीं यावर कांहीं उत्तर केलं नाहीं आणि नवीन आरसाहि पण आणून दिला नाहीं.

बायकांचे फाजील लाड करण्याची त्या घरांत पद्धत नव्हती. त्याचप्रमाणं बायकांना कांहीं आवडीनिवडी असूं शकतात, त्यांनाहि मन म्हणून कांहीं असूं शकतं हें तत्त्वज्ञान त्या घरांतल्या गेल्या पंधरा पिढ्यांच्या पुरुषांना साफ नामंजूर होतं. बायकांनीं घरांत असेल तें प्यावं, खावं, ल्यावं, अंग मोडून काम करावं, रीतसर वागावं ! गोठ्यांत दोन म्हशी, दोन गाया बांधलेल्या होत्या. त्यांनीं कधीं आंघोळीसाठीं वासाचा साबण पाहिजे म्हणून आग्रह धरला होता ? मग या बायकांनाच हे नसते ढंग पाहिजेत कशाला ?

मोजक्या शब्दांत, एकदांच, शांतपणानं निर्णय द्यायचा हा पंतांच्या स्वभावाचा स्थायी भाव ठरून गेला होता. त्यावर चर्चा, खुलासा, विवरण एकदम बंद !

दहा वर्षं मुक्ता या घरांत राहिली होती. आदर्श गृहिणी म्हणून पंतांनी देखील मान डोलवावी अशीच तिची तपश्चर्या होती.

—पण आज त्या तपश्चर्येला धक्का बसला होता.

सदानंदाच्या अवचित दर्शनानं तिचं मन तडकलं होतं. इतके दिवस दाबून ठेवलेलं पाणी वर उसळी मारूं पहात होतं.

मुक्ता अजून थरथरणाऱ्या छातीवर हात ठेवून दारांत उभी होती.

देहानं ती दारांत उभी असली तरी मनानं ती ह्या वेळेपर्यंत सिंहगडच्या पायथ्याशीं पोहोंचलेल्या मोटारींतील व्यक्तींशीं बोलत होती !

इतक्यांत बाहेर जाण्याच्या तयारीनं दारांत उभे असलेले पंत मुक्ताला दिसले.

" चार दिवस खळ्यावर जाऊन येतों. मुलांचे कपडे करा. त्यांना घेऊन जाणार आहें. वेळ आलीच तर काकीलाहि यावं लागेल. तिचं शेत आहे. गरज लागली काकीची तर निरोप लावून देईन. पण तें उद्यां नाहीं. आज बुधवार—फार, फार तर सोमवारीं परत येऊं. तोंवर जनावरांकडे लक्ष द्या. भिकोबाला धारेचं सांगून ठेवतों. "

बस ! ठरलं म्हणजे ठरलं ! मुक्ताला वाटलं, काय अजब माणूस आहे !

●

घरांत घड्याळ नव्हतं—तरी रात्रींचा आठाच्यासुमार झाला असावा. बाहेर मिट्ट अंधार होता. गवतांतून रातकिड्यांचा आवाज येत होता कंदिलाची वात बारीक करून मुक्ता रोजच्या मळक्या रकट्यावर पडली आणि वतःशींच विचार करू लागली.

तिला वाटलं,—सदानंद आज भेटला नसता तर बरं झालं असतं. दहा वर्षे ती धडपडत होती. पण आज आपला पराजय तिला स्पष्ट कळून आला. जुन्या आठवणी रंगेल होत्या, रंगेल होत्या !

सदानंद त्यावेळीं त्यांच्याच शेजाराच्या खोलींत रहात होता. भारी खट्याळ होता त्याचा स्वभाव. गॅलरींतनं सरळ अंग चोरून जावं म्हटलं तरी शक्य नव्हतं. दोन वर्षे त्याच्या सहवासाचं सुख तिनं मनसोक्त लुटलं होतं.

नळावर असला तर हलकेच पाणी उडवायचा. कोणी पहात नाहीं असं पाहून ओठावर दोन बोटं ठेवून खुणा करायचा. कागदाचे बोळे खिडकींतून मारायचा. कांहीं तरी कारण काढून बोलणं उकरून काढायचा. कसलीं कसलीं चावट गाणीं तोंडानं गुणगुणायचा !

आईला रात्रीं खाणावळींतून यायला रोज उशीर व्हायचा. तेव्हां हा खोलीच्या भिंतीला उद्देशून म्हणायचा, "खऱ्या प्रीतीच्या आड येणाऱ्या निर्दय दगडानो, आणि विटांनो, अरे, तुम्हांला आतां म्हणूं तरी काय ?"

आणि गंमत ही कीं मुक्तालां या सगळ्या चेष्टा मनापासून आवडत असत. आई घरांत असली म्हणजे मुक्ता धाकानं गप्प बसे. परंतु आई कामाला गेली कीं ती मोकळी असे.

पुढें पुढें सदानंद दुसऱ्याचा कॉलेज बुडवूं लागला !

मुक्ता मुद्दामच त्याच्या खोलीवरून वरचेवर येरझारा घालूं लागली.

वाड्यांतल्या म्हाताऱ्या बायका आपसांत कुजबुजूं लागल्या !

पण मुक्ता यौवनाच्या पहिल्या झुळकीनं तरारल्यासारखी झाली पुरुषाचा स्पर्श किती उन्मादकारी असतो याचा पहिला अनुभव तिला सदानंदानं करून दिला.

मुक्ताला तो प्रसंग डोळ्यांपुढं दिसूं लागला—

गणपतीचे दिवस होते. वाड्यांतल्या मुलींबरोबर रात्रीं ती बाहेर पडली सदानंद पाठशिवणीला आहे ह्याची तिला खात्री होती. त्याप्रमाणं तो होताच. एका गणपतीच्यापुढं खूप गर्दी जमली होती. मुक्ता गर्दींत बाजूला निसटली.

दोघें हातांत हात घालून चालूं लागलीं.

थोड्याच वेळांत सदानंद म्हणाला, "तुझी आई गणपती पहायला गेली नाहीं ?"

"वाड्यांतल्या सगळ्या म्हाताऱ्या बायका मिळून जाणार आहेत."

सदानंद एकदम तिचा हात घट्ट दाबून म्हणाला, "घरीं येतेस परत ?"

मुक्ता गोंधळली, बावरली. त्याच्या प्रश्नाचा रोख लक्षांत येऊन तिच्या अंगावर रोमांच उठले. त्याला ताडकन् तोडून टाकण्याचा तिला धीर झाला नाहीं.

सदानंदनं तिच्या मुग्धपणाचा फायदा घेतला—आणि तिच्या उत्तराची वाट न पाहातां तिला हाताला धरून घराच्या दिशेनें ओढली—

मुक्ताला मनांतून विलक्षण आनंद वाटत होता. तिच्या नसानसांतून कसल्यातरी गोड झिणझिण्या उठत होत्या. तिची छाती धडधडत होती. तोंडाला कोरड पडली होती. पण—

पण तिला भीति वाटली.

वाड्यांत कोणी जागं नव्हतं. तिची आई अजून परतली नव्हती

कुणाला कांहीं कांहीं कळलं नसतं—

सदानंदाच्या प्रत्येक चुंबनाबरोबर तिच्या पायाखालची वाळू निसटत होती. त्याची लाडीगोडी आणि आर्जवी शब्द तिच्या कानाला अमृतासारखे भासले. त्याची अधीर मुद्रा पाहून तिच्या डोळ्यांचं पारणं फिटलं. त्याच्या ओठांचा स्पर्श चांदण्यासारखा उन्मादक, सूर्याच्या उन्हासासारखा दाहक, मधासारखा अवीट आणि—आणि—

तिच्या कमरेला त्याच्या हाताचा स्पर्श होतांच ती विजेच्या वेगानं उठून उभी राहिली.

"घाबरलीस ?—"

"अं हं ऽ"

"मग बैस नं इथं— माझ्यावर विश्वास नाहीं ? वेडी आहेस—"

"असेन. पण—पण आपलं लग्न झाल्याशिवाय नाहीं—"

सदानंदानं लग्नाच्या शपथा वाहिल्या. परोपरीनं तिला विनवलं. कोडगेपणानं तिच्या पायां देखील पडला. पण मनांत असून देखील मुक्ता कबूल झाली नाहीं. नंतर पुढें दोन दिवस दोघांचा अबोला होता. तिसऱ्या दिवशीं सदानंदानं आपली चूक कबूल केली. पुन्हा हातमिळवणी आणि तोंडमिळवणी झाली.

परीक्षा झाल्यावर आपल्या वडिलांची आणि आईची परवानगी घेऊन मुक्तेशीं लग्न करण्याचा निश्चय त्यानं गंभीर मुद्रेनं बोलून दाखवला—

पण मार्गशीर्षांत आईनं मुक्ताचं लग्न दुसऱ्याशींच करून टाकलं. मुक्तानं विरोध केला. ती खूप चिडली. जितका धिंगाणा घालतां येईल तितका आकस्ताळेपणा तिनं केला. पण सदानंद सुटींत आपल्या गांवीं गेला होता. त्यामुळें तिच्या विरोधाला बळकटी आली नाहीं. तो परत आला तेव्हां मुक्ता सासरीं गेली होती.

नंतर पुन्हां चार महिन्यांनीं ती पुण्याला माहेरीं गेली तेव्हां सदानंद खाली सोडून गेल्याचं तिला समजलं !

तिच्या हृदयाला खोल जखम झाली

—त्या विचारांसरशीं मुक्तानं दीर्घ सुस्कारा सोडला. काकी जाग्याच होत्या. त्या म्हणाल्या, " झोंप नाहीं आली ? "

" येईल. "

" पोरी, मघांपासून मी ऐकतें आहे. बाहेरच्या दाराला कुणीतरी धक्के मारतंय ! तें बघ—कुणीतरी आलंय. काशीनाथ तर नसेल—? पहा बरं—"

उशागतचा दिवा मोठा करून मुक्ता बाहेर जाऊं लागली, पण काकी उठून म्हणाल्या, " थांब. मी येतें बरोबर तुझ्या सोबतीला. "

दोघींनीं जाऊन दाराचा लाकडी अडसर मागं सारला आणि मुक्तानं दार उघडलं.—आणि एकदम ती आश्चर्यानें ओरडली,—" कोण—? सदानंद?"

—पुन्हां सदानंद कशाला आला ?

मुक्तानं काकींना घाईघाईनं समजावून सांगितलं आणि सदानंदकडे वळून ती म्हणाली,—

" घरांत पुरुष माणूस कुणी नाहीं—"

पण काकींचा आतिथ्यपर स्वभाव उसळून म्हणाला, " अग पण पोरी, काशीनाथ घरांत नसला म्हणून मी नाहीं का इथं ? इश्श ! काय ग बाई तरी ! माहेरच्या माणसाचं हें तुझं अगत्य होय ? तें कांहीं नाहीं—पाहुणेराव, तुम्ही या हो घरांत. पोरी, चूल अजून विझली नसेल. मूठभरीचा भात टाक."

मुक्ता निरुत्तर झाली. अजून तिला वाटत होतं कीं सदानंद आला तसा निघून जावा ! सदानंदाच्या तोंडाकडे तिनं केविलवाण्या दृष्टीनं पाहिलं, पण सदानंदनं तिच्या डोळ्याला डोळा दिला नाहीं. काकींचं वक्तव्य चालूच होतं, " अग, माणसं यायला पाहिजेत, जायला पाहिजेत. आल्यागेल्यावांचून का कुणं ओळखी पडतात ? पाहुण्यांचा कंटाळा करील त्याचं वैश कधींहि वाढायचा नाहीं. पुराणांत चक्क सांगितलंय ! "

काकींच्या आग्रहाखातर मुक्तेला भातपिठलं करावं लागलं आणि मनांत नसून तें सदानंदालाहि खावं लागलं ! एक अक्षर न बोलतां मुक्तानं पाहुण्याची खोली झाडून काढली, एक कोरी गादी पसरून दिली—आणि मग ती काकींच्या शेजारीं झोंपायला जायला वळली—

सदानंद वाटेंत उभा होता !

" माझं आधीं ऐकून घे आणि मग खुशाल झोंपायला जा. "

मुक्ता त्याच्या तोंडाकडे पाहूं लागली !

"मला फसवलंस तूं !" सदानंद बोलूं लागला—"मी आईची परवानगी मिळवली. स्वयंपाकिणीची पोरगी म्हणून वडिलांनीं खूप आकांडतांडव केलं, पण त्यांनाही मीं पटवून दिलं आणि आलों तर तुझं लग्न होऊन तूं सासरी गेल्याचं कळलं. माझी निराशा झाली. तूं केलीस—"

मुक्ता भिंतीला टेकून उभी राहिली. तिनं डोळे मिटून घेतले. सदानंद पुढें बोलूं लागला, " मी अल्लड होतों. मूर्खही असेन. पण वचनाचा पक्का आहें. तुझ्याशींच लग्न करीन म्हणून म्हणालों होतों. अजून माझं लग्न झालं नाहीं—"

डोळे उघडून आश्चर्यानं मुक्ता म्हणाली, " ती सकाळची बाई तुमची बायको नाहीं ? "

" सिनेमांतल्या बायांना लग्नाची चैन परवडत नसते. गेलीं दोन वर्षं ती माझ्यावर फिदा आहे. करमणुकीसाठीं आणि बाहेरख्यालीसाठीं तिनं मला जवळ केलं आहे. पण—चारआठ दिवसांनीं काश्मीरला मला लढाईचं बोलावणं येईल आणि आमचे संबंध कायमचे तुटतील. "

" आणि माझा संबंध तर दहा वर्षांपूर्वींच तुटला आहे. पुन्हा माझ्याकडे आज कां आलांत ? " मुक्ता कळवळून म्हणाली.

" मुक्ता, खरंच तूं मला विसरलीस ? "

शेवटच्या वाक्यासरशीं सदानंद थोडा पुढें सरकला. मुक्ता दाराकडे वळून कातर आवाजांत म्हणाली, " सदानंद, तुम्हांला कसं सांगू !—पण नकोच. तुम्ही स्वस्थ झोंपा आता. काकी तिकडे माझी वाट पहात असतील. "

मोठ्या कष्टानं आपला हात सोडवून घेत मुक्ता म्हणाली, " मीं तुम्हांला विसरण्याचा प्रयत्न केला. आज सकाळीं माझा [illegible] कळून आला. पण आतां या गोष्टी विसरल्याच पाहिजेत. सदानंद, दोन मुलांची मी आई आहें. एका निर्बुद्ध म्हाताऱ्याची का होईना—पण लग्नाची बायको आहें. तुमची ती मुक्ता त्या वेळींच मेली—जळून खाक झाली. "

" पण मला तसं वाटत नाहीं. तूं जिवंत आहेस आणि—मुक्ता, माझं

ऐक. माझ्याबरोबर चल. नाहीं म्हणू नकोस. चारआठ दिवसांनीं काश्मीरला आघाडीवर जायचा मला हुकूम येईल.—" सदानंद कळवळून बोलत होता.

मुक्ताच्या मनाची विलक्षण उलघाल होऊं लागली. विचारासरशीं तिचं डोकं भणाणून गेलं. छाती वेगानं धडधडूं लागली. दहा वर्षं काढलेल्या या नरकवासाचा तिला मनापासून उबग आला होता. नवऱ्याची, मुलांची, घराची—कशाकशाचीच तिला ओढ नव्हती. आणि मेल्याशिवाय यांतून सुटका नसल्याची तिला पुरेपूर खात्री होती. तिला या घरांत काडीचं सुख नव्हतं. तें मिळण्याची आशाहि वटली होती.

उलट सदानंदच्या सहवासांत ती सुखी होणार होती. उरापोटाशीं जतन करून ठेवलेलं तिचं सुखस्वप्न खरं होणार होतं. चार दोन वर्षांनीं तो तिच्यापेक्षां मोठा असेल. पण तिचा शब्द त्यानं खालीं पडूं दिला नसता. त्याच्या साध्या स्पर्शानं तिच्या रक्ताला उकळी फुटत होती. तो दाह, ती आग, ती धुंदी, ती मस्ती शांत व्हायला एकच उपाय—!

सारं बळ एकवटीत ती म्हणाली, " नाहीं. मी तुमच्या पायां पडतें. मला खोट्या आशेला लावूं नका. यापेक्षां अधिक धिंडवडे निघाले तर मला सहन करणं अशक्य—"

सदानंद झटकन् पुढें वांकला आणि तिला त्यानं आपल्या बाहुपाशांत घट्ट धरलं.

बेहोषपणानं मुक्ता त्याच्या बाहूंत शिरली. तिचा संयम सुटला. आणि त्याच्या ओठांच्या सुखद स्पर्शासाठीं तिनं आपले ओठ आतुरतेनें पुढें केले !

पहिला आवेग ओसरल्यावर मुक्ता लज्जित मुद्रेनं दूर सरकली. केस सांवरून तिनं पदर सारखा केला आणि खालच्या आवाजांत म्हटलं, " मला विचार करायला वेळ पाहिजे—"

सदानंदनं आपल्या बॅगेचं तोंड उघडलं आणि आंतून एक आपल्या नांवाचं कार्ड काढून तिच्या हातांत देत तो आनंदानं म्हणाला, " हा माझा पत्ता घेऊन ठेव. मला उद्यां सकाळीं मुंबईला गेलंच पाहिजे. मी वाट पहातों. दहा वर्षं वाट पाहून मला संवय झाली आहे. आज बुधवार. सोमवारीं सकाळपर्यंत मी नक्की मुम्बईला या हॉटेलांत आहे. तोंपर्यंत आलीस तर माझ्या नशिबावर मी विश्वास ठेवीन. नाहींतर काश्मीरचं रणक्षेत्र आहे अन् मी आहें—"

मुक्ता त्याच्या तोंडावर हात ठेवून भयभीत मुद्रेनं म्हणाली, " भलतं-सलतं बोलायचं नाहीं—"

—सदानंद निघून गेल्यावर मुक्ता जड अंतःकरणानं घरीं गेली. काकींचा डोळा लागला होता. पण मुक्तेची चाहूल लागल्यामुळं त्या सावध होऊन म्हणाल्या,

" झोंपले वाटतं पाहुणे ? "

मुक्ता उत्तर देण्याच्या अवस्थेंत नव्हती.

मुक्ताला रात्रभर झोंप आली नाहीं.

दातांनीं ओठ घट्ट चावून ती रात्रभर रडत होती.

तिला कळेना कीं यापुढं आपण करावं तरी काय ?

पुन्हा सगळं विसरून पूर्ववत् संसार करण्याची कल्पना तिला तिरस्कृत वाटली. पंतांचं तें बेढब ध्यान डोळ्यानं पाहण्याचा तिला वीट आला या इसमाला आपण इतके दिवस आपल्या अंगाला हात लावूं तरी कसा दिला याचंच तिला कोडं पडलं ! तो विचार मनांत आल्याबरोबर तिनं तोंड वाईट केलं, अंगाला आळोखेपिळोखे दिले. जणूं काय ती स्मृति तिला दूर ढकलायची होती. यापुढं तें निर्जीव मीलन तिला शक्य नव्हतं. त्या ओंगळ प्रकाराची तिला शिसारी आली.

याउलट, सदानंदाची सांवली म्हणून राहतां आलं तर ?

पण तें कसं शक्य होईल ?

कां नाहीं शक्य ?

लोक म्हणतील !—म्हणेनात.

खुद्द तिचा नवरा म्हणेल, " आमच्या घरांतल्या बायकांची ही रीत झाली नाहीं. " नसेल ! तुमच्या घरांतल्या आजवरच्या बायका गोठ्यांतच बांधण्याच्या लायकीच्या असतील ! म्हणून मी घमेल्यांत तोंड खुपसून या संसाराचं अंबोण चघळीत होय ? मुलं म्हणतील.—पण त्यांचं म्हणणं ऐकायला मी थोडीच इथं राहतें आहें ? काकी म्हणतील.—पण वयाच्या दहाव्या वर्षीच कुंकू पुसलेल्या बाईला त्यांतलं काय कळणार ? मधाचं बोट न चाखलेल्या जीवाला मधाची अन् चिखलाची चव यातला फरक काय डोंबल समजणार ?

आई म्हणेल—, म्हणेल. काय वाटेल तें म्हणाली तरी मी—

—आणि विचारांच्या ओघांत आपण किती वाहात गेलों याची जाणीव होऊन मुक्ता दचकून अंथरुणावर ताडकन् उठून बसली.

काकींचा दमेकरी घसा घुरघरत होता. उशाशीं दिवा बारीक डोळा करून मुक्ताच्या बंडखोर हृदयाचा ठाव घेत होता.

[ पान १४३ वर ]

अ. का. प्रियोळकर



चंद्रभागच्या काठीं
'युगें अठ्ठावीस
विटेवरी उभा'
असलेल्या

# विठ्ठलाचा कानडांतील निवास

म्हणजे भक्तिरसानें
नटलेला एक अद्‌भुतरम्य
इतिहास आहे !

पंढरपूरचा श्री विठ्ठल ही महाराष्ट्रीयांची राष्ट्रीय देवता आहे. ज्ञानदेव, नामदेव, चोखा मेळा, एकनाथ, तुकाराम अशा निरनिराळ्या जातींच्या संतकवींना स्फूर्ति पंढरीच्या विठ्ठलापासूनच मिळालेली आहे. पुंडलिकाच्या भेटीला आलेलें हें 'परब्रह्म' युगें अठ्ठावीस विटेवरी उभें आहे, असा घोष आपण नेहमीं ऐकतों. महाराष्ट्रीयां-प्रमाणें पुष्कळ कानडी कवीहि विठ्ठलाचे भक्त होऊन गेले. चौंडरस, पुरंदरदास, कनकदास यांचा विठ्ठलभक्तांत प्रामुख्यानें उल्लेख करतां येईल. अद्यापीहि कर्नाटकांत विठ्ठलभक्ति मोठ्या प्रमाणावर प्रचलित आहे, हें पंढरपुरास दरसाल विठ्ठलाच्या भेटीला येणाऱ्या कन्नड भक्तगणांच्या संख्येवरून कळून येतें. श्री विठ्ठल ही मूळ कानडी देवता होती, अशीही एक कल्पना आहे. 'कानडा विठ्ठल' असा जो उल्लेख कांहीं संतांच्या काव्यांत सांपडतो त्यानें या कल्पनेला पुष्टि मिळालेली आहे. श्री ज्ञानदेवाच्या नांवावर असलेल्या अभंगांतही आपणांस असे उल्लेख आढळतात.—

क्षीरसागरींचें निज रूपडें । पाहतां पारखिया त्रिभुवनीं न संपडे । तें उभें आहे वाडेंकोडें । पुंडलिकाचे आवडी । मेघश्याम घेऊनिया तुंडीं । जयातें श्रुती पैं वानिती । कीं तें पुराणासी वाड । तें पंढरिये उभें असे । कानडें गे माये ॥ ...वगैरे.

नामदेवाच्या नांवावर असलेल्या अभंगांतुही आपणांस असे उल्लेख आढळतात.—

कानडा विठ्ठल वो । उभा भिवरे तीरीं ।
भक्ताचें आर्त वो । जीवा लागलें भारी ॥
नाम बरवें रूप बरवें । दर्शन बरवें कानडिया ॥ १ ॥
वेदांसी कानडे श्रुतीसी कानडे । परब्रह्म उघडें पंढरियें ॥ २ ॥
विठ्ठल कानडें बोलूं जाणें । त्याची भाषा पुंडलिक नेणे ॥ युगें अठ्ठावीस झालीं ॥ दोघां नाही बोलाबोली ॥

एकनाथाचा पणजा भानुदास याच्या नांवावर असलेल्या अभंगांतही आपणांस असा उल्लेख आढळतो :—

चंद्रभागे तीरीं उभा विटेवरी ।
विठ्ठल राज्य करी पंढरीयें ॥ १ ॥
ऋद्धिसिद्धि धृति वोळंगती परिवार ।
न साहती अवसर ब्रह्मादिकां ॥ २ ॥
सांडोनी नितुलें यथा बीजे केलें ।
कवणें चाळविलें कानडियासी ॥ ...वगैरे

भानुदासाच्याच शब्दांत बोलावयाचें झालें तर,—

परदेशीची वस्तु पंढरीस आली ।
ते दैवें फावली पुंडलिका ॥

हा परदेश कोणता ? वैकुंठ असेल ! पुष्कळांचे मतें 'कानडा' या शब्दाचा अर्थ 'अगम्य किंवा दुर्बोध असा आहे. त्यांना कर्नाटक असा अर्थ घेण्याचें मुळींच कारण नाहीं. त्यांचे, श्रीविठ्ठलाची मूर्ति मूळ कर्नाटकांतील व मागाहून







अनुक्रमणिका

महाराष्ट्रांत आली- या मताला विशेष पुरावा मिळत नाहीं. मात्र या मताच्याविरुद्ध पंढरपूरची विठ्ठलमूर्ति विजयनगरच्या राजानें अंदागोदीस म्हणजे विजयनगरास नेलेली व पुढें एकनाथाचे पणजे भानुदास यांनीं ती तिकडून आणून पुनः पंढरपुरास तिची स्थापना केली, अशी मात्र दंतकथा प्रचलित आहे. महीपतीनें आपल्या भक्तलीलामृत या ग्रंथामध्यें ही कथा विस्तारानें वर्णिलेली आहे (अ.१८). एकनाथ एकदां पंढरीला गेले व तेथें कीर्तनांत भानुदासांचें त्यांनीं चरित्र गाइलें, अशा स्वरूपांत ही कथा त्यानें दिली आहे; परंतु हीच कथा अभंगरूपांत, तुकारामाच्या नांवावर असलेली, धुळ्याच्या श्रीसमर्थवाग्देवता मंदिरांतील निरनिराळ्या हस्त बाडांत मला सांपडली. तुकारामाच्या अभंगाच्या गाथा ज्या प्रसिद्ध आहेत त्यांपैकीं माझ्या संग्रहांतील वेगवेगळ्या पांचसात मी पाहिल्या. त्यांमध्यें हें भानुदासचरित्र मला आढळलें नाहीं. ही जी भानुदासाची कथा, महीपतीनें किंवा तुकारामानें कथन केलेली आहे, तिला पुष्टि देण्यास श्रीविठ्ठलमंदिराची टोलेजंग इमारत विजयनगरामध्यें आजही उभी आहे. तेथें विशाल मंदिर आहे. कल्याणमंडप आहे. विठ्ठलाचा मोठा दगडी रथही आहे. परंतु आत्याश्चर्य म्हणजे कुडीप्रमाणें त्यांत विठ्ठल नाहीं. हंपीच्या या पडक्या इमारतीसंबंधीं लिहितांना मि. लॉंगहर्स्ट (Mr. A. H. Longhurst) '*Hampi Ruins*' या पुस्तकांत म्हणतोः—

"We now pass on to the Vitthala temple, the most splendid building in the city. It was dedicated to Vishnu in the form of Vitthala or Vithoba. Vithoba is a god of the Maratha country and is rarely met with outside it. He is regarded as a form of Krishna. In and about the temple are no less than 23 inscriptions of dates ranging from A.D. 1513 to 1564. Several of these are damaged, but those which are still legible show that Krishna Deva Raya, to whom the city owes so much, began the temple in 1513 and endowed it with villages; that his two queens built the gateways and presented golden vessels to the shrine; and that his two successors Achyuta and Sadasiva, and many private individuals, made gifts of various kinds to the building. The temple was never finished nor consecrated. In all probability, the work was stopped by the destruction of the city in 1565, *but tradition gives another reason and says that it was built specially for the famous image of Vithoba at Pandharpur in the Sholapur District of Bombay, but that the God, having come to look at it, refused to move, saying that i twas too grand for him and that he preferred his own humbler home.*"

वरील इंग्रजी उताऱ्याचें समग्र मराठी भाषांतर येथें देण्याचें विशेष कारण दिसत नाहीं. विजयानगरच्या राजाच्या वैकुंठासारख्या प्रचंड प्रासादापेक्षां विटोबारायाला पुंडरिकाची साधी वीटच पसंत पडली, एवढें आपणांस त्यावरून दिसून येतें. 'विठोबा' या शब्दाची व्युत्पत्ति विष्णूपासून झाल्याचें सांगतात. 'विटे' वर उभा राहिलेला देव तो 'विठोबा' असें तर नसेल? कसेंही असो. विठोबा कर्नाटकांत कां गेला व तेथील राजवैभवावर लाथ मारून गरीब पंढरपुरास परत कसा आला याची माहिती तुकारामाच्या नांवावर असलेल्या उपरिनिर्दिष्ट अभंगांत कशी दिली आहे ती पहाः—

अनागोंदीमध्यें असे नृपनाथ। नामें तो विख्यात रामराजा ॥ वैष्णवांची पूजा करी हरिभक्त। असे शरणागत हरिच्या दासां ॥ ब्रह्मांड नायका भक्ति आरंभिली। दर्शन तयाला दिधलें देवें ॥ रामराजा म्हणे, "पंढरीच्या देवा। येईं माझ्या गांवा आनागोंदी" ॥ देव म्हणे, "एका दिसिं मज न्यावें। वचन सांभाळावें प्रत्यक्षत्वां". ॥ "माझ्या हरिभक्तां छळी जरी कोण्ही। तत्काळ तेथोनी येईन मी ॥ कबूल होऊनी पंढरीसी आला। शरसेतु बांधिला राजयानें ॥ देव रुक्मिणीसी म्हणे, "येथ असा। कानड्यानें फांसा केला मज" ॥ रुक्मिणीचा पति भावें उचलिला। आनागोंदा नेला भक्तीबळें ॥ आषाढीची पोहा पंढरीस आला। म्हणती, "देव नेला राजयानें" ॥ पताकांचे भार वैष्णव नाचती। लोटांगणें घेती महाद्वारीं ॥ राउळाचा रंग सर्व शोभा गेली। विटाई माउली नाहीं आंत ॥ म्हणती वारकरी, "मोकलिलें हरीं। कोणासी मूरारी भेटूं आतां?" ॥ "भेटुं आतां कोणा" म्हणती वारकरी। "कोठें माझ्या हरि," म्हणताती ॥ विठोबाचे दास प्रेमें गहिंवरती। "रुक्मिणीच्या पति द्यावा" म्हणुनी ॥ क्षेत्र प्रतिष्ठानीं होता भानुदास। आला आषाढीस

पंढरीस ॥ तुया पोहियासी भानुदास म्हणे । "देव पंढरीस आणितों मी ॥ तुम्हीं चिंतातूर होऊं नका पोटीं । करवितों भेटी देवा तुम्हां" ॥ विठोबाची आण वाहोनि निघाला । भानुदास आला आनीगोंदी ॥ सात दारवंठे असती राउळा । कुलुपें अर्गळा किल्या कोंच्या ॥ तेव्हां झाली रात्र पडला अंधार । जोडुनियां कर विनवीत ॥ भानुदास " म्हणे, पंढरीच्या राया । लेकुराची माया सांडियेली ॥ भला रे विठोबा पळुनी आलासी । पोटींच्या पोरांसी कोणा पोसी ? ॥ आपुल्या पोटाची धरिली तुवां सोय । आमुची गति काय मायबापा ॥ काय देवा तुला दुष्काळ पडला । न मिळे खायाला पंढरपूरीं ॥ कडीं कुडक्या तोडे मोहनमाळ कंठी । देखोनियां पोटीं भूललासी ॥ हत्ती घोडे धनमाल हे संपत्ती । देखतांचि चित्तीं तोषलासी" ॥ भानुदास म्हणे, "येथोनी चला स्वामी । नाहींतर आम्हीं भले नोहे" ॥ इतुकें बोलतां कुलुपें गळालीं । घनःश्याम देखिली मूर्ति डोळां ॥ देखोनि भानुदास गळां तो झोंबला । गहिंवर दाटला पांडुरंगा ॥ म्हणे, "भानुदासा माझिया सांकडसा । कानाड्यानें फांसा केला मज ॥ राजयाच्या बंदी जाण मी पडिलों । भीमा अंतरलों चंद्रभागा ॥ सत्यभामा राही रुक्मिणी राहिली । जनीं अंतरली पुंडलीक ॥ नाहीं गरुडपार नाम्याची पायरी । हनुमंत समोर नाहीं माझ्या ॥ भोवतालें पाहें नाहीं माझें कोण्ही । न देखे नयनीं हरीभक्त ॥ करी तो माझी पूजा मज वाटे वीख । तुज देखोनि सुख जालें पोटीं ॥ कानाड्या राजानें वचनीं गोविलें । चाळवुनी आणिलें करूं काय ?" ॥ भानुदास म्हणे, "अज्ञान होतासी ? । देखोनि भातुक्यासी भूललासी ॥ उठा पुरे जालें चलवें पंढरीसी । तुम्हांसाठीं सारी यात्रा आली" ॥ देव म्हणे, "वेडी भक्तिची पडिली । पाहिजे संभाळिली दिधली भाक ॥ नगराबाहेरी धरीं मौन्यमुद्रा । मारितां शरीरा बोलूं नको" ॥ मोतियांचा हार कंठींचा काढिला । भानुदासा दिल्हा देवरायें ॥ निघतां भानुदास दारवटा लागला । सूर्योदय जाला तयेवेळीं ॥ प्रातःकाळीं स्नान भानुदास करी । आठवी श्रीहरि हृदयामाजीं ॥ घालुनि आसन बैसला ध्यानस्थ । लावियलें चित्त पांडुरंगा ॥ सवेंचि कानडा आला रामराजा । करावया पूजा भगवंताची ॥ कवाडें उघडोनि पाहे जां त्वलाहीं । तंव हार नाहीं देवाकंठीं ॥ म्हणे, "विठोबाचा हार कोणी नेला ? । धरुनि आणा त्याला माझेपासीं" ॥ 'कोणी नेला हार ?' जाहला बोभाट । ताडी उत्कट पुजाऱ्यांसी ॥ चोरी पाहावया सेवक धांवती । हार कंठीं पाहाती भानुदासा ॥ देखोनि तयासी ताडिती उत्कट । म्हणती, "चोरटा हाची भेट" ॥ "ब्राह्मणाच्या गळां देखियेला हार" सांगताती हेर रायापासी ॥ तेव्हां नृपनाथ सेवकांसि बोले "बांधोनिया टोले देत आणा" ॥ सेवकांनि भानुदास धरोनि बांधिले । गळीं तयेवेळीं आणिले राजद्वारीं ॥ काय रामराजा बोले तयेवेळीं "भैदासी या सुळीं सत्वर द्यावें" ॥ तेव्हां त्यांनीं सूळ देउनि चालविले । "चिंती त्या विठ्ठला" म्हणती दूत ॥ "शरीराचा लोभ न धरावा मनीं । तुम्ही शूर जनीं हरिभक्त" ॥ भानुदास म्हणे, "देह हें देवाचें । केवणें जयाचें नच पावे ॥ प्राक्तनाचा भोग चुके कां होईना । परि त्या नारायणा सांडीन ना ॥" आनंदाचें कुंकू लेवविलें भाळीं । भक्तीची गरसळी खळकत ॥ भानुदास म्हणे, "ऐका हें वचन । भेट मी घेईन विठ्ठलाची" ॥ आणिला भानुदास, देवा नमन केलें । म्हणे "शिक्षे देखिलें आम्हालागीं ॥ आतां देवा तुम्ही लोभ असों द्यावा । आदर धरावा हृदयामाजीं ॥ केली तुम्ही मुक्ति कळों आली आम्हां । शतसहस्र जन्मा न सोडीं ॥ दूतीं भानुदास सूळीं घालियेला । सुळाचा जाहला

वृक्ष तेव्हां ॥ पुष्पें पानें शाखा वृक्षाला दिसतीं । नवल करिती राजदूत ॥ कळिकाळाचें भय नाहीं हरिदासां । तेथें भानुदासा भय काई ?॥ सूळावरी निद्रा भानुदासा आली । उन्मनि लागली तये वेळीं ॥ सूळाचा तरुवर आश्चर्य पाहून । सांगती येऊन दूत राया ॥ चिंतातूर राजा म्हणे, "त्यासि आणा । कैसा हा यातना वोढवलें" ॥ सोडुनी भानुदासा लागती चरणीं । आणिलें ते क्षणीं राजद्वारीं ॥ निराभिमानें राजा बोलत सभेस । "संत भानुदास महाराज ॥ रामराजा म्हणे, "त्राहीं त्राहीं त्राहीं" । लोटांगण पायीं घालितसे ॥ हातीं धरुनिया आणिला राउळीं । तेव्हां वनमाळी काय बोले ॥ "न सरे हा क्रोध भक्ताचा कोवसा । चल भानुदासा जाऊं आतां"॥ तेव्हां नृपनाथें धरिले चरण । म्हणे, "नारायेणा न राहसी ?" ॥ "ऐकें गा राया तुझी माझी भाक । येथुनीया देख उगवली ॥ माझीया दासाला सूळावरी घालावें । पाषाण पूजावे, धर्म कोण ? ॥ भक्त भानुदास माझेंचि शरीर । दासाचा मी भार वाहातसें ॥ भगवद्भक्ताचें तो ऐसें नव्हे चिन्ह । भूतीं नारायण जाणावा तो ॥ मोतियाचा हार तुझे पैं सांपडला । तरी त्वां घातला सूळावरी" ॥ बोलत सक्रोध भक्ताचा कैवारी । "चलावें झडकरी भानुदासा ॥" रामराजा म्हणे, "मज उपेक्षुनी । जासी चक्रपाणी येथुनिया ॥ आपुलें वचन सत्य केलें तुह्मीं । आतां लोभ स्वामी असों द्यावा ॥ घेउनि भानुदास बाहेरि निघाला । बोलत, "विठ्ठला मायबापा" ॥ "बैसा खांद्यावरी" म्हणे भानुदास । नारायण हंसे, "बैसी कैसा" ॥ येरु ह्मणे, "वाटे नवल जीवासी । कौतुक दाविसी कृपासिंधु ॥ ब्रह्मांडनायका संपुष्टीं राहावें । खांदी न बैसावें चोज कैसें ? ॥ तेव्हां भानुदासा आलिंगुनी पोटीं । म्हणे, "मी संपुष्टीं राहातों तुझ्या"॥ विश्वाचा चालक संपुष्टीं घातला । भानुदास आला पंढरियें ॥ धन्य भानुदास धन्य त्याची भक्ति । उभय लोकीं कीर्ती भरली ज्याची ॥ आणितां भानुदासें रुक्मिणीचा वर । जाला जयजयकार चंद्रभागे ॥ विठोबा रे माझा आंतर नेणसी काय । केला तैसा होय भक्तिबळें ॥ काय येक केलें नवल या विठ्ठलें । चिंतावीं पाऊलें तुका म्हणे ॥

वरील अभंगांत किंवा महीपतीनेंही भक्तिलीलामृतांत विठ्ठलाला नेणारा राजा रामराजा असें म्हटलें आहे; पण त्या वेळीं कृष्णराजा नामक राजा विजयनगराला होता, असें दिसतें. अशा प्रकारच्या कथेंत तपशिलाच्या बाबतींत खोल जाऊं नये हेंच बरें. विजयानगरामध्यें आजही विठ्ठलाचें मंदिर असून त्यांत विठ्ठल नाहीं; आणि तो पंढरपूरला आहे. त्यामुळें या कथेला इतिहासाचा कांहींतरी आधार आहे, असें उघड दिसतें. मुसलमानांच्या आक्रमणाला भिऊन विठ्ठलमूर्ति विजयनगराला नेली व ती भीति कमी झाल्यावर तेथून परत आणण्यांत आली, असाही एक तर्क आहे. वरील तुकारामाचे म्हणून जे अभंग दिले आहेत, ते नामदेवाच्या नांवावरही घातलेले पाहिले. भानुदासाचा काल इ. स. १४४८ ते १५१३ अशी समजूत आहे, आणि नामदेवाचा जन्म तर शके ११९२ (इ. स. १२८०) मानला जातो. तेव्हां ज्ञानदेवकालीन नामदेव भानुदासावर अभंग लिहील हें अशक्य आहे. तेव्हां या अभंगाचा कर्ता असलाच तर तुकारामच असणें जास्त संभवनीय आहे, हें निराळें सांगण्याचें कारण नाहीं. याविषयीं जास्त उहापोह करण्याचें हें स्थळ नव्हे. कवन कुणाचेंही असलें तरी जुनी कथा कळण्यास तें पुरेसें आहे. महाराष्ट्र-जनमनावर विठ्ठलभक्तीची जी विलक्षण पकड दिसते ती किती स्वाभाविक आहे, हें वरील आख्यायिकेवरून उघड दिसून येईल.

---

पं. महादेवशास्त्री जोशी



थोड्या वेळानें
विसावलेल्या
दोन व्यक्तींचीं
काहीं वाक्यें
त्रवेळच्या वृक्षवल्लरींना
ऐकायला मिळालीं. ती म्हणाली—

# शेखर, मी चुकल्यें...

आणि तो म्हणाला—नाहीं हिरा,
चुकत होतीस;
पण वेळींच सांवरलीस.

रात्रीचा पहिला पार संपला होता. त्या गांवढ्या गांवांतले दिवे विझले होते. निजानीज झाल्यामुळें सगळीकडची 'जाग माग' थांबली होती. दहा पंधरा खोपटांच्या त्या पुंजक्यावर अंधारानें काळी ताडपत्री पसरली होती आणि अशा वेळीं शेखर त्या गांवांत शिरून एका कौंबळी घरापुढें थांबला होता. बंद असलेल्या दाराच्या फटींतून एक लहानशी प्रकाशरेखा बाहेर येत होती. तेवढ्या आधारावरच तो तिथें उभा राहिला होता.

त्याची चाहूल लागतांच आंगणांतलें गोधन खडबडून उठलें. उभ्या-उभ्या डुलकी घेणाऱ्या घोड्यीनें कान उभारले. वाघा—वांशेलाच्या साम्राज्यांत जीव जगवणाऱ्या त्या गुरांचें मन सर्वविषयीं सावध होतें. गुरांची धडपड ऐकून घराचें दार किलकिलें झालें. पेटत्या चिमणीसह मालक बाहेर डोकावला. एक 'तेल्या' पंचा त्यानें कानांवरून पट्टी घेऊन डोक्याला बांधला होता. त्यावरून तोहि आतां झोंपण्याच्या तयारींत होता हें दिसत होतें. अशा वेळीं दार उघडून बाहेरच्या थंडींत यावें लागलें याबद्दल त्याच्या मुद्रेवर त्रासिकपणा दिसणें अगदीं साहजिक होतें. मेरेपलीकडच्या उभ्या आकृतीकडे पाहून त्यानें हटकलें.

"कोण आहे?"

"पाहुणा." शेखरनें उत्तर दिलें.

'ही काय पाहुण्यानें यायची वेळ झाली' असे तुसडे शब्द त्याच्या ओठांशीं जमले. पण लगेच गृहस्थधर्माची जाणीव जागी होऊन त्यानें म्हटलें, 'या आंत.'

शेखरला याच घरीं मुक्काम करायचा होता असें मुळींच नव्हे. आपल्या मागचा पोलिसांचा ससेमिरा चुकवण्यासाठीं शहरी वस्तीपासून दूर जायचें आणि जमेल तिथें आसरा घ्यायचा, एवढेंच त्याचें ठरलेलें होतें. गोमंतकाच्या उत्तरेला सह्याद्रीच्या पायथ्याशीं तुरळक मनुष्यवस्ती आहे, हें त्यानें भूगोलाच्या पुस्तकांत कधींतरी वाचलें होतें आणि त्याचा पडताळा घेण्यासाठीं निघाल्यावर आज तो या गांवांत अन् या घरासमोर येऊन धडकला होता.

शेखर आंत जाऊन चौफाळ्यावर बसला. दरवाज्याच्या भिंतीला लागूनच एक पत्रा मंदपणें पेटत होता. तिथेंच एक अंथरूण पसरलेलें होतें. तें जर नसतें तर शेखर त्या पत्र्याशेजारींच बसून आपल्या गारठलेल्या हाता–पायांत ऊब आणणार होता. पण एवढ्यांत परक्या माणसाची चाहूल लागून तें अंथरूण चुळबुळलें. पाठोपाठ कांकणांचा नाद किणकिणला. लगोलग अंथरूण गुंडाळलें जाऊं लागलें. दोन सावळ्या हातांनीं तें अलगद उचललें. तें अंथरूण अंतर्भागांत जायला निघालें आणि पेटल्या चिमणीशिवाय आणखी दोन ज्योती लकाकल्या आणि पाठोपाठ एक उभार ठेवण धरित्रीवर भार न घालतां द्रुतगतीनें मधल्या दारांतून अदृश्य झाली. चारदोन क्षणांचें हें मूकनाट्य शेखरच्या रसिक हृदयांत एक स्पंद निर्माण करून समाप्त झालें आणि मग तो शंभुशेटीच्या प्रश्नांना सन्मुख झाला.

"—मी होय ? मी पणजीचा रहाणारा."

"इकडे कुणीकडे निघालां होतां ? घाटावर बिटावर जायचं आहे कीं काय ?"

"छेः छेः ! घाटावर नाहीं जायचं. याच बाजूला थोडं काम आहे."

पण शंभुशेटीची जिज्ञासा एवढ्यावर थांबणार नव्हती. तो कोण आहे अन् या बाजूला त्याचें नक्की काय काम आहे तें त्याला कळायला हवें होतें. रात्रभर निवारा द्यायचा तर तशी चौकशी करण्याचा त्याला अधिकारहि होता. शेखर प्रथम थोडासा घुटमळला अन् मग मात्र त्यानें अस्खलितपणें सांगायला सुरुवात केली.

"माझं नांव शेखर शिरोडकर. अंत्रुजेंतला रहाणारा. पणजीच्या मेडिकल कॉलेजांत शिकतों. मला वनस्पतिसंशोधनाचा नाद आहे. निरनिराळ्या रोगांवर अचूक गुण देणाऱ्या अनेक वनौषधी मीं शोधून काढल्या आहेत. सह्याद्रीच्या या भागांत कांहीं आश्चर्यकारक वनस्पति आहेत असं मीं ऐकलं आहे. मला त्या हुडकून काढायच्या आहेत. त्यासाठीं मला या भागांत कांहीं दिवस मुक्काम करावा लागणार आहे—"

शेखरचें हें आत्मनिवेदन ऐकत असतां शंभुशेटीच्या मनांत एक निराळीच आशा निर्माण झाली. आपल्या आम्लपित्तावर सांखळीच्या डॉक्टरांचीं तांबडीं पिवळीं औषधें घेऊन त्यानें आपल्या तोंडाची रुचि बिघडवून टाकली होती. गुण मात्र रुपयांतला एक आणासुद्धां आला नव्हता. या नव्या पाहुण्याकडून आपल्या रोगावर एखादी रामबाण औषधी मिळाली तर किती बहार होईल, असा विचार त्याच्या चित्तांत उमटतो न उमटतो तोंच शेखर पुढें म्हणाला—

"आतां उद्यांपासून संशोधनाला सुरुवात. तुम्हांलासुद्धां कांहीं दुर्धर रोगांवरचीं अगदीं हमखास औषधं सांगून टाकीन. न्यूमोनिया, हाडांचा व्रण, पांडुरोग, आम्लपित्त......"

आणि शंभुशेटीच्या काळजानें एकदम उडी मारली.

"खरंच म्हणतां ? मग तुम्हांला आठपंधरा दिवस रहायचं तें आमच्याकडेच रहा. गरिबाच्या घरीं तुमचा इतमाम व्हायचा नाहीं; पण जी काय आंबील–पेज मिळेल ती घ्या गोड करून."

शेखरनें शंभुशेटीचे आभार मानले. असलें असत्य पचलें अन् रुचलें याबद्दल त्याला देवाचेहि आभार मानणें भाग होतें. त्या असत्यानेंच त्याला शंभुशेटीच्या घरांत जागा मिळवून दिली होती. आणि या सवलतींचा फायदा घेऊन निवांतपणें तो आपले पुढचे बेत आंखणार होता. या वेळीं तो खरें बोलता तर ?—

आपण क्रांतीचें असिधाराव्रत पत्करलें आहे, आपल्याला या डोंगरी कुळवाड्यांत पोर्तुगीजांच्या जुलमाबद्दल त्वेष निर्माण करायचा आहे, त्यांची संघटना करायची आहे, राण्यांच्या क्रांतियुद्धांत ज्यांनीं आपलें निवडें शौर्य दाखवलें, त्यांच्याच वंशजांना चेतवून त्यांना धारकरी बनवायचें आहे आणि मग एक दिवस उघडपणें रणखांब पुजून 'हरहर महादेव' म्हणायचें आहे, हें जर त्यानें शंभुशेटीला सांगितलें असतें तर ही चालती बोलती आग त्यानें आपल्या पागोळीला क्षणभरसुद्धां राहूं दिली नसती.

सकाळीं उठून शंभुशेटीनें डोक्याची टापशी सोडली आणि 'सावल्या–पोटल्यां'ची गोणी घोड्यावर लादून सह्याद्रीच्या दऱ्याला जायची तयारी केली. कोणाचे कांदे, कोणाच्या मिरच्या, कोणाचा तंबाकू, अशा वस्तू, ज्यांच्या त्यांच्या सांगण्याप्रमाणें दऱ्याच्या गिऱ्हाइकांना घरपोंच द्यायच्या; त्यांच्याकडचा केळीं, लिंबें, अळवाच्या माड्या, तुरी, नाचणी वगैरे माल खरीदून तो सांखळीच्या बाजारांत नेऊन विकायचा हें त्याचें नित्याचें 'वाणिज्य' होतें. 'पाव्हण्यांना चहा बिहा दे बरं का' असें त्यानें जातांना अंगणांतूनच मोठ्यानें सांगितलें आणि त्याच आवाजानें शेखर जागा झाला. त्यानें बाहेर येऊन पाहिलें तों शंभुशेटीचा 'श्यामकर्ण' लचक् लचक् करीत पुढें चालला आहे अन् शंभुशेट खांद्यावर एक रिकामें पोतें टाकून त्याचा मागोवा घेत आहे असें त्याला दिसलें.

इतकेंच नव्हे तर, काल रात्रीं अंधार असल्यामुळें न दिसलेल्या किती तरी गोष्टी एकदम त्याच्या नजरेंत भरल्या. सह्याद्रि—तो महाराष्ट्राचा कणा—त्याच्यापासून एका कोसाच्या अंतरावर उभाच्या उभा पसरला होता. त्याचीं अनेक शिखरें निमुळतीं वाढून आकाशाच्या चांदव्यांत घुसत होतीं. कुठें त्याचें पोट वाढलेलें; तर कुठें खोल गेलेलें. कुठें झाडी विरळ; तर कुठें घनदाट. काळ्या कड्यांवरून पावसाळ्यांत जे जलप्रपात कोसळले त्यांचे आतां उभ्या नामासारखे पांढरे डाग तेवढे शिल्लक राहिले होते. उजवीकडे दृष्टि वळवावी तरी त्याचा अंत नाहीं. डावीकडे वळवावी तरी तो आहेच. त्याच्याकडे पहातां पहातां शेखरच्या डोळ्यांना टक पडलें. त्याच्या शिखरांइतकाच त्याचा आदरभाव उत्तुंग झाला. तें भव्यतेचें दर्शन त्याच्या आत्म्याला इवल्याशा हृदयांत सामावूं देईनासें

झालें. त्याला वाटलें,—वृक्ष—व्याघ्रांसह गुरेंढोरें, माणसें यांना कडेखांद्यावर नांदवणारा हा गिरिराज, हाच आतां आपलाहि पाठीराखा. हीच आपली कार्यभूमि अन् हांच विसांवा......

त्याचीं प्रातःकृत्यें उरकतात तोंच वगपुढच्या निरुंद ओट्यावर चहा आला. चिनी मातीच्या बशींत पितळी फुलपात्र असा त्या चहाचा सरंजाम होता. त्याच्या गुलाबी रंगावर भुकटींतले काळे कण तरंगत होते. ओटी-वरचा परसा सांडून त्यावरच तो बनवला गेला होता आणि शंभुशेटीच्या कन्यारत्नानें तो त्याच्यापुढें केला होता. शेखर त्या पेयाकडे पाहून स्वतः-शींच हंसला. नाराज होणाऱ्या मनाला त्यानें म्हटलें, 'पुढें आलेल्या पदा-र्थाचा आदर कर. यापुढें हा तरी तुला नियमित मिळेल याची शाश्वति काय? हाल अन् वनवास हेच आतां तुझे राजभोग.'

ओटीखालीं पाय सोडून तो चहा पीत होता. शंभुशेटीची मुलगी दाराआडून आपल्याला पहाते हें त्याला कळण्याजोगें नव्हतें. त्याच्या चेहऱ्याची एकच बाजू तिला दिसत होती. त्यानें आपल्या केसांची भांगाच्या खालीं 'रेघ' धरली होती. मिशा कोरलेल्या होत्या. त्याच्या रुंद कपाळपट्टीवर भुरभुरणारे केसांचे झुपके आणि गोऱ्या मानेवर त्यांची झालेली प्रमाणशीर उतरण, हिरेला मोठी मोहक वाटत होती. त्याचे निळसर स्वप्नाळू डोळे, आरक्त अशी कानाची पाळ अन् किंचित् पुढें आलेल्या हनुवटीवरची ती खोलगट मध्यरेषा—हिरेला वाटलें, 'याचा कोणता अवयव सुंदर नाहीं? आमंत्रणावांचून असा हा देखणा तरुण आपल्या घरीं यावा, हें केवढं नवल! पण आतां यांच्याशीं बोलायचं कसं? वागायचं कसं? मला बाई लाज वाटेल...'

पण तिला ती लाज फार वेळ टिकवून धरतां आली नाहीं. ती अंगण झाडायला आली तेव्हां शेखरनें सह्याद्रीकडे बोट दाखवून तिला विचारलें,—

"डोंगरांत हे मधून मधून धुराचे लोट उठलेले दिसतात, ते कसले तुला ठाऊक आहे?"

तिनें आजूबाजूला पाहिलें. आपल्याशिवाय त्याला त्या प्रश्नाचें उत्तर द्यायला जवळपास कोणीच नव्हतें. गप्प बसणें म्हणजे पाहुण्यांचा अपमान. अखेर तिलाच धीर करावा लागला.

"लहान लहान वाड्या आहेत त्या." ती म्हणाली आणि मग आपण केवढें साहस केलें या जाणिवेनें तिचें ऊर थोडा वेळ धडधडत राहिलें. पण शेखरचा प्रश्न तेवढ्यावरच संपला नव्हता. त्यानें पुन्हां विचारलें,—

"तुला नांवं माहीत आहेत त्यांचीं? तूं गेली होतीस कधीं त्या बाजूला?"

"गेलें होतें वडलांच्याबरोबर एकदोनदां. हा समोर धूर येतो तो धनगरवाडा. एकच धनगर रहातो तिथें. दोन खंडी म्हसरं आहेत त्याचीं. त्याच्या पुढची ती गादाळी. त्या पलीकडची शिंकाळी—"

"अन् तें लांब तिकडे डोंगराच्या आडव्या फांद्याच्या मुळाशीं धुरकट दिसतं तें?"

"तें होय? तें सरकारी मेट."

"अरेच्या—" शेखर म्हणाला अन् त्यानें मग पुढें कांहीं विचारलें नाहीं. तो आंत गेला आणि पिशवींतली कागद—पेन्सिल घेऊन बाहेर आला.

डोंगराकडे पहात पहात त्यानें कांहींतरी चितारणें सुरू केलें. तिला वाटलें तो कसलं तरी चित्र काढतो आहे. पण मागें उभी राहून पहाते तर नुसत्या रेघोट्या, बाण अन् वर्तुळें—

गेल्या रात्रीं त्यानें शंभुशेटीला जें सांगितलें होतें त्याचा आज नोंद-संपादणी सुरू करणें भाग होतें. दुपारीं त्याच वगांतल्या एका कोयता मागून घेऊन तो बाहेर पडला. सुमारें अर्ध्या मैलावर एका नदीनें त्याची वाट अडवली. शरदृतु निम्माअधिक संपत आल्यामुळें आतां तिला पायउतार झाला होता खरा; पण अजून प्रवाहाला ओढ होती. तिच्या खळाळाचा मंद्र नाद अनुस्यूतपणें उठत राहिला होता. पात्रांत रेती किंवा माती नांवालासुद्धां नव्हती. होते ते सगळे गुंडगोळ दगड. बाहेर होते ते कोरडे पडले होते अन् प्रवाहांत होते त्यांवर शेवाळ दाटलें होतें. उतरून जातांना सामान्य मनुष्य दोन दगडांच्या सांदींत पाय तुरगळून किंवा शेवाळावरून निसरून बहुधा खालीं रगडायचा म्हणून कोणीतरी तिला पुल्लिंगी 'रगाडा' असें नांव ठेवलें होतें आणि तेंच पुढें रूढ झालें होतें.

शेखरनें रगाडा उतरून पलीकडे जाण्याचें काम दुसऱ्या दिवसावर टाकलें आणि तो कांठाकांठानें वर जाऊं लागला. चालतां चालतां त्याला एका घळींत उतरावें लागलें. पांच सहा हात रुंद आणि दहा बारा हात लांब असा तिचा विस्तार होता. दोन्ही बाजूंच्या वृक्षशाखांनीं हात-मिळवणी करून तिच्यावर सुंदर मांडव घातला होता अन् त्यावर वेलींचें जाळें पसरलें होतें. त्या घळीचें मुख समोरच्या रगाड्यांत उघडत होतें. तें शांत अन् निवांत स्थळ शेखरला फार आवडलें. राधा—माधवांच्या

नकाशांत वर्तुळ गिरवून गिरवून ठळक केलेल्या त्या सरकारी मेटाचीहि त्यानें धाकल्याकडूनच माहिती मिळवली.

तो आतां फक्त नांवालाच शंभुशेटीचा पाहुणा होता. त्याचें त्या घरचें जाणें येणें अनियमित झालें होतें. आला तर एखादे वेळीं अपरात्रींसुद्धां तो तिथें येई आणि परस्पर मागच्या ओटीवर झोपे. त्यानें तिथें आपल्या साठीं एक लहानसें अंथरूण ठेवून दिलें होतें. त्याच्या अशा या वागण्यानें हिरा बेचैन होई. तिचें अंथरूण ही कंटकशय्या बने. मागच्या ओटीवर चटई वाजते कीं काय, याकडे तिचे कान असत. शेखरविषयीं एका नव्या भावनेचा स्पर्श झाल्यापासून तिच्या उशीला कढत निःश्वासांनीं पोळावें लागे.

एखाद्या वेळीं ती दुपारीं किंवा चौथ्या प्रहरीं कोणाच्या नकळत रगाड्याजवळच्या त्या घळीकडे फेरी मारी. तिनें ती जागा पाळतली आहे हें समजल्यावर शेखरनें तिला बजावलें होतें, 'पुन्हा इकडे यायचं नाहीं अन् मी इथें वसतों हें अगदीं काळजाच्या कुपींत ठेवायचं.' त्या आज्ञेचा उत्तरार्ध तिनें कसोशीनें पाळला होता; पण भावविवशतेमुळे पूर्वार्ध मात्र तिला पाळतां आला नव्हता. पण बहुधा तिचें तें जाणें निष्फळच व्हायचें.

हिरेच्या मनांतल्याच्या अस्वस्थतेची शेखरला कल्पनाहि नव्हती. तो आपल्याच नादांत निमग्न होता. एक आतिथ्यशील खेडवळ मुलगी एवढेंच तिच्याविषयींचें त्याचें ज्ञान होतें. आपल्या अल्पशा सहवासानें तिच्या अंतःसृष्टींत रसभावांचे सागर हेलावले असतील हें त्याच्या स्वप्नांतसुद्धां आलें नव्हतें. त्याचे सारे जीवभाव आतां सह्याद्रींत गुंतले होते. तो नवा शिवाजी होऊं पहात होता. धाकल्या त्याचा तानाजी बनला होता. गांग्यानें बहिर्जी नाईक व्हायचें ठरवलें होतें. झेंगडा म्हणत होता, 'शेखरदादा, तुझो सबुद थंय माजी मान' त्या रांगड्या जवानांत त्यानें स्वतःबद्दल विश्वास अन् पोर्तुगीज राज्याबद्दल त्वेष निर्माण केला होता. स्वातंत्र्यांतल्या गौरवास्पद जिण्याचें सप्तरंगी चित्र त्यानें त्यांच्यापुढें उभें केलें होतें. दादा-राणा, दिपाराणा, यांच्या वीरकथा सांगून त्यांच्या प्राणांत फुंकर मारली होती. चाळीस वर्षांपूर्वीं तें शेवटचें 'राण्यांचें बंड' समाप्त झाल्यावर मूर्च्छित, निश्चेष्ट पडलेले सह्याद्रीचे दरे दरकुटे, शेखरच्या आगमनानें जागे होऊन डोळे किलकिलावूं लागले होते.

शेखरनें तो सबंध पट्टा डोळ्यांखालूनच नव्हे, तर पायांखालूनहि घातला होता. आज झांदण्या रात्रीं त्यानें गांग्यासह गुप्तपणें सरकारी मेटाचीहि पहाणी केली होती. तिकडून परत आल्यावर धाकल्याच्या घरीं त्यानें सगळे मर्द गडी गोळा केले होते. कागदावर नकाशा काढून त्यानें त्या मेटाचें रेषाचित्र त्यांच्या समोर मांडलें होतें. तिथली वस्तुस्थिति समजावून देऊन 'मारगिऱ्या' हि सांगितल्या होत्या आणि त्यानंतर चारपांच दिवसांनीं एका मध्यरात्रीं मेटावर घाला घालून त्यानें साधलेला तो डाव—

सातआठ निवडक जवानांसह तो त्या मेटाजवळ येऊन थडकला. आपले सैनिक त्यानें दोन ठिकाणीं विभागले. गांग्यासह तिघे चौघे मेटाच्या पूर्वेला अंगणाच्या उंच धडेखालीं उभे राहिले. धाकल्या, तो स्वतः अन् बाकीचे पश्चिमेला किनळीच्या झाडाआड लपले. गांग्यानें बाटलींतलें रॉकेल फापडाच्या बोळ्यावर ओतलें. पहिला पेटता बोळा रेजिदोराच्या शयन-गृहाच्या खिडकींत जाऊन पडला. पाठोपाठ तिथेंच दुसरा. तिसरा, चौथा हे पडवींतल्या खांबांच्या मुळांशीं. खिडकीनें पेट घेतला. खांबहि त्याच मार्गाला लागले.

रेजिदोराची कोळी मडम प्रथम जागी होऊन ओरडली. 'आग, आग!...' त्यासरशीं रेजिदोरहि आपल्या बदली बदतीच्या गोड स्वप्नांतून दचकून उठला. पोरेंबाळें किंचाळूं लागलीं. मागच्या खोपटांतून निद्रासुख घेणारे नीग्रो रक्षक धांवून आल्याचें समजल्यावर आंतलें सगळें लटांबर दार उघडून बाहेर आलें. सगळे त्या पेटल्या भागाकडे 'आ' वासून पाहूं लागले. तो गांवठी साहेब हातवारे करीत, त्या नीग्रो आडमुठ्यांना गाळी घालीत 'विझवा, विझवा' म्हणून कंठशोष करूं लागला. पण विझवायचें कशानें? फुंकरानें का मंत्रानें? पाणी आणायचें तर विहीर होती अर्ध्या फर्लांगावर अन् त्यदल्या होत्या कोठीच्या खोलींत कुलूपबंद.

मडमेनें नुमतें कथकली नृत्य आरंभलें होतें. पोरें तिच्या नाड्यांना विलगलीं होतीं; एवढ्यांत आणखी एक बोळा तिच्या पायाशीं येऊन पडला. हा गांग्याचा चावटपणा होता. पण तेवढ्यावरून त्या लोकांना आक्रमक कोणीकडच्या बाजूला आहेत तें कळलें. सगळे शिद्दी त्या रोखानें धांवले. गांग्यानें आपल्या सोबत्यांसह त्यांच्यापुढें रानांत उड्या घेतल्या. झिळीझिळ-कुऱ्या हालवीत, हुल्कावण्या दाखवीत गांग्यानें त्यांना बरेंच लांबवर नेलें. शिद्द्यांच्या हाताला गवसला नाहीं एकटासुद्धां.

आणि याच संधीला पूर्वेकडच्या शस्त्रागाराच्या दारावर धाकल्याची कुऱ्हाड पडली. दार पाडून सगळे आंत घुसले. भिंतीला टांगलेल्या बंदुका, संगिनी तोस्तानें अन् काडतुसाचे पट्टे, हा सगळा शस्त्रसंभार दारुगोळ्यांसह त्यांनीं हातासला. रेजिदोर ते दणके ऐकून त्या बाजूला वळूं पहात होता; पण मडमेनें त्याचा हात खसदिशीं ओढला. पांचसहा माणसें मेटाच्या पायऱ्या उतरून जात आहेत, एवढेंच त्याला अंधुकसें पहातां आलें आणि त्यानंतर थोडा वेळ पावलांचा धप् धप् आवाज कानांत घुमला.

हा पहिला लग्गा साधल्यावर चार दिवसांनीं शेखर रगाडा उतरून अलीकडे आला. शंभुशेटीनें 'तुम्ही हल्लीं दुर्मिळ झालांत, कुळवाड्यांत

रमलांत, ' अशी सौजन्याची तक्रार करून त्याच्या वनस्पतिसंशोधनांतली प्रगति विचारली. त्यानेंहि अघळपघळ खूप सांगितलें. पण तो आल्याचा खरा आनंद झाला होता तो हिरेला. तो पूर्वीपेक्षां थोडासा खंगला असल्याचें तिला ओढळून आलें. त्याच्या खाण्यापिण्याचे हाल झाले असले पाहिजेत हें तिला न सांगतां कळून आलें. आजच्या रात्रीं तरी त्याचा चांगला परामर्श व्हावा म्हणून तिनें आईच्या पाकसिद्धींत विशेष आस्थेनें भाग घेतला.

शेखर आज इकडे आला होता तो सुखासुखीं नव्हे. त्यानें गांग्याच्या हस्तें आपल्या भूमिगत सहकाऱ्यांना एका संकेतस्थळीं संदेश रवाना केला होता. संदेशाप्रमाणें ते आज रात्रीं इथें पोहोंचावे अशी त्याची अटकळ होती. त्यांच्या स्वागतासाठीं, त्यांना सह्याद्रींत नेण्यासाठीं तो पुढें आला होता. रात्रीबरोबरच त्याची उत्कंठाही वाढत होती. नक्षत्रांबरोबरच त्याच्या आशेची लुकलुक चालली होती. पण त्या रात्रीं त्याच्या भविष्यांत ' मित्रलाभ ' नव्हता, हेंच खरें.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं भरपूर फराळ करून शेखर जेव्हां जायला निघाला, तेव्हां हिरेनें भिंतोडीला राहून सह्याद्रीकडे तर्जनी रोखली. ' तुम्ही डोंगरांत निघालां काय ? ' हा त्या खुणेचा अर्थ होता. शेखरनें नकारार्थी मान हालवली. हिरेनें पुनश्च तर्जनी जमिनीकडे रोखली. ' मग काय घळींत थांबणार ! ' आणि त्यावर शेखर नुसता हंसला.

शेखरनें घळींत येऊन काल येतांना बरोबर आणलेली आणि घळींतल्या पर्णसंभारांत निजवलेली बंदूक जाग्यावर आहे कीं नाहीं हें प्रथम पाहिलें. ती जिथल्या तिथें होती अन् तिच्या शेजारीं तो काडतुसांचा पट्टा पण होता. त्यामुळें शेखरच्या काळजाला धीर आला. तो पुनश्च तिथून बाहेर पडला. रगाड्याच्या कांठाकांठानें तो बराच वर गेला. जिथें बरें वाटलें तिथें त्यानें मनसोक्त स्नान केलें आणि मग दुपारच्या विश्रांतीसाठीं तो फिरून घळींत दाखल झाला. आजचा सबंध दिवस तो या बाजूला काढणार होता आणि दुसऱ्या दिवशीं सहकारी आल्यास त्यांच्यासह, अन् न आल्यास त्यांच्याविरहित सह्याद्रींत शिरणार होता.

घळींत त्याचें शरीर विसांवा घेत होतें; पण मनाचें ' चंक्रमण ' चालूच होतें. ' चार दिवसांपूर्वीच्या त्या ' ज्वलंत ' प्रकरणामुळें आपल्यावरची जबाबदारी एकदम वाढली आहे. त्या रात्रीं आपण एका बद्धमूल सत्तेला पुरतं डिवचलं आहे. आतां ती नंगा नाच घालील. आपण युक्तिबळानं तिला पुरून उरलं पाहिजे. कशाहि स्थितींत आपल्या अनुयायांचा धीर खचूं द्यायचा नाहीं अन् सिद्ध केलेला यज्ञीय अग्नि विझूं द्यायचा नाहीं ही जबाबदारी आतां आपल्या शिरावर आली. ध्येय ठरलेलं आहे. पण आतां धोरण निश्चित केलं पाहिजे आणि त्याचसाठीं तर माझे सहकारी मला आतां तावडतोब येऊन मिळाले पाहिजेत.

शेखर अशा विचारांत गढून गेला होता अन् एवढ्यांत हिरा तिथें अवचित प्रकटली. जणूं शिशिरांतली आम्रमंजरी. जणूं वसंतांतली वायु-लहरी. शेखर लवंडला होता तो एकदम उठून बसला. एक गहिरा कटाक्ष. गालावर चिरी पडेल इतक्या बेताचें एक भावपूर्ण स्मित. अन् बाकी सगळें मौन. हिरेची आपादमस्तक स्थिर मूर्ति शेखरनें पाहिली ती या वेळीं प्रथमच. जिन्या झेंडूच्या एकावर एक दोन वेण्या तिनें माळल्या होत्या तरी तिची ' अलका नगरी ' झांकली गेली नव्हती. हिरेचे नाक–डोळे रेखीव म्हणतां आले नसते. तिचा घाटहि प्रमाणबद्ध आहे असें म्हणणें कठीण होतें. तिची साडीचोळीसुद्धां जाडी भरडीच होती. पण तिचें मादक यौवन हे सगळे दोष पोटांत घालून तिच्या अंगप्रत्यंगांतून निथळत होतें. तोच एक तिच्या कायेला व्यापून उरणारा सर्वोत्कृष्ट अलंकार ठरला होता. तिच्या सांवळ्या गालांवर गुलाबी कांतीनें अशी कांहीं संगति साधली होती कीं, जसा आभाळाच्या ' निळावंती ' वर संध्येचा पुसट रक्तिमा. जणूं अनंगानें प्रथम तांबडी शलाका ओढली अन् मग तो रंग हलक्या बोटानें पुसून घेतला.

त्या निर्भर एकांतात, त्या अलक्षित भूभागांत, त्या निबिड लताकुंजांत कसल्यातरी भावप्रक्षोभानें थरारत अधोमुख होऊन उभी असलेली अन तर्जनीच्या आरक्त नखाभोवतीं पदराच्या टोंकाचे वेढे देणारी, हिरा त्या वेळीं शेखरला मदनाची असिलता वाटल्यास नवल नव्हतें. तो मनांत म्हणाला, ' कशाला आली आहे ही इथें ? '

खरेंच, कशाला आली होती हिरा ? ती पतंग होऊन पेटत्या दिव्यावर झडप घालायला आली होती. स्वतःचे पंख पोळून घेऊन धरणीवर घायाळपणें पडायला आली होती. ती आली नव्हती; तिला कोणत्या तरी दुर्दांत शक्तीनें पदराला धरून खेंचून आणलें होतें. देवयानी, शर्मिष्ठा, चंद्रसेना, या पुराणकाळीं कामज्वरानें धगधगलेल्या प्रमदा, तिच्या हृदयांत आज एकाएकीं सजीव झाल्या होत्या. संकेतस्थळीं निघालेल्या त्या जुन्या अभिसारिका निदान अंधाराची तरी ओढणी घेत; पण हिनें उघड्या अंगानें सूर्याला साक्षी ठेवून पुढें पाऊल टाकलें होतें. ती निश्चल उभी होती तरी तिच्या श्वसनांत वेग आला होता हें सांगायला ते दोन साक्षीदार पुरेसे होते. तिचीं आरक्त कानशिलें, निढळावरचे घर्मबिंदू, डोळ्यांतल्या बाहुल्यांवर आवरण घालूं पहाणाऱ्या लांब पापण्या, अधराची ती लवलव, या सर्व गोष्टी इतक्या बोलक्या होत्या कीं तिनें कांहींहि न सांगतां ती कशासाठीं आली आहे हें शेखरला कळून चुकलें.

क्षणभर त्याच्या शरीरावर रोमांच लहरून गेले. तो उठला असता, त्यानें एक पाऊल पुढें टाकलें असतें, एक हात थोडासा लांब केला असता, तर ती कामदेवाची राजधानी त्याला एका क्षणांत सर करतां येणार होती. तें अमृदित, अनाघ्रात नवयौवन त्याला अष्टांगीं शरण येणार होतें. त्या सांवळ्या सकंकण भुजलता त्याच्या गळ्याभोंवतीं लपेटणार होत्या. केवढा जबरदस्त मोह होता तो !

शेखरला वाटलें, आपण इंद्राच्या अमरावतींत पाहुणा गेलेला अर्जुन

आहों अन् हिरेच्या रूपानें उर्वशी आपल्या एकांतांत प्रविष्ट झाली आहे. फक्त हातात पंचारती तेवढी नाहीं. बाकी सगळे मनोभाव, सगळ्या अभिलाषा तिच्याच. शेखरच्या अंतरांत मद–मोहाच्या संयुक्त फौजा उठावल्या. विवेकाचे बुरूज ढांसळतात कीं काय, संयमाचें धरण फुटतें कीं काय, असा शेखरला संदेह उत्पन्न झाला.

आणि त्याला विक्रमाच्या दरबारांतला तो प्रसंग आठवला. एक कवियाचक पुढें येऊन त्या राजेश्वराला सवाल टाकीत होता, 'विक्रमराजा, याचक मागेल तें तूं देतोस अशी तुझ्याबद्दल उगीच 'भुमका' उठली आहे. बोल शककर्त्या, शत्रूला तूं कधीं पाठ दिली आहेस ? परनारीला कधीं हृदय ओपलं आहेस ? ' विक्रमानें छाती फुलवून त्या वेळीं नकारार्थी मान हालविली. कवीची ती उघड निंदा पण प्रच्छन्न प्रशंसा त्यानें सहर्ष स्वीकारली. अन् मी ? पुढच्या आयुष्यांत हाच सवाल मला कोणीं टाकला तर ! मी काय उत्तर देऊं ? छेः ! मी एका पवित्र ध्येयाची साधना करीत आहें. या मार्गांत हिरेसारख्या 'मोहनवेली' पायांखालीं पडूं देतां कामा नयेत.

" हिरा, गैरसमज झाला तुझा. मी तसल्या प्रवृत्तीचा नाहीं बरं—!"

हिरेनें ते शब्द ऐकले. पण तिला त्यांतला अर्थ आकळला कीं नाहीं कोण जाणे ! तिनें आपल्या दृष्टींत अन् स्थितींत कांहींच फरक दाखवला नाहीं. शेखरच्या त्या बोलण्यावर तिचा विश्वास नव्हता काय ? पुरुषांच्या संयमाच्या, साधुत्वाच्या भाषेंत कांहीं तथ्य नसतें असेंच तिला वाटत होतें काय ? पण त्या गिरिकन्येला पुरुषजातीचा अनुभव तरी कुठला ! जीवनांत तिला 'पुरुष' भेटला होता तो हाच पहिला आणि त्याच्यावरच ती आपली काया कुर्वंडायला निघाली होती.

पण त्या वाक्याचा परिणाम तिच्यावर झाला होता हें पुढच्याच क्षणीं दिसलें. तिची मुद्रा एकाएकीं पालटली. डोळ्यांच्या कडांवर अश्रूंची झालर चमकूं लागली. त्यांपैकीं दोन तिच्या वक्षःस्थळावर पडून पदरांत मुरले. तिनें आपली अधोदृष्टि वर उचलून शेखरच्या मुखावर लावली. त्या दृष्टीनें शेखरचं काळीज कातरलें; पण विरघळलें मात्र नाहीं. तो आतां पूर्णपणें सांवरला होता. त्यानें तिला मृदु शब्दांत पण निस्संदिग्धपणें म्हटलें,—

"हिरा, अशी आत्मघाताला प्रवृत्त होऊं नको. जन्मभर ज्याचं स्मरण झालं असतां शरमेनं मान खालीं पडेल असं कर्म मनाला 'आंवर घालून' टाळावं, समजलं ? जा तूं आतां घरीं."

शेखरनें एक दीर्घ निःश्वास सोडला आणि नजर दुसरीकडे वळवली. आणि मग हिरा तिथून लगेच बाहेर पडली. ती गेली; पण जळत, तापत गेली. जी आग शमवण्यासाठीं ती आली होती तिच्यांत अधिक तेल पडलें. आली होती लडिवाळ प्रेयसी म्हणून; पण गेली ती जहरी नागीण बनून. तिच्या प्रेमाचा धिक्कार झाला होता. हृदयांत फुलवलेलें वासंतिक उद्यान तुडवलें गेलें होतें. या अपराधाबद्दल शेखरला ती क्षमा करणार नव्हती. यापुढेंहि तिच्या हृदयांत शेखर रहाणार होता; पण तो प्रियकर म्हणून नव्हे; तर दावेदार म्हणून !

ती घरीं येते तों तिथें एक निराळाच गंभीर प्रसंग उभा झाला होता. चार पांच शिपाई आणि एक लांब विजारवाला सार्जंट असे सरकारी लोक अंगणांत उभे होते आणि त्यांनीं शंभुशेटीला वेढलें होतें. 'शेखर कुठें आहे सांग' ही एकच धमकावणी ते शंभुशेटीला वेगवेगळ्या स्वरांत अन् शब्दांत देत होते. हिरेनें हा प्रकार पाहिला. ती प्रथम घाबरली. पण दुसऱ्याच क्षणाला अंतरांतल्या तीव्र द्वेषानें तिला धीट बनवलें,

" तुम्हांला शेखर पाहिजे ना ? चला मी दाखवतें. "

सार्जंटानें तिला शाबास म्हटलें. शंभुशेटीलाहि बरें वाटलें. शेखर एकदा त्यांच्या हातीं लागला कीं तो झांकल्या पाठीनें सुटणार होता. हिरा पुढें अन् शिपाई मागें असें तें संचलन रगाड्याच्या रोखानें चाललें होतें. हिरा बाहेरून गंभीर; पण आंतून सूडाच्या भावनांनीं नुसती पेटली होती. 'माला मी घरांतच नव्हे; तर काळजाच्या गाभ्यांत आसरा दिला. अनोपकारी कुठला ! याला शिक्षा झालीच पाहिजे...' कुतूहल म्हणून तिनें चालतां चालतां मागें वळून एका शिपायाला विचारलें,

"शेखर सांपडला कीं तुम्ही काय कराल ?"

"काय कराल ? लगेच चतुर्भुज."

"तेंच बरोबर. पण मग त्याला शिक्षा कसली देणार ?"

"शिक्षा ? फार भयंकर आरोप आहेत त्याच्यावर. त्यानं सरकारी मेट जाळलं. अस्त्रं लुटलीं. महाभयंकर माणूस आहे तो—"

आणि मग सार्जंटानं आपल्या अधिकारवाणीनें हिरेला शिक्षेचें स्वरूप सांगितलें,

"अठ्ठावीस वर्षं काळ्या पाण्यावर जाईल तो."

"काळ्या पाण्यावर ? म्हणजे कुठें ?"

"दूर, खूप दूर. तिकडे आफ्रिकेच्या जंगलांत. त्याचं मेलं मढंच बाहेर निघायचं तिथून."

हिरा एकदम थबकली. तिच्या सगळ्या गात्रांना अवचित स्तंभ आला. 'अठ्ठावीस वर्षें ?' तिच्या मनानें त्या संख्येचा पुनरुच्चार केला. तिला एकाएकीं 'घुवळ' आली. तिच्या भाबड्या कल्पनेप्रमाणें शिक्षा म्हणजे दोनचार दिवस उपाशीं ठेवणें किंवा आठपंधरा दिवस बेड्या ठोकून खोलींत कोंडणें. पण ही शिक्षा म्हणजे मुळीं जीवच घेणारी. तिचा चेहरा व्याकुळ दिसूं लागला. '...उभ्या जन्मांत शेखर कधीं आपल्याला दिसायचा नाहीं. म्हणजे ही शिक्षा कोणाला, त्याला का मला छेः छे...... ! हें काय भलतंच करतें मी !'

" थांबलीस कां ? चल लवकर. आम्हांला उशीर होतो. " सार्जंटानें तिला दम दिला. रगाडी आतां जवळ दिसूं लागला होता. तिथून उजव्या हाताला अर्ध्या फर्लांगाच्या अंतरावर शेखरची घळ होती. आतां कसें करावें याची तिला मोठी पंचाईत पडली. शेखरचा पत्ता लागूं द्यायचा नाहीं हें आतां तिनें निश्चित केलें होतें. पण शिपायांना काय सांगायचें ? कुठें न्यायचें ? ती सर्वभावें आपल्या बुद्धीला शरण गेली आणि मार्ग तिला दिसला.

घळीच्या बाजूला नजर न वळूं देतां सरळ पुढें होऊन ती रगाडा उतरूं लागली. 'तिकडे कुणीकडे ?' सार्जंट गुरगुरला. 'नदी पलीकडच्या त्याऽऽघळींत.' तिनें न कचरतां उत्तर दिलें. आपला कोरडा झालेला घसा ओंजळभर पाणी पिऊन ओला केला. रगाड्यांतल्या शेवाळलेल्या दगडांवरून निसरत, घसरत पुढें जात असतां सार्जंट शेखरलाच नव्हे, तर त्याच्या बापालसुद्धां शिव्या मोजूं लागला. तो बापजन्मीं कधीं एवढ्या पाण्यांत उतरला नव्हता. एका शिपायाचा हात पकडून त्या पाण्याच्या पिंतरानें कसेंबसें परतीर गांठलें. विजार खालीं सरकवून तो आपल्या बुटांत पाय अडकवतो आहे एवढ्यांत हिरेनें तोंडापुढें दोन्ही हातांचा कर्णा करून दीर्घ स्वरांत " कुकारा ' घातला.

" शेखऽऽर ! तुम्हांला धरणं आलं आहेऽऽ ! पळा, जीव वांचवा—हुऽ हूऽऽहुः ! "

प्राण पाखडून फाडलेली ती आर्त साद खळाळत्या जलपृष्ठावरून सणसणत जाऊन शेखरच्या कर्णरंध्रांत घुसली. पण तो सावध झाला का ? मागच्या पावलीं पसार झाला का ? पण तें हिरेला कसें कळावें ?

ते अकलेचे अमीर तेव्हां उमजले कीं हिरेनें आपल्याला 'प्रिंपळ' दाखवला. त्यामुळेंच त्यांच्या दृष्टींतले अंगार फुलले आणि त्यामुळेंच शेखरच्या आधीं तिला चतुर्भुज व्हावें लागलें. सार्जंटानें तिच्यावर यथेच्छ तोंडसुख घेतलें. पहिले पाय वाळले नाहींत तोंच पुन्हा त्यांना रगाडा उतरण्याची वेळ आली. येतांना हिरा सुटी होती. पण परततांना तिचीं गोंडस मनगटें दोन शिपायांच्या हातांत होतीं. सार्जंटची स्वारी दोन्ही हातांनीं बाहा ताणून तोल सांवरीत कशीबशी एकेक पाऊल ओढीत होती. रगाडा तीन चतुर्थांश उतरून झाला होता. तीरावर पाय ठेवायला वीसपंचवीस पावलांचेंच अंतर उरलें होतें. पण प्रवाहाला विशेष धार होती आणि पाऊल टिकतां टिकत नव्हतें तें तिथेंच. आणि नेमकें याच वेळीं हुकमतीचे कठोर शब्द त्यांच्या कानांत घुसले,

" सोडा त्या मुलीला ! "

शेखर त्या शिपायांच्या छाताडावर बंदूक रोखून संहारभैरवासारखा तीरावर उभा होता. ती दुतोंडी, काळी नागीण आपल्या प्राणांचा ग्रास करायला अधाशी झाली आहे, हें दिसतांच शिपाई एकदम दचकले. नकळत हिरेच्या मनगटावरची पकड सुटली. हिरा अस्मानस्ला लगाळा जोर एकत्र करून पायांनीं प्रवाह कापीत पुढें निघाली. तिला विलक्षण जोर आला होता. ती ज्याच्यावर जिवाचें लिंबलोण करायला निघाली होती तो खंदा वीरपुरुष होता. प्रिय व्यक्तीला तोफेच्या तोंडीं ढकलून स्वतःची कातडी बचावणारा नव्हता. या एकाच जाणिवेनें तिच्या आधीं तिचे नीलनाग शेखरच्या चरणांना मिठी मारायला धांवले.

पण शेखरजवळ बंदूक होती तशी सार्जंटाजवळहि होती. फरक इतकाच कीं शेखरची रोखलेली होती तर सार्जंटची खांद्याला लटकलेली. ती काढून रोखायची, तोडीस तोड करायची तर सार्जंटचे पाय तरी स्थिर व्हायला हवेत ना ? प्रवाहाच्या धारेनें तेच तर सारखे घसरत होते. पण त्याहि स्थितींत स्वतःच्या देहाची जबाबदारी एका शिपायाला संभाळायला सांगून तो जेव्हां खांद्याची बंदूक काढायला लागला तेव्हां शेखर हंसून त्याला म्हणाला,

" सार्जंटा, नको तसदी घेऊं. तूं पाण्यांत आहेस अन् मी जमिनीवर आहें हें विसरूं नको. तुझी बंदूक आडवी होण्याच्या पूर्वी माझ्या बंदुकीचा चाप ओढला जाईल हें लक्षांत ठेव. "

आणि या मात्रेचा बरोबर उपयोग झाला. सार्जंट नुसताच चुळबुळ करीत राहिला. खांद्यांची बंदूक पुढें काढायला त्याला धीर झाला नाहीं. त्याचे फक्त डोळेच शेखरवर रोखले गेले. आणि तेहि जिकच्या धोस्तीनें. एवढ्यांत हिरेचे पाय जमिनीला लागले. पाण्यानें निथळणारी, हातींपायीं थरथरणारी, ती व्याकुळ मृगनयना धांवत जाऊन शेखरच्या हृदयाला बिलगली. जें ती दोन तासांपूर्वीं करूं पहात होती तेंच तिनें आतां केलें. पण त्यावेळची भावना निराळी होती. कृति एकच; पण अर्थ सर्वस्वीं भिन्न होते. शेखरनें तिला दूर ढकललें नाहीं. तिची मिठी सोडवण्याचाहि प्रयत्न केला नाहीं. त्यानें जाणलें कीं हा सुकुमार भुजबंध असा तसा नाहीं. हिरेच्या पंचप्राणांचें बिरडें मोकळें होईल; पण ही मिठी सुटायची नाहीं.

रोखलेली बंदूक लक्ष्यावरून चळूं न देतां शेखर हिरेसह मागच्या पावलीं जाऊं लागला. पांचदहा हातांवर मागें दाट झाडी होती तिथवर तो तसाच उलटा गेला आणि आडोसा मिळतांच झटकन् त्यानें तोंड वळवलें. ते शिपाई तीरावर येतात तों त्या दोघांनीं अटव्य रानाच्या उदरांत ठाव घेतला होता. ते थोडेसे पुढें गेले; पण त्यांना शेखरचा मागसुद्धां दिसला नाहीं. सार्जंट पराभवाच्या आगीनें नुसता जळूं लागला. जेव्हां त्यानें शिपायांवर यथेच्छ जिव्हास्त्र परजलें तेव्हां त्याचा दाह जरासा शमला.

थोड्या वेळानें सूर्याचें किरणजाल ओसरण्याच्या समयीं एका धोंडीआड विसांवलेल्या दोन व्यक्तींचीं कांहीं वाक्यें जवळच्या वृक्षवल्लींना ऐकायला मिळालीं,—

"शेखर, मी चुकल्यें."

"नाहीं हिरा. चुकत होतीस; पण वेळींच सांवरलीस.








# या अवेळ रात्रीं—

या अवेळ रात्रीं
कां व्यर्थ भटकशी पिसाट चंद्रा
बघ, गजबजलेल्या बाजारांतुन
कितीक येती, कितीक जाती
नटवा खोटा नखरा दावित
चटक चांदण्या—
तुज भुलवाया डोळे मुरडित.
परंतु त्यांना नाहीं ठाउक
आणि तुलाहि नसेल ठाउक
कुठें एकदां फिरतां फिरतां
स्वतःभोंवतीं
अडखळलें कोणाचें तरि पाउल
भिडले कोणाचे तरि डोळे चंचल
आणि-काळजांतली तुटली खटकन्
झंकारून एकुलती तार !
—का भासच होता
अंतरिंचा तो ?
का, अंतरांतली अमूर्त हांक
प्रतिध्वनीचा बुरखा घेउन
आली, गेली ?
असेलहि तसें—परंतु
पटलें जरि, ना वळतें पाउल
रेंगाळत राही तिथेंच तेथें
ओतायाला रूप मनोहर
काव्य कराया-सत्य नि सुंदर !
आम्ही अमुच्या पराभवांनीं
जिवंत मेलों—म्हणुं तुला कीं,
पहा पहा—
पिसाट वेडा चंद्र भटकतो
अपरात्रींच्या बाजारांतुन !
रे खुळयांनो,
लागाया तें वेड जगतिं या
असतें कांहीं एक जरी
जित्या जगांतिल जिवंत सारे
वेडे होतिल तया परी !

—श्रीकृष्ण दांभोळकर

कु. द. दीक्षित



आणि मग वाटे,
त्या मिणमिणत्या खोलींत
म्लानवदन अशी ही

# महाश्वेता

आपल्या प्रियकराला परत
आणण्यासाठीं ही स्वरसाधना
तर करीत नसेल ना ?

रात्रीच्या प्रशांत वेळीं—
मध्यरात्र उलटून गेल्यानंतर—कधींकाळीं जर जाग आली तर अजूनही कुठूनतरी लांबून—अंतराळांतून तोडी रागाची, व्याकुळ करणाऱ्या स्वरांची विलंपत ऐकूं येते. मंद मंद वाऱ्याबरोबर निशिगंधाची सुखद लहर यावी नि वातावरणांत विरून जावी तसे या रागाचे स्वर अंतर्मनांतून कुठेंतरी झंकारून पुन्हा विलीन होतात—आणि मला पुन्हा बम्याचा तो शिपाईगिरीचा हुकुमवजा शब्द आठवतो—ए सायलेंट—रे—जरा ऐकूं या हें गाणें—

आणि आम्ही त्या घरासमोरच्या दुकानाच्या पायऱ्यांशीं बसून मध्यरात्रीच्या आसपास तोडी रागाची मेहनत ऐकावयाचे. चिजेच्या शब्दाचे मोहोरे आतां पुसट झाले आहेत. पण सतरा—अठरा वर्षांच्या दीर्घकालांत जरी किती आठवणींचीं पुटंच्या पुटं स्मरणपत्रावर बसलीं असलीं तरी त्या मध्यरात्री अजून अगदीं स्पष्ट तरळतात डोळ्यांसमोर—आणि 'रात्रिरेव व्यरंसीत्'—या अमृतवचनाचा साक्षात्कार पुरेपूर होतो.

—आणि विचार करतां करतां मला त्या काव्यपंक्ती आठवतात—

**'' परि स्मरतो आणिक करतो**
**व्याकुळ केव्हां**
**तूं आर्त मला जो पंकविलास अभंग ''**

आम्ही सारे सिनेमाहून परत येत होतों. आमच्या मंडळाचा हा एक ठराविक कार्यक्रम होता. रात्रीं ९—९॥ वाजेपर्यंत सारेजण माझ्या घरीं अभ्यासासाठीं म्हणून जमत. धूर्त व्यापाऱ्यांनीं जातां जातां सौद्यासाठीं म्हणून माल हेरावा तसे बहुतेक सारेजण येतांयेतां चांगला सिनेमा कोणता आहे हें पाहून येत आणि अभ्यासाचीं पुस्तकं पुढें उघडीं टाकून त्याकडे बघत हळूच कुणीतरी सुचवी—आज वेस्टएंडला काय आहे रे? दुसरा मुद्दामच उडवाउडवीचे उत्तर देई आणि तिसरा कुणीतरी सांगे—अरे Ramon Novarro आहे रे. मग मी म्हणे—"खरोखरच त्याचा चित्रपट आहे? मग जाऊं या की आपण. निदान माझा तरी तो प्यारा नट आहे. पहा बुवा!" युद्धासाठीं जय्यत तयार असलेल्या राष्ट्रांना जसं कांहीतरी निमित्त पुरतं तसंच हें सारं कारस्थान. लगेच सारेजण तयार होत. "दिनकर—तूं पुढें सरक, आम्ही निघालोच आणि बम्या—तुझ्या वहाणा नीट आहेत ना?" कारण केव्हांही—कुठल्याही वेळीं बघा बम्याच्या वहाणा नेहमी तुटलेल्या—आणि सिनेमाला तो साऱ्यांच्या पुढें.

आमच्या सिनेमाच्या स्वारीचा आणखी एक शिस्तीचा नमुना असे. अपोलो सिनेमापर्यंत आमच्या सात मित्रमंडळींची मालगाडी धडपडत, सरपटत, फरफटत जात असे आणि मग वहाणा हातांत घेऊन श्वास टिकेटांपर्यंत.

आणि थिएटर गांठीतोंपर्यंत बाजारबुणग्याप्रमाणें आमची दौड चालू असावयाची. आमच्यापुढें सटकलेल्या दिनकर जागा धरून बांकावर रुमाल-टोप्या-वहाणा ठेवून जवळ जवळ अर्धामुर्धा उघडाबोडका दाराजवळ वाट पहात असायचा. —आणि असा सिनेमा पहातांना काय मौज येत असे.

रात्रीं परत येतांना सिनेमाच्या गप्पागोष्टी करीत जेमतेम १२–१२॥ वाजेपर्यंत आम्ही बुधवारांतल्या विठोबापर्यंत येत असूं—आणि मोतीचौकाचा कोपरा ओलांडला कीं साऱ्यांना बम्या बजावीत असे, "Silent". मी आणि बम्या पुढें—बाकीचे आसपास—असे आम्ही अगदीं निःशब्द त्या घरासमोर येऊन उभे रहावयाचे. त्या घराच्या आसपास हिंडणें किंवा वर मान करून बघणें या वडीलधाऱ्या आणि सोंवळ्या मंडळीला 'शिवशिव' करायला लावणाऱ्या गोष्टी होत्या. ज्या बाजूकडे बघू नाहीं, ज्या जागांसमोर उभे राहूं नाहीं—त्या गोष्टी अगदीं संपूर्णतः त्यांज्य, त्या घराच्या आसपास आमच्यासारखी पांढरपेशांचीं, शिकलीं संवरलेलीं पांचसात मुलं उभीं रहायचीं !—पण तेंच आम्ही करत होतों—तें तीनमजली घर होतें आणि अगदीं वरच्या मजल्यावर कोणीतरी गायिका गाण्याची मेहनत करत असे. त्या इमारतीचे पुढचे दोन गाळे धंदेवाईक वेश्यांनीं व्यापलेले असल्यामुळें उघडा-उघडी त्या इमारतींत शिरणें आम्हांला अशक्य होतें. शिवाय गाण्याची मैफल झडती आहे, ग्लॅसच्या बत्त्यांचा झगझगाट पडला आहे, तबल्याच्या दणदणाटाबरोबर नूपुरांचा थयथयाट ऐकूं येतो आहे—अशी परिस्थिति असती तर वर पहाणाऱ्याला अगर जाणाऱ्याला 'शौकीन' आहे म्हणून म्हटलें असतें. पण या घरांत एक मंदमंद रॉकेलचा दिवा, बाहेरच्या दालनांत तळाशीं असलेल्या खिडकीशीं विद्रूप, शहारे आणणाऱ्या ओंगळ बाया, आणि त्यांची आशाळभूत नेजर या साऱ्या गोष्टी त्या घरांच्या तिसऱ्या मजल्याशीं संलग्न होत्या.

संगीताच्या नादानें भारावलेल्या आम्हांला या साऱ्या गोष्टी, वेदान्ती महापुरुषाला जसें जग केवळ स्वप्नवत् वाटतें, तशाच वाटत. कारण रस्त्यालगत पायरीव रवसून आमच्या कानांवर जे अतिमधुर स्वरालाप येत तेवढेच खरे हेंच पटे.

"अब मोरे राम— " ही चीज बहुधा ती गायिका घटवीत असावी असें वाटे. कारण चिजेचीं अक्षरें इतकीं स्पष्टपणें ऐकूं येत नसत आणि मेहनत जी होत असे ती विशेषेंकरून आलापीची.

या जगेंत एका असामान्य गायिकेची स्वर-साधना चालू आहे असा गाजावाजाही मीं संगीतशौकीनांच्या तोंडून ऐकला नव्हता; एवढेंच नव्हे तर कुणातरी प्रसिद्ध खाँसाहेबांचा मुक्काम त्या काळीं पुण्यांत आहे आणि ते शिष्यांना तालमी देत आहेत अशीही किंवदन्ती पसरली नव्हती. आणि आमच्यासारख्या लहान मुलांनीं अधिकारी व्यक्तींच्याप्रमाणें कांहीं तरी सांगणंही अशक्य होतं.

पण त्या गायिकेच्या संगीतसाधनेकडे विशेषत्वानें लक्ष जाण्याला एक वेगळेंच कारण घडलें.

आमच्या शिरस्त्याप्रमाणें शांवपळीचा बेत आंखून आम्ही सिनेमाला गेलों आणि आमच्या दराचीं म्हणजे चार आण्यांचीं तिकिटें न मिळाल्यानें सारेजण हुलतहुलत परतलों. मोतीचौक ओलांडून वळलों तेव्हां ११–११॥ चा सुमार झाला असेल. रस्त्यावर वर्दळ फारशी नव्हती, पण रस्ता अगदीं निर्मनुष्यही झाला नव्हता आणि आसपास शांतता पसरूं लागलेली नव्हती. आमच्या नेहमींच्या घरासमोर आलों तेव्हां अपेक्षित स्वरपुंज ऐकूं येईनात. उलट एक कमावलेला पण साधारणतः ढाला आवाज आणि त्याला सारंगीचा जोड असा कांहींसा भास झाला.

"बम्या, आज कांहींतरी वेगळाच प्रकार दिसतोय!— होय रे— पण एवींतेवीं आपण लवकर आलों आहोंत. जरा थांबून पाहूं या तर खरं"—असें म्हणून आम्ही पायरीवर झटकून टेका देऊन बसलों.

— थोड्या वेळानें सारंगीच्या तरफा छावल्या जात असल्याचा आवाज ऐकूं येऊं लागला आणि सारंगीनें मंद्रसप्तकांत एक बारीक असा

आलाप घेऊन षड्जावर स्थिरावल्यावर आमचा नेहमींचा कंठमधुर स्वरनिनाद ऐकूं येऊं लागला.

उस्ताद चीजेची एक पकड धरून शिष्येला रागाच्या वर्तांव्याची तालीम देत होते आणि सारंगीवाला, गायिकेच्या मेहनतीबरोबर साथ करून, वेळप्रसंगीं खाँसाहेबांच्या हरकती सारंगीवर वाजवून दाखवीत होता. आमच्या नेहमींच्या वेळेला म्हणजे रात्रीं १२॥–१ नंतर बहुधा खाँसाहेब आणि साथीवाला परत जात असावेत आणि त्या गायिकेची साधना कांहीं काळ तशीच चालू असावी असा आम्हीं तर्क केला.

—त्या गायिकेच्या गळ्याची माधुरी म्हणजे शब्दांच्या वर्णनाबाहेरचीच आहे असें म्हटलें पाहिजे. खाँसाहेबांच्या ढाल्या आवाजानंतर ती गायिका गात असे आणि सारंगीच्या स्वराबरोबर तिचा स्वर मिळाला, कीं केवळ तंबोरा आणि सारंगी या दोन वाद्यांतूनच स्वरपुंज निघतो आहे असें वाटावें इतका तिचा आवाज मुलायम होता. सारंगीचा कुंदपणा आणि तिच्या स्वराचा जिवंतपणा यांमुळेंच गायिका आणि वाद्य असा फरक कानाला जाणवे; एरवीं जाणवणार नाहीं, इतकी सारंगीची आणि तिच्या स्वरांची जात एक वाटे.

दिवसामागून दिवस जात होते आणि दर आठवड्याला आम्ही पायरीवर बसून त्या गायिकेच्या गाण्याची तालमी ऐकत असूं. उस्तादांची गायकी कांहींशीं किराणा घराण्याची किंवा खाँसाहेब अब्दुल करीमखाँच्या घराण्याशीं मिळणारी वाटे. निदान ज्या पद्धतीनें आलापीची मेहनत ऐकूं येई त्यावरून तरी असाच कयास बांधावा लागे. एका रात्रीं तोडीच्या चिजेचे नुसते दोन शब्द घोळवून रागाचा विस्तार ऐकत होतों. षड्जावर न्यास ठेवून बारीक मनोहर असा मंद्रसप्तकांतल्या निषादापर्यंत हेलकावा घेऊन उस्ताद षड्ज लावीत आणि त्यांचा दमसास पुरा झाला कीं सारंगीचा मुलायम स्वर ऐकूं येई आणि नंतर तोच आलाप नि तोच स्वर अत्यंत गोड अशा आवाजांत ऐकायला मिळे. षड्ज–रिषभ्–असा स्वरांचा क्रम कायम करतां करतां सुमारें पाऊण तासानंतर गंधाराला खाँसाहेबांनीं अगदीं हळुवारपणानें जणुं काय कुरवाळलें–आणि तितक्याच सौकुमार्यानें त्या गायिकेनेंही स्वराशीं एकात्मता दाखविली. पूर्वींच्या काळीं बोरूनें लिहितांना बोरूची जीभ किंचित् पिचली असेल तर लिहितांना बोरूची एक सरळ रेषा आणि त्यालगत तितकीच स्पष्ट पण अतिरेखीव आणि अतिसूक्ष्म अशी दुसरी रेषा कागदावर उमटे. वाटे कीं, कोणी सरी हिऱ्याच्या सूक्ष्म टोकांनींच ही समांतर रेषा आंखली असावी. अगदीं तितक्याच सफाईदार सूक्ष्मतेनें उस्तादाच्या ढाल्या आवाजाबरोबर, सारंगीच्या कुंद स्वराबरोबर, त्या गायिकेचा सूक्ष्मतर परंतु स्वच्छ असा आवाज ऐकूं येई. त्या आवाजाला धार अति विलक्षण वाटे. आलापीची पद्धत तर अशी मनोहारी वाटे कीं, मला नेहमीं हलवायाची सावण्या करण्याच्या कृतीची आठवण येई. खुंटीवर गुळाच्या चिकाचा एक पिळा अडकवून हलवाई हलक्या परंतु बिनकांपऱ्या हातानें न तुटेल असा ताणतो आणि पुन्हा वळवून खुंटीवर टाकतो,—त्याप्रमाणें अति नाजुकपणानें स्वराचा तोल न सुटेल इतक्या बेतानें ती गायिका स्वरालापन करीत असे. तोडीच्या विस्तारांतील गंधार ऐकतांऐकतांच रात्रीचे बारा वाजले आणि मेहनत संपली. त्या गायिकेच्या त्या अविश्रांत मेहनतीचा आणखी एक विशेष म्हणजे तिच्या गळ्यांतून तान अशी मीं फारशी ऐकलीच नाहीं. तीन किंवा चार स्वरांची एखादी गुंफण आणि तीहि आलापीवजाच. विद्युल्लतेप्रमाणें चमकून जाणारी तान किंवा चक्री आणि वक्रगतीची स्वररचना अशीही कधीं ऐकलीच नाहीं. परंतु संगीताचा प्राण म्हणजे स्वर असें जें म्हणतात त्याचें मात्र पुरेपूर प्रत्यंतर आलें. तिच्या गाण्याच्या मेहनतीला तबल्याचाही फारसा संपर्क लागला नाहीं. अधूनमधून नुसत्या डग्ग्याचा बथ्थड असा आवाज ऐकूं येई, त्यावरून चिजेच्या बंदिशीपुरता डग्ग्याचा उपयोग साथीला होत असेल असें मानणें प्राप्त होतें. परंतु अगदीं अपूर्व आणि एकजिनसी अशी स्वरसाधना कशी होत असेल याची मात्र प्रचीति आली. कारण ज्या ज्या वेळीं सिनेमाहून आम्ही परत येत असूं त्या त्या वेळीं केवळ तंबोऱ्यावर त्या किन्नरकंठी गायिकेची गानकला ऐकूं येत असे. पायरीवर बसून ऐकतां ऐकतां त्या गायिकेच्या परिस्थितीसंबंधानें उगीचच आणि विलक्षण विचार येत असत. वाटे,—ही महाश्वेतेसारखी विरहिणी तर नाहीं ना स्वरसामर्थ्यावर आपल्या प्रियकराला परत आणण्यासाठीं प्रयत्न करीत? आणि मग त्या मिणमिणत्या दिव्याच्या अंधाऱ्या खोलीऐवजीं गर्द वनश्री, निरभ्र आकाशांतील पौर्णिमेचा चंद्रप्रकाश, आणि नितळ अंगकांति असलेली

म्लानवदन. अशी गायिका माझ्या मनःचक्षूं-समोरून निघून जाई.—उस्तादाच्या तालमीच्या वेळीं भयभीत शिष्येप्रमाणें न चुकतां आपला स्वर कसा राहील अशा चिंतेनें स्वरसाधना करणारी गरीब बिचारी, चंद्रिवान असलेली, एक गायिका—असाही देखावा डोळ्यांसमोर उभा राही. केवळ स्वरांच्या जोरावर मनाला हेलकावे देऊन मनासमोर एक वेगळीच सृष्टि निर्माण करणारें संगीत किती अपरंपार सामर्थ्याचें आहे याची मात्र खरी जाणीव होई.

त्या गायिकेच्या मेहनतीनें आणि गळ्याच्या गोडव्यानें आम्ही अगदीं भारून गेलों होतों. एका रात्रीं परत येतांना तोडी रागाची मेहनत ऐकूं येईना. पायरीवर बसून राहिलों; पांच मिनिटें झालीं; दहा झालीं; कोणाचाच—कसलाही आवाज ऐकू येईना. आम्हां सर्वांनाच बेचैन झालें. फुलामुलांनीं भरलेल्या संसारांत रोज रमावें आणि एका अशुभ दिवशीं ना मूल ना फूल असं उजाड घर दिसावं तसंच झालं त्या वेळेला. त्या घराच्या कानाकोपऱ्यांतून जणु कुठून तरी एखादा स्वर ऐकूं यावा अशी इच्छा धरून आम्ही थांबून राहिलों, परंतु मेहनत संपवून त्या गायिकेनें विश्रांति घ्यावयाची असें ठरविलें असावें असा विचार करून आम्ही परतलों.

पण मनासमोरून सारखे तोडीचे स्वर झंकारत होते आणि मनांतल्या आशंकांना मस्त करून सोडत होते.



बम्यालाही ही माझी अस्वस्थता जाणवली.

"काय झालं रे आज त्या गाण्याला ?—"

"कुणास ठाऊक !"

—कुणास ठाऊक ! कां नाहीं ठाऊक ? पायरीवर बसून ऐकतां ! रसिक आहांत ना ? पण तुमची प्रतिष्ठा ! प्रतिष्ठा !! स्वतःच्या मानभावी मोठेपणाला जपा आणि कलास्वाद घेण्याचा ढोंगीपणा दाखवा ! अरे, जा, जा—विसरा त्या कलानंदाच्या गोष्टी ! तुमच्याच कवींना विचारा —आसक्ति खरी कशाची आणि कोणची ! पहा—

जगी सांगतात प्रीत पतंगाची खरी ।

झड घालुनी प्राण देतो दीपकाचे वरी ।

माझ्या श्वासाश्वासांतून नि रक्तारक्तांतून संगीताचा नाद भिनला आहे. तो ऐकायला यायलाही तुम्हांला तुमच्या प्रतिष्ठेचा अडसर ओलांडतां येत नाहीं ? तुम्हांला काय ठाऊक ?—

"बम्या ! उद्यां त्या घरीं जाऊन गायिकेची भेट घेतलीच पाहिजे."

दुसऱ्या दिवशीं मी आणि बम्या निघालों त्या घराकडे. दिवसाढवळ्या, सकाळच्या वेळीं त्या घराच्या आसपास घुटमळणें म्हणजे स्वतः खड्डा खणून त्यांत उडी मारण्याइतकेंच अविचारीपणाचें होतें. समोरच्या दुकानांतल्या फळ्या उघडल्या होत्या. 'जयराम श्रीराम'च्या पाट्यांखालीं असलेल्या डाकोरजीच्या तसबिरीपुढें मंदमंद निरांजन तेवत होते. बम्याच या वेळीं पुढें झाला. मीही धडधडत्या छातीनें झटदिशीं जिन्यासमोर आलों आणि एकएक पायरी दमादमानें चढूं लागलों. तुटलेल्या वहाणेचा आवाज करीत बम्या पुढें आणि चोरासारखा हलकेच मी मागें असे आम्ही अंदाजानें त्या माडीच्या दाराशीं आलों—आणि दार वाजवायच्या आंतच खाड्दिशीं दार उघडून आमच्यापुढें दोन अक्राळविक्राळ बाया उभ्या राहिल्या. अशोकवनांतील सीतेच्या चित्रांत सीतेभोंवतीं ज्या भयानक राक्षसिणी दिसतात त्याच नमुन्याच्या त्या बाया होत्या. "काय रे पोरांनो ! इथं कशाला मरायला आलां !" त्या बायांनीं विचारलें.

"कांहीं नाहीं. इथं एक गायिका राहते ना ? तिचें गाणें ठरविण्यासाठीं विचारपूस करण्यासाठीं म्हणून आलों होतों."

हीः हीः करून त्या दोघी मनापासून हंसल्या आणि हंसणं किती विद्रूप आणि निरुत्साही असूं शकतं याची कल्पना आली.

"अरं पोरांनु ! ती गाणारणी कवाच ग्येली ! आठ दिस झालंया !"

"कुठं गेली ?"

"गेली मसणांत—" पुन्हा एकदां त्या हीः हीः करून खिदळल्या आणि आम्ही झपाझप पायऱ्या उतरून रस्त्यावर आलों. बम्या नि मी—एकदां समोरच्या पायरीवर जाऊन उभे राहिलों तोंच दुकानदारानें हटकलें— "काय रे ! तिकडे वर काय पाहातां ? चांगले शिकलेसवरलेले दिसतां आणि ?—"

आम्ही पुन्हा घराकडे परतलों. कितीकतरी दिवस पुन्हा रात्रीच्या खेळाला जावेसेंच वाटेना ! कारण ती वेळ, ती शांतता, तो ढाला अवाज, ती किन्नरीसारखी कंठगत माधुरी आणि ती तोडी रागाची अतुलनीय आलापी !

आज त्या गोष्टीला किती तरी वर्षें होऊन गेलीं. परंतु मंदमंद प्रकाशांत सारंगीच्या गोडव्यानें गायिलेल्या तोडीची आठवण कांहीं बुजत नाहीं आणि त्या स्वरलहरींच्या झंकारांची गोडीहि नाहींशी होत नाहीं.

———

कोणी तरुण स्त्री आपल्या मनाच्या निरनिराळ्या वृत्ति आपल्या सखीस निवेदन करते—"जेव्हां माझी पहिल्यानें पतीची गांठ पडली तेव्हां तो कान्त ( नवरा ) की कृतान्त ( यम ) आहे यांत मला भेद वाटत नसे; पुढें दोन तीन महिन्यांनीं तो आपल्यासारखाच मनुष्य आहे असें मला वाटूं लागलें; त्यानंतर तो माझा प्रियकर आहे आणि मी त्याची आवडती स्त्री आहे असें माझ्या बुद्धीस वाटूं लागलें; आणि हळूं हळूं वर्षे होत आलें तेव्हां तर सर्व त्रिभुवनांत तो भरला आहे असें मला दिसूं लागलें।"



‘ भाऊराव ’



जीवन हें एक
महान् स्वप्न आहे,
आणि म्हणूनच कीं काय

# संगीत हेडक्लार्क

हें हृदयंगम नाटक
नारायणरावांच्या हातून
एका रात्रींत लिहून पुरें झालें !

पात्रें—नारायणराव, लक्षुमबाई, बाबू, सदू, गंगू आणि रावसाहेब.

स्थळः—पुणें, सदाशिव पेठेंतलें एक घर.

काळः—रात्रीं ११॥ वाजल्यापासून सकाळीं ७ वाजेपर्यंत.

नारायणराव, लक्षुमबाई व त्यांची बाबू, सदू गंगू अनुक्रमें ८-५॥-३॥ वयाचीं गोजिरवाणीं मुलें झोपलीं आहेत. खोलींतला दिवा मालवला गेला आहे-अंधार गुडुप ! पण प्रेक्षकगृहांतल्या दिव्यामुळं नारायणरावांच्या खोलींत लख्ख प्रकाश पडला आहे व त्यामुळें प्रेक्षकांचें काम भागतें !
मध्येंच नारायणराव दचकून उठतात.]

**नारायण०:**—काय शिंप्यांचा त्रास तरी ! ( काड्याची पेटी हातानं चांचपडून काढतात व एक काडी ओढतात. पण त्यांना अंथरुणावर एकहि ढेंकूण दिसत नाहीं म्हणून हताश होऊन पुन्हां झोंपतात. पण झोंप कांहीं येत नाहीं. बराच वेळ अशा अस्वस्थ स्थितींत असतां सहजिकपणें त्यांच्या मनांत नाना तऱ्हेचे गंभीर विचार डोकावून जातात, “ उद्यां गोडं तेल आणायलं हवं...आज सकाळींच हिनं सांगितलं होतं पण राहलं तें. उद्यां आणायलाच पाहिजे नाहींतर ती पुन्हां त्या दिवशींसारखं ओरडायची !...आणून टाकावं अन् मोकळं व्हावं झालं...काय तरी माझ्या मागं संसार हात धुऊन लागलाय !...आतां बाबू केव्हां मोठा होणार अन्...अरे हो त्याला कसल्याशा वह्या पाहिजे आहेत असं चार दिवसांपासून ओरडतो आहे तो...आतां उद्यां बाजारांत जाऊन तेल, वह्या, सदूला एक पाटी...आतां ही चौथी कां पांचवी असेल पाटी !...इतकं करून उद्यां आम्हाला हीं मुलं कितपत विचारणार आहेत देव जाणे...हरिः नारायणा तुझीच कृपा मायबाप-जगन्निवासा जगदोद्धारा ! !...वयाची बेचाळीस वर्षें निघून गेलीं; पण देवासाठीं कांहींतरी केलं आहे का ? माझ्या देवासाठीं कांहीं केलं आहे का ? बरी आठवण झाली. माझ्या नाटकाचं काय करायचं...करायचं काय आणखीन्...घ्यायचंच लिहायला झालं...मरावें परी कीर्ति—रूपें उरावें ॥...माझ्यामागून जगाला काय तें तेवढंच माझं स्मृतिशेष म्हणून मिळणार !...पण किती दिवसांपासून हें असं उद्यांउद्यांच चाललं आहे..कां घेऊं आतांच लिहायला ? thats' right ! ” )

[नारायणराव पुन्हां एक काडी ओढतात व जवळचा दिवा लावतात. विळोखा देऊन अंग मोडतात. चटकन् उठतात...चूळ वगैरे भरून देवाला नमस्कार करतात. शेजारच्या कोनाड्यांतले कांहीं कागद, दौत व टांक खालीं घेतात. आतां आपण नाटक लिहायला घेणार—या विचारानं त्यांच्या चेहऱ्यावर समाधानाच्या चार सुरकुत्या पडतात. ]

**नारायण०:**—( एक कोरा कागद घेऊन ) सामाजिक नाटक लिहूं—कां ऐतिहासिक—कां पौराणिक ? मानापमान—कांचनगडची मोहना—कां रुक्मिणी-स्वयंवर ? सामाजिकच लिहावं म्हणजे समाजाला नीतिमत्तेचं वळण तरी लागेल. चला लिहायला लागावं ( मनःपूर्वक नमस्कार करीत ) श्री सरस्वत्यै नमः । गणपते नमः । जय शंकर ! पण नाटकाचं नांव काय ठेवावं ? “ संगीत हेडक्लार्क ” छान्—गोड ! आणि आपण तर ट्रॅजेडीच करणार बुवा

त्याशिवाय प्रेक्षकांवर परिणाम होणं शक्य नाहीं. 'संगीत हेडक्लार्क' त्याखालीं कंपनींतल्या नटाचा एक ब्लॉक:—नायक खुर्चीवर बसला आहे; नायिका खालीं जमीनीवर बसून पाय चेपते आहे. फोटोखालीं गाण्यांतली एखादी अर्धी अपुरी ओळ! आणि शेवटीं 'तळाशीं लेखक—नारायणराव उर्फ तात्या.' किंमत...किंमत...आतां किंमत काय ठेवूं माझ्या नाटकाची? नाहीं तर असं करावं—(गंगू व सदूच्या पलीकडे निजलेल्या आपल्या धर्मपत्नीस उठवतात.)

**नारायण०:**—(तिला हालवीत जागें करून) अग ए...ऐकलंस कां...हें पहा...ए...हें बघ...

**लक्षुम०:**—अंऽअं?!

**नारायण०:**—हें बघ...थोडं उठशील कां...तुला कांहीं विचारायचं आहे. ऊठ.

[ घड्याळांत दोन वाजतात. ]

**लक्षुम०:**—काय तरी बाई त्रास हा?

**नारायण०:**—अग त्रास नाहीं हा. माफ कर मला, मी तुझी झोंप मोडतो आहे.

**लक्षुम०**—इश्श! यांत काय माफी मागायची माझी? काय हवं आहे?

**नारायण०:**—हें बघ. अगोदर डोळ्याला पाणी लाव, चूळ भर म्हणजे सगळं कांहीं तुला सांगतों, बात फार महत्त्वाची आहे. (लक्षुमबाई चटकन् उठतात) अशी घाबरूं नकोस. भीतीचं कांहीं कारण नाहीं. अग अग अग असे डोळे कां फिरवतेस? छे छे! हें बघ थोडक्यांत म्हणजे सारांशरूपानें तुला सांगतों. मी एक नाटक लिहितों आहें आतां—तें नाटक मी एका कंपनीला विकणार आहें. निदान कमींतकमी आपल्याला दोन-अडीच हजार रुपये तरी मिळतील...अन् पुन्हां फुकट कॉम्प्लिमेंटरी पास नाटक पाहायला?

**लक्षुम० :**—दोन हज्जार रुपये!!! अन् फुकट नाटक पाहायला मिळणार? सगळ्यांनां कसं हो ते आंत सोडतील?

**नारायण० :**—अग सोडतील म्हणजे? सोडायलाच हवं! नाटक काय फुकटचं मिळतंय? निढळाचा घाम काढावा लागतो एक एक शब्द लिहितांना, समजलीस? हें बघ मी आतांच्या आता बसून इतकं लिहून काढलं आहे—

> **संगीत हेडक्लार्क**
>
> फोटो :
>
> नायक खुर्चीवर बसला आहे
> नायिका पाय चेपते आहे
> फोटोखालीं उद्देशून गाण्यांतली १/२ ओळ
>
> किंमत रु. आ. पै. | लेखक:— **नारायणराव उर्फ तात्या**

**नारायण० :**—माझ्यासाठीं एक आणि तुला एक असे दोन तरी पास मिळालेच पाहिजेत.

**लक्षुम० :**—अन् मग बाबूला? नि सदूला? या दोघांना मिळाल्यावर गंगी थोडीच घरीं राहणार आहे? अन् परवा पोरांना घरीं टाकून आपण दोघंच नाटकाला गेलो तर तें कारचोत्रांत चांगलं दिसेल?

**नारायण० :**—अग माझं एक तत्त्व—

**लक्षुम० :**—तें कांहीं नाहीं. उगंच जगांत हसं करून घ्यायचं झालं. एवीतेवी आपल्याला ते जर दोन पास देणार आहेत तर त्या लेकरांचं काय मोटंसं त्यांनां? द्यां म्हणावं दोन पास जास्त. गंगीला घेईन मी माझ्या मांडीवर हवं तर.

**नारायण० :**—अग तें मी सगळं कांहीं करीन. इतकं जमल्याशिवाय माझं नाटक त्यांना मिळायचं नाहीं, समजलीस? पण आतां तुला हें विचारायचं आहे कीं आपल्या नाटकाची किंमत काय ठेवावी? अं? अं?? काय?

**लक्षुम० :**—मला काय त्यांत कळणार बाई?

**नारायण० :**—तरीपण तुला काय वाटतं?

**लक्षुम० :**—दहा रुपये.

**नारायण० :**—छे छें! कांहीं तरी वेड्यासारखं बोलूं नकोस. दहा रुपये देऊन तें कोण घेणार? नेहमीं ग्रंथकर्त्यांनीं आपल्या ग्रंथाची किंमत सगळ्यांनां परवडेल अशीच ठेवावी.

**लक्षुम० :**—मग रुपयाला पांच द्यावींत.

[ झोपेंत सदूची लाथ गंगूला लागल्यामुळें ती "आईऽऽगं" करीत रडायला लागते! "या पोरट्यांनीं तर अगदीं भंडावून सोडलंय नुसतं...जेव्हां तेव्हां 'आई आई'..." लक्षुमबाई गंगीची समजूत घालण्यासाठीं सदूच्या पाठीत रपका घालतात तों सदू रडत उठतो...आणि या गोंधळानें बाबूची झोंप मोड होते व तोहि उठतो. लक्षुमबाई सगळ्या पोरांची समजूत काढतात.]

**लक्षुम० :**—गप्प, उगी हं, गंगे! नाहीं तर घालतें बघ पुन्हां एक रपका. हं झोपा आतां. तें बघ काळं मांजर आलं! अगबाईऽ, कसे काळेभोर डोळे आहेत!! (नारायणराव मॅंव मॅंव असा आवाज करतात.) कसला मेला बोका आहे शुक्. अं...गप उगी, तुला कीं नई मीं नाटकाला नेईन हं! गप! सदूला नाहीं, बाबूला नाहीं, तुलाच नेईन हं!

**बाबू:**—(चटकन् उठून बसतो) आई, मी येणार, जा, सदू, सदू, सद्या, ऊठ. आई गंगी, तात्या नाटकाला चाललेत बघ आपल्याला सोडून—

**सदू:**—(रडतच उठतो) आईऽऽऽऽ

**नारायण०:**—बाबू, झोंप पाहूं मुकाट्यानं. वेडा कुठला! नाटक नाहीं नि कांहीं नाहीं? अजून त्याला फार अवकाश आहे. अग वात थोडी मोठी कर. कंदीलांत तेल तरी आहे कां बघ पाहूं. आतां मी लिहायला बसणार आहें अन् मध्येंच दिव्याचा खोळंबा नको व्हायला. नाहींतर कंदील भरून आण.

( लक्षुमबाई कंदील भरून आणतात )

**नारायण०:**—बरं का ए, आतां किंमतीचं नंतर ठरवूं. हें कव्हर पेज तयार झालं! मुखपृष्ठ आणि हें मागचं पृष्ठ! मागच्या पृष्ठावर जाहिरात द्यावी—(लिहितात)

> **याच ग्रंथकर्त्याची पुढील पुस्तकें**
>
> | | रु. आ. पै. |
> |---|---|
> | १............................ | १—०—० |
> | २............................ | १—८—० |
> | ३............................ | २—०—० |
>
> टपाल खर्च वेगळा आकारला जाईल.

चला, आतां आतलं पहिलं पान–अर्पणपत्रिका ! मी म्हणतों, का ग, राव-साहेब गुपचुप्यांनांच कीं अर्पण करूं नये हें नाटक? म्हणजे आपल्या खोलीचं भाडं तरी कमी होईल. अन् पुन्हां बाहेरच्या बसायच्या खोलीला रंग काढू-नहि देतील ते. विचारून येऊं कां त्यांना ?

**लक्ष्मु०**:—आतांच कशाला ?

**नारायण०**:—अग अशा कामांत दिरंगाई मुळींच उपयोगाची नाहीं. बाबू, दादासाहेबांच्या घरीं जा...थांब, थांब...अगोदर कोट घाल, टोपी घाल, पायांत कांहींतरी घाल–रात्रीची वेळ आहे–कपडे कर, जा, आणि त्यांनां म्हणावं.

**सदू**:—ताल्या, मी पण जातों दादाबरोबर...मी जाणार अं.

**नारायण०**:—बरं, रडूं नकोस.

**सदू**:—मी जाणार. आम्ही जाऊं नये वाटतं ? (टोपी कोट घालतो).

**नारायण०**:—जा, एकमेकांनां सोबत झाली. बाबू, हें पहा अन् त्यांनां म्हणावं कीं तात्यांनीं एक नाटक लिहायला घेतलय तर त्यांच्या मनांत तें तुम्हालाच अर्पण करायचं आहे–काय म्हणशील ?

**बाबू**:—सांगीन मी त्यांनां.

**नारायण०**:—तें म्हण पाहूं सगळं.

**सदू**:—मी म्हणूं कां ताल्या ?

**लक्ष्मु०**:—(गंभीरपणें) चूप, मोठ्यांच्या बोलण्यांत लहान पोरांनीं तोंड घालूं नये.

**बाबू**:—दादासाहेब, दादासाहेब, आमच्या तात्यांनीं एक कांहीं लिहिलं आहे अन् तें तुह्मांला कांहीं करायचं आहे—

**नारायण०**:—अरे कांहीं काय करायचंय ? डोंबल ? कारट्याला इतकं साधं देखील सांगतां येत नाहीं—

**लक्ष्मु०**:—पण मी म्हणतें उगीच त्याच्यावर काय रागवायचं ?

**नारायण०**:—तुझं आपलं जिथं तिथं आहेच ! अशा लाडानं तर मुलं बिघडतात. आतां हा लहान कां आहे ? दहा वर्षांचा टोप्या–

**लक्ष्मु०**:—दहा ? गेल्या श्रावणांत तर आठवं लागलं.

**नारायण०**:—बस दहाच ! बाबूच्या पाठीवर सदू– दोन वर्षांचं अंतर; सदूच्या पाठीवर गंगी–दोन वर्षांचं अंतर. गंगीचं आतां काय वय असेल ? गंगीच्या पाठीवरचा तो छोकरा असता तर–

**लक्ष्मु०**:—आपल्या नशीबांतच नव्हता तो तर त्याला कोण काय करणार ?...(हुंदका.)

**नारायण०**:—कृपा करून आतां रडूं नका. तूं रडायला लागलीस कीं गंगी रडेल–झालं, मला वाटलंच !

(आईच्या डोळ्याला पदर पाहून गंगी रडूं लागते, सदूचा गोरामोरा चेहरा होतो, बाबू 'ही काय भानगड आहे' अशा अर्थानें तात्याकडे पाहतो.)

तुम्हां बायकांना कांहीं तरी विचारून पहावं कीं हा गोंधळ ठेवलेला !

(लक्ष्मुबाई डोळे पुसतात, गंगीला समजवतात.)

माझं तें निराळंच राहतं अन् तुझं आपलं मध्येंच कांहीं तरी दुसरंच निघतं ! हं: ! बाबू, मग काय सांगशील रावसाहेबांनां ?

**लक्ष्मु०**:—पण मी म्हणतें उद्यां येणारच आहेत नं ते एवी तेवी जेवायला !

**नारायण०**:—अरे हो खरंच कीं उद्यांचंच आपण त्यांना आमंत्रण दिलं आहे. नाहीं तर मी म्हणतों, बाबांना कां अर्पण करूं नये? वेदांत म्हटलं आहे "मातृदेवो भव। पितृदेवो भव। आचार्यदेवो भव।

**लक्ष्मु०**:—माझ्या बाबांना आपलं असं म्हणायला कोण तरी आहे कां ? सगळे मेले आपल्या पुरतंच पाहतात—

**नारायण०**:—बरं बरं. तुझ्याच वडलांना अर्पण करीन. आतां नाट-काला सुरवात करावी–(लिहितात) "लक्ष्मी—(स्वगत)–

**लक्ष्मु०**:—हें काय असं मुलांमधलं नांव घ्यायचं ?

**नारायण०**:—अग मी पहिल्यांदा नांदींत लक्ष्मीसरस्वतीचा संवाद देणार आहे. अन् तुझं नांव घेतलं म्हणून त्यांना काय त्यांत विशेष कळ-णार? "लक्ष्मी (स्वगत)—

**लक्ष्मु०**:—इश्श ! मला नाहीं बाई तें आवडत—'स्वगत' !

**बाबू०**:—ताल्या, मी स्वगत !

**सदू०**:—ताल्या, मी हो स्वगत. बाबू नाहीं !

**गंगी०**:—आई अंऽऽमला—

**नारायण०**:—बरं बाबू, सदू, गंगू, भांडू नका. मला एक नवीनच कल्पना सुचली आहे. असं करीन मी...तुम्हां सगळ्यांचींच नांवें घालतों नाटकांत मग तर झालं ? (लिहितात)

**लक्ष्मी**:—(स्वगत)

**बाबू**:—(हसून)

**सदू**:—(मागें वळून)

**गंगी**:—(रागानें)...वगैरे वगैरे"

[ नाटकांतील होतकरु पात्रांचीं नावं आणि नावपुढं अभिनयाचे कंस लिहून झाल्यावर नारायणरावांना झोप यायला लागते. "झोंप तर अगदीं हात धुऊन मागं लागली आहे माझ्या ! झोप, झोप, झोप ! (नाटकी हातवारे करीत) "वेड्या, कसली झोप घेतोस ? चौऱ्यांशी योनींतून सुटल्यावर एकदांच हा मनुष्य जन्म यायचा तेव्हां असेल नसेल तें आयुष्य देवाच्या, त्या अनंत अनादि पद्मभवांडाला कारणीभूत झालेल्या शेषशायी भगवान् श्री विष्णूच्या चरणरजांत विलीन करून या जड देहाचा उद्धार करून घे !"

इकडे लक्ष्मुबाई डुलक्या देतात. मुलें सर्व झोंपतात. ताल्या जांभई देतात, अंग मोडतात, डोळ्यांनां पाणी लावतात, आपल्या तोंडांत मारून घेतात पण झोप कांहीं केल्या आवरत नाहीं ! शेवटीं, देवराया, जगदोद्धारा. जगदीशा, मायबापा, दीनदयाळा ! ! असा महामंत्र म्हणत अंथरुणांत लवंडतात. ]

●

**तात्या**:—अग अशी घाई काय करतेस ? मला माहीत नाहीं कुठं किल्ल्या आहेत त्या.

**लक्ष्मु०**:—सदान् कदा हें अस्सं ! काल रावसाहेबांना द्यायला पीतां-बर काढलात तो काय् मी काढलान् वाटतं ? कुठंतरी ठेवायच्या अन् मग आठवण रहात नाहीं—

**तात्या**:—माहीत आहे फार धड आहे तुझी आठवण ! आणि म्हणूनच वाटतं परवां एकादशीला तुळशीबागेंत निरांजन ठेऊन आलीस ?

**लक्ष्मु०**:—हो, तुम्ही कध्धी कध्धी कांहीं विसरत नसाल ! काय तरी. मेलीं बोलणीं हीं ? काल पासून पाहते आहे, सारखं असं टोचून बोलायचं.

आमटींत मीठ घालायचं चुकून राहलं, तुळशीच्या भगेत मीठ विसरून आलीस वाटतं !......जाऊं दे मेलं, मला कार्य करायचं आहे ! मी करतें तें वाटतं कीं, मी माझ्याचसाठीं करतें. इकडची आब राहावी म्हणून चारचौघात जातोंना चांगलं नेसून जावं म्हटलं तर हीं अशीं बोलणीं—

( लक्ष्मुम्बाई फणकाऱ्यानं आंत निघून जातात. )

**तात्याः**—अरे सद्या, विजार उलटी घातलीस. वेडा रे वेडा ! बाबू, घाल त्याची विजार बरोबर. अन् तूं डोक्यावर घातलं नाहींस ? कुठं आहे ती जरीची टोपी ?

**बाबूः**—तात्या मला, मला आवडत नाहीं ती.

**तात्याः**— आवडत नाहीं ? फुकटचें दिलेत वाटतं चार रुपये ?

**बाबूः**—(टोपी घालतो ) बघा ही किती लहान होते ?

**तात्याः**—तें कांहीं नाहीं. होऊं दे लहान. घाल तशीच.

[ इतक्यांत बाहेरून " तात्यासाहेब, अहो तात्यासाहेब, काय हा उशीर !" असें म्हणत रावसाहेब प्रवेश करतात. ]

**रावसाहेबः**—छे बुवा ! तात्या किती वेळ हा ! आठ वाजून गेले तात्या. पहा. आठ वाजून सतरा मिनीटें झालीं. नवाला तर खेळ सुरूं होणार. आणि अजून तुमचं कांहींच कशांत नाहीं...

**तात्याः**—बसा, बसा. स्वतः मी हजर असल्याखेरीज खेळास थोडीच सुरवात होणार आहे !,

**रावसाहेबः**—तरी पण तात्या, घाई करा. मी जातो. तुमचं होऊं द्या— तोंपर्यंत टांगा आणतों. ( जातात )

[ लक्ष्मुम्बाई हातांत एक पैठणी घेऊन आंतल्या खोलींतून बाहेर येतात ]

**तात्याः**—आता कुठं सांपडली किल्ली ?

**लक्ष्मुम्०ः** - तुमच्या काळ्या कोटांत.

**तात्याः**—अरेच्चा ! वाटलंच. काल कांठाचं उपरणं काढलं अन् त्या ट्रंकेची चावी तशीच राहिली माझ्या जवळ. अग पण पैठणी कशाला नेसतेस ? तिथं काय पुण्याहवाचनाला थोडंच बसायचं आहे ? तें कोइमतोरी नेस. लवकर आटपा.

**लक्ष्मु०ः**—सगळ्यांची मेली एकच घाई ! ( आंत जातात )

**सदूः**—तात्या, बाबू बघा कसा मला चिडवतोय. म्हणतो कीं मला नाहीं न्यायचं नाटकाला.

**तात्याः**—बाबू, गप रे रडवूं नकोस त्याला आतां यावेळीं. सगळ्यांनांच न्यायचं हो. अरे अरे अरे गंगी बसली बघ...रामा...रामा बाबू दाट तिच्या रंगांतलं ...सद्या ये इकडं. तुडवशील पुन्हां...

[ लक्ष्मुम्बाई नवीन कोइमतुरी नेसून येतात. येतांच गंगीच्या पाठींत रपका ]

**लक्ष्मुम्०ः**—रड रड. थांब, कारटे, मी तुला घरींच ठेवते,

( गंगीला उचलून आंत नेतात )

**तात्याः**—अग झाली कां तयारी ?

**लक्ष्मुम्०ः**—( आंतून आर्जवाच्या स्वरांत ) त्या रमाबाईकडे बाबूला पाठवायचं होतं.

**तात्याः**—तुझं आपलं कांहीं लौकर संपायचं नाहीं. बाबू, जा बाबा रमाबाईकडे आणि हें बघ ए...कुठं आहे ? पोरं तर एकाहून एक चढ आहेत...सद्या—हा तरी कुठं आहे ?........

**तात्याः**—रावसाहेबांना माझं नाटक अतिशय आवडलं बरं कां ?

**लक्ष्मुम्०ः**—त्या मेल्या बायका नाटकांत कशा काम करतात देव जाणे. भर लोकांसमोर नटून थटून—

**तात्याः**—अग ते सारे पुरुष होते ! स्त्री नट त्यांना म्हणतात.

**लक्ष्मुम्०ः**—काय ते पुरुष होते ?

**तात्याः**—नाहीं तर ?

**लक्ष्मुम्०ः**—इश्श् ! कांहीं तरीच. थट्टेला तर सुमारच नाहीं.

**तात्याः**—अग खरंच ते पुरुष होते. देवाची शपथ, तुझी शपथ—

**लक्ष्मुम्०ः**—घ्या खुश्शाल माझी शपथ. हो, मी गेलें तर तुमच्या मागची माझी कटकट तरी चुकेल !

**तात्याः**—बरं तुझी नाहीं, माझी शपथ.

**लक्ष्मुम्०ः**—शपथबिपथ कांहीं नको बाई थोडक्याशा कारणासाठीं !..

**तात्याः**—तुझा विश्वास बसत नाहीं त्याला मग मी काय करूं ? काल स्त्रियांचं काम करणारे सगळे पुरुषच होते.

**लक्ष्मुम्०ः**—मी कांहीं इतकी वेडी नाहीं.

**तात्याः**—फार शहाणी आहेस, झालं ? अगोदर एक चांगलंसं फडकं आण, नाहीं तर माझं उपरणंच आण. दोन हजार रुपये म्हणजे कांहीं थोडे थोडके नाहींत !

**लक्ष्मुम्०ः**—पण मी म्हणतें आत्तां तर हपीसाहून यायचं झालं आहे. थोडा फराळ करून मग जावं.

**तात्याः**—छे बुवा ! तुम्ही बायका म्हणजे—

[ लक्ष्मुम्बाई मुरका मारण्याची तयारी करतात पण पात[illegible]ल्याकडे लक्ष नाहीं असं पाहून तें रहित करतात व आंत जाऊन कांहीं वेळानें ताटांत शिरा, चकल्या, लाडू, दहीपोहे घेऊन येतात. ]

**तात्याः**—ओहो ! आज काय दिवाळीच दिसते. बाबू, सदू, गंगे, या.

**लक्ष्मुम्०ः**—मी देत्ये त्यांना वेगळं. या रे इकडं.

**तात्याः**—अग बसूं दे त्यांनां इथंच. मुलांबरोबर खाण्यांतच मौज असते. सदू बैस. बाबू, तूं असा इथं ये...गंगे, माझ्या मांडीवर ये अशी. ये इथं...ये पिलू...या याया यारे...रुसली आहे वाटतं आमची बाबी.

**लक्ष्मुम्०ः**—त्या शेजारच्या कमळीसारखी बाहुली हवीय् तिला.

**तात्याः**—हात्तिच्या बाहुलीचना ? अग, आतां आपल्याला काय कमी ? सगळं कांहीं आणूं, पण दमानं मात्र घ्यायला हवं.

**बाबूः**—तात्या, माझ्या वह्या केव्हां आणणार ? मास्तर आम्हांला रोज तेवढ्यासाठीं बाकावर उभं करतात. आम्हाला मग...( रडूं लागतो. )

**तात्याः**—बरं, आज आणून देतों बरं तुला...रडतोयस काय वेड्यासारखा...सद्या तुला काय ?

**सदूः**—( रडक्या सुरांत ) पा ऽ ऽ ऽ टी.

**तात्याः**—बाबू, तुमची यादी करा पाहूं ?

[ बाबू आनंदानें उड्या मारीत जातो, कागद पेन्सील घेऊन येतो. पुस्तीची मांडी घालून लिहूं लागतो. ]

**बाबूः**—( लिहीत बाजूला. )

|| श्री ||

सामानाची यादी

चार ८० पानाच्या वह्या

एक मोटी सदूची

एक बाहुली चंदनाची........चंदनाची कां खराची ग गंगे ?

**गंगी:**—लपलाची.

**लक्षुम्:**—एहेरे लाड! 'खराची' म्हणतां येत नाहीं वाटतं? बोबडं बोलायची हौसच !

**गंगी:**—( झटकन् ) खराची बाहुली.

**लक्षुम्:**—बाबू, पुढं लिही. दोन रुपयाचे गहूं. शेरभर सपीट. शेरभर रवा. दोन रुपयाची साखर. दोन तोळे केशर..वेलदोडे दोन आण्याचे... नको वेलदोडे, परवाच तर आणलेत...करीन कसं तरी...तीन नागपुरी खणं-रेशमी-बरं कां, शेजारच्या रमाबाईचं उद्यां डोहाळजेवण तर—

**तात्या:**—त्या खणाचं आपल्याला कांहीं कळत नाहीं हां आतांच सांगून ठेवतों. मग आणल्यावर माझ्या नांवानं—

**लक्षुम्:**—बरं मी घेईन खणवाला दारावर आला म्हंजे. नऊ रुपये तरी निदान लागतील.

**तात्या:**—नऊ? त्यांतच तुमाचाहि खण दिसतोय् एक.

**लक्षुम०:**—नेहमींचंच आहे तुमचं! बायको म्हणजे अगदीं चुलीजवळचं पोतरं. तिला जीव नाहीं! हौस नाहीं...कांहीं कांहीं नाहीं. मर मर घरीं मरावं-चेकेला शिजवून घालव-कारट्याचं आहे नाहीं पहावं-अन् काय, तर वर्षाकाठीं दोन असलीं फुताडीं! चुकून एखी खण...

**तात्या:**—पुरुषांची मानमर्यादा वाटतं ही?

**लक्षुम०:**—( पहिल्याच आवाजांत ) हो! येतं नेय येतं नये म्हटलं...नेहमींचंच आहे हें...मला माहीत आहे...कधीं हौसेनं कांहीं घेतलंय्‌त —

**तात्या:**—बोला पुढं. एकतोत आम्ही.

**लक्षुम०:**—ते दोन हजार रुपये डबोल्यांत पुरून का ठेवायचे आहेत

**तात्या:**—शुद्ध वेडी आहेस तूं. तुला समजायला हवं...सदाची मुंज आली उद्यावर. तेव्हां आपल्याला काय थोडाथोडका खर्च येईल? आहेच ना तुमची हौस त्यावेळीं!

**लक्षुम०:**—खरंच, येत्या मार्गशीर्षांत त्याची मुंज उरकून घ्यावी नाहं

**तात्या:**—पाहूं. त्यासाटीं आम्हांला आधी रजा मिळायला हवी.

( बऱ्याळांत पांच वाजतात. )

पांच-अरेच्चा! पुनः काल्च्यासारखंच नको व्हायला. जा, जा. आण पाहूं उपरणं आधीं.

( लक्षुमबाई उपरणं आणतात व देतात. )

**तात्या:**—बरं मी जातों आं.

**बाबू:**—ताल्या, आमचं सामान आण बरं कां?

**सदू:**—ताल्या माझं पण—

गंगी:—माझंऽऽ

तात्या:—सगळं कांहीं आणतों. खेळा अं. भांडूंबिडूं नका. (जातात.)

लक्ष्मु०:—(मनांत पुटपुटतात) देवी अंबाबाई, तुला काय वाटेल तो नवस करीन, तुला चांदीसोन्याचीं पावलं वाहीन. अशींच पुन्हां नाटकं लिहून घे यांच्याकडनं.

तात्या:—(लगबगीनें परत येतात) अग पण माझी हातांतली काठी कुठं आहे?

[ इतक्यांत बाहेरून 'तात्यासाहेब' अशी हांक येते. हाकेमागून रावसाहेब प्रवेश करतात. ]

तात्या:—या या रावसाहेब...छे छे वर वर अहो, असं वर बसा.

रावसाहेब:—छान्! मी तुमची वाट पाहून पाहून कंटाळलों. अखेर तुमच्याकडे निघणार तोंच कंपनीचे मालकच भेटले. त्यांना कसली घाई होती कोण जाणे...त्यांनीं आपला मजकूर सांगितला नि हे दोन हजार रुपये तुम्हांला द्यायला दिले माझ्याजवळ. (खिशांतून नोटांचं पुडकं काढतात व मोजून तात्यांस देतात.)

[ मुलें आनंदानें उड्या मारतात, लक्ष्मुताई डोळे मोठे करून त्यांना दटावतात. पण स्वतःच्या पोटांत आनंद न मावल्यामुळें दरवाजा धाडकन् लोटून आंतल्या खोलींत जातात. ]

तात्या:—(हातांत नोटांचं पुडकं घेऊन 'काय याची किंमत' अशा अर्थानें मांडीवर आपटीत) बरं पण रावसाहेब, तुम्हाला कसं काय वाटलं माझं नाटक?

रावसाहेब:—एकदम अप्रतीम. Grand-successful. पण आमचं म्हणणं एवढंच, ती ट्रॅजेडी व्हायला नको होती.

तात्या:—करणार काय? नाइलाज झाला माझा! मग अखेर ट्रॅजेडीच करावी लागली.

रावसाहेब:—शेवटच्या प्रवेशांत तर अगदीं climax झाला आहे.

तात्या:—(विनयपूर्वक) अजून माझ्या मनासारखं वठत नाहीं! पण कां हो, आतां उद्यां वर्तमानपत्रांतून माझ्यावर कांहीं तरी खूपच येणार असेल नाहीं?

रावसाहेब:—येणारं म्हणजे? यायलाच पाहिजे! त्या 'शूर्पणखा'च्या संपादकांनीं म्हणे तुमच्यावर एक सणसणीत अग्रलेख खरडला आहे. तात्या, आतां तुम्ही पोझीशन् सांभाळून वागलं पाहिजे. हें असं गबाळं काम उपयोगाचं नाहीं. तो खिसा किती दिवसांपासून उसवला आहे—त्या त्या कोटाला रजा.

तात्या:—करूं हो, करूं सावकाश.

रावसाहेब:—अन् चार लोकांशीं बोलतांना प्रेस्टीज ठेवून बोलावं! नाहीं तर तात्यांची जीभ एकदां हैलायला लागली कीं—

तात्या:—छे छे! आतां सगळं कांहीं करणार आहे हो. पण आस्ते आस्ते.

रावसाहेब:—बरं मी जातों तर. मला डॉक्टरकडे जायचं आहे. सोनीला कालपासून ताप येतोय्.

तात्या:—सोनीला? छे छे, हीं पोरं कांहीं ऐकत नाहींत; उन्हांत खेळतात; टसाटसा पाणी पितात...बाबू, सद्या, कुठें रे निघालांत? नाहीं जायचं खेळायला. बसा आज लिहीत वाचीत. तुरीच म्हटलं आज सोनी कां नाहीं दिसली दिवसभरांत? भयंकर खोडकर आहे बुवा ती.

रावसाहेब:—जाऊं?

तात्या:—रावसाहेब जाताहेत—त्यांना कांहीं चहाकॉफी—अग ए—

रावसाहेब:—अहो मी परका थोडाच आहे? घाई नसती तर बसलोच असतों. काय लक्ष्मुवहिनी, आतां थाटांत एक सत्यनारायण ठोकून द्या. दोन हजाराचा लग्गा साधला आहे तात्यांनीं. मग केव्हां करतायू?

लक्ष्मु०:—सगळं कांहीं तुम्हीच करणार सुंवरपण

रावसाहेब:—वा वा असं कसं होईल. बरं तात्या, मी जातों.

(जातात.)

तात्या:—हुश्श! जीव श्रमला बुवा या नाटकापायीं. अग हे घे अन् खालच्या लाल ट्रंकेंत ठेव. (नोटांचं पुडकं देतात) जपून हो. मुलांनो, आतां तुम्ही खेळा जा. मला थोडं पडूं द्या स्वस्थ. हुश्श! जगन्निवास, जगदोद्धारा, जगदीशा!!

[ अंथरुणावर अंग टाकतात. कांहीं वेळानें डोळा लागतो. ]

●

(घड्याळांत सात वाजतात.)

लक्ष्मु०:—(नारायणरावांना जागे करीत) आता उठायचं. चांगलं फटफटीत झालं आहे.

नारायणराव:—(दचकून जागे होऊन) काय ठवलंस ना?

लक्ष्मु०:—काय?

नारायणराव:—(डोळे चोळीत) ते दोन हजार...

लक्ष्मु०:—दोन हजार! कांहीं स्वप्नबिप्न तर पडलं नाहीं नं? काल रात्रीं नाटक कां बिटक कांहींसं लिहायला घेतलं होतंत्—लिहून झालं?

नारायणराव:—म्हणजे?????

लक्ष्मु०:—!!!!!

शशिकला आळंद्कर



मनोहरनं जें केलं
तें इतकं लोक-विलक्षण
होतं कीं- नवाबसाहेबांनीं
तिला जेव्हां विचारलं,
बिटिया, कहां है तेरा

# पण!

तेव्हां अनुराधेनं
कांहींच उत्तर दिलं नाहीं
ती फक्त—

चांदणी चौकांतला नवाब यावरजंगचा झिन्नतमहाल म्हणजे मुस्लीम कारागिरीचा उत्कृष्ट नमुना होता. महालाभोंवतालचें कुंपण इतक्या कलात्मकतेनें उभें केलें होतें कीं मोठ्या कष्टानी दरवाजावरच्या सशस्त्र पहारेकऱ्यांचा डोळा चुकवून कुंपणावरून उडी मारणाऱ्या एखाद्या वेड्या डाकूची नजरदेखील त्या कलाकुसरीवर क्षणभर कां होईना पण खिळून रहाती ! पण संगमरवरी पत्थरांतलं कोरीव शिल्प हें कांहीं झिन्नतमहालाचें वैशिष्ट्य नव्हतें. वैशिष्ट्य होतें तें महालांत सदैव नांदणाऱ्या जिवंतपणात ! भागानगरीसारख्या संपन्न बादशाही शहरांत संगमरवरी पत्थरांची उणीव नव्हती—कारागिरांची वाण नव्हती. मुस्लीम संस्कृतीचे—अस्सल कारागिरीचे उत्कृष्ट नमुने भागानगरींत पहायला मिळाले असते. पण त्याबरोबरच भव्य सुंदर नाजुक कलाकुसरीनं सजलेल्या संगमरवरी इमारतीभोंवतीं रेंगाळणारी गूढ उदासीनतेची छाया मात्र मनाला जाणवल्याखेरीज रहात नसे.

सुंदर, संपन्न, तरुण पण विधवा स्त्री, पहाणाऱ्याच्या मनावर जो नकळत ठसा ठसवून जाते—तसाच आघात भागानगरींतले वैभवसंपन्न प्रासाद पहातांना होत राही

आणि त्या पुनमच्या दिवशीं तर जणूं नगरींतली सारी रमणीयता—सजीवता त्या ठिकाणीं एकवटली होती. सूर्योदयानंतर दोन घटकांनीं नवाबसाहेबांच्या मोठ्या मुलाची–हमीद हुसेनची–शादी हो गई थी. पण त्यानंतरही झिन्नतमहालांत अमीरउमरावांची नुसती रीघ लागली होती. मोठ्या आदबीनं नवाबसाहेबांच्या शेजारीं बसून पाहुण्यांच्या भेटींचा आणि नजराण्यांचा हमीद हुसेन हंसून, लवून मुजरा करून स्वीकार करीत होता.

संध्याकाळ होत आली पण पाहुण्यांची गर्दी कमी झाली नाहीं–उलट ती अधिकच वाढली. सकाळ–दुपार येऊन गेलेल्या बग्गी किंमती मोटारी पुन्हा एकदां महालासमोर थडकूं लागल्या.

एकीहून एक सरस गाणाऱ्या शेकडो गायिकांचे टुमदार बंगले भागानगरींत वसले होते. अर्थातच अस्सल खानदानी गायकीची बैठक हें आजच्या मैफलीचें वैशिष्ट्य नव्हतें. नवाबसाहेबांच्या मुलाची शादी ही घटनाहि जणूं त्या वेळीं भूतकाळात जमा झाली होती. आज नव्हतें होतें तें एकाच व्यक्तीला–मुन्नीबाईला–तिच्या दर्शनाला–तिच्या नाचाला–तिच्या भोंवतीं सप्तरंगांत आणि सप्तस्वरांत रंगलेल्या इतिहासाला ! पन्नाशीची झुळूक लागलेल्या उमरावांना अजून ती सरसलेली रात्र आठवत होती

तारुण्याच्या सरहद्दीवर घोटाळणाऱ्या नवख्या तरुणांना मात्र ती रम्य कथा अपरिचित होती. पण जिनें गेल्या वीस वर्षांत कोणाच्याही आग्रहाला, विनंतीला वा हुकूमाला मान न तुकवितां तंबोरा हातीं धरला नव्हता ती मुन्नीबाई आज नवाबसाहेबांच्या झिन्नत महालांत आपखुषीनें हजर होणार होती—गाणार होती आणि ही एकच अपूर्व बातमी तरुणांचे ताफे महालांत खेचून आणण्यास समर्थ होती.

दुपारीं वीस तोळ्याच्या भरीव सुवर्ण कंकणांच्या भेटीबरोबरच मुन्नीबाई रात्रीं बैठकींत हजरी लावणार असल्याची बातमी हुजऱ्यानें सांगितली तेव्हां नबाबसाहेबांचा स्वतःच्याच कानावर विश्वास बसेना आणि तो जेव्हां बसला तेव्हां त्यांचा चेहेरा प्रसन्नतेनं उजळून निघाला. दहाच्या पांच नोटा हुजऱ्याच्या हातांत पडल्या. नबाबसाहेबांच्या खुषीचा नक्की अंदाज लागला होता. शब्दांची गरज उरली नव्हती.

झिन्नतमहालचा मुख्य दिवाणखाना मैफलीसाठीं सजवला होता. ठीक नऊ वाजे मुन्नीबाईला घेऊन आलेली नबाबसाहेबांची रोल्सराइस महालापुढें हजर झाली. नबाबसाहेब पुढें आले. दोन पायऱ्या उतरून समोरा गेले. दोघांची नजरानजर झाली. मोठ्या आदबीनें मुन्नीबाईनं कुर्निसात केला. उलट नबाबसाहेबही मान किंचित् पुढे झुकवून हंसले. अगदीं हीच तऱ्हा, ह्याच, अगदीं ह्याच थाटांत नबाबसाहेब मुन्नीचा मुजरा स्वीकारीत असत. वीस वर्षांच्या दीर्घ कालानंतरही त्यांत फरक पडला नव्हता. मुन्नीबाईच्या चेहेऱ्यावर हलकंसं हंसू उमटलं आणि त्याच प्रसन्न मुद्रेनं तिनें महालांत प्रवेश केला.

शरबताचे पेले देणारे हुजरे चटकन् दृष्टीआड झाले. तोंड पुसण्यासाठीं बाहेर निघालेले रंगीबेरंगी रेशमी हातरुमाल खिशांत कोंबले गेले. वयानें-मानानें भारदस्त ठरलेले अमीरउमराव स्वतःला सावरून पण रुबाबांत बसले. पंचविशींतल्या भर जवानींतले नवथर तरुण छाती पुढें काढून मान कलती ठेवून लोडाला टेकले. खास तयार केलेल्या मखमाली बैठकी-वर मुन्नीबाई बसली. नजरेच्या एका झेपेंत जमलेल्या रसिकरंगेल श्रोत्यांचा तिनें अंदाज घेतला. महालांत शांतता पसरली. जाळीच्या पडद्यामागची बांगड्यांची किणकिण थांबली. कुजबुज थंडावली. नाहीं म्हणायला छताला लावलेल्या झुंबराचे लोलक हलत होते—विजेचे पंखे फिरत होते.

लावून आणलेल्या तंबोऱ्याचे स्वर चढले-उतरले नसल्याची मुन्नीबाई खात्री करून घेऊं लागली. पंचमाची तार किंचित् चढवतांना तिची नजर डाव्या हाताला वळली. ऐन भरजवानींत पाऊल टाकलेल्या त्या खानदानी उमद्या तरुणावर खिळली. नेत्रांचें मीलन झालें. तंबोऱ्याची तार झण-



कारली. मुन्नीबाईच्या डोळ्यांत कसले तरी गूढभाव चमकून गेले. त्या नवथर तरुणाच्या हृदयाचे दोनचार ठोके भलत्या द्रुतगतींत पडले. एकच क्षण पुन्हा सारें शांत झालें. स्वर लावला गेला. तबला, सारंगी, तालासुरांत बोलूं लागलीं. मुन्नीबाईच्या गळ्यांतून पहिला स्वर बाहेर पडला—दुसरा—तिसरा... प्रेक्षकांच्या नजरेंत चढलेली—मुन्नीबाईच्या अप्रतीम सौंदर्याची मस्ती उतरूं लागली—स्वरलहरींची धुन्दी मनावर चढूं लागली. आणि पहिल्याच भूप रागांतल्या चिजेनं श्रोत्यांच्या मनाची चांगलीच पकड घेतली दुसरी बिहाग रागांतली चीज सुरू झाली. इतका वेळ चित्रासारखी तटस्थ बसलेली मंडळी डोलूं लागली. गिरकीची तान घेतां घेतां 'तिया' साधून समेवर येतांच तिची आणि ह्या तरुणाची पुन्हा नजरानजर झाली. पान खाऊन रंगलेला खालचा ओठ त्या तरुणानं हलकेच दांताखालीं दाबला. मुन्नीबाईच्या ओठांवर हंसू उमटलं. तान अधिकच पल्लेदार घेतली गेली आणि इथेंच प्रथम रसिकवाणींतून शब्द उमटले—'वहावा ! वहावा ! क्या बात है ! !'

आतां मुन्नीबाईच्या गूढ व्यक्तिमत्वाचं पडलेलं जड दडपण दूर झालं. वातावरणांत अधिक प्रसन्नता आली. भावपूर्ण तालबद्ध स्वरनर्तनांत श्रोत्यांचीं मनेंही नाचूं लागलीं. कधीं किंचित् मान झुकवून—तर कधीं नुसतेच डोळे हंसवून—दाट पापण्यांनी मुजरा करून मुन्नीबाई, मिळणाऱ्या बहुमानाचा स्वीकार करीत, तारसप्तकांतील एका गिरकींत गांधारावर—समेवर येऊन पोहोंचली.

मुन्नीबाईनं राजशाही बागेश्री रागाची आळवणी सुरू केली. पहिल्या मुखड्यांतच चीज रंगली. सारी शक्ति, सारी कुशलता, सारा जीव जणूं स्वर-स्वरांत खेळत होता. नाचत होता. मुरब्बी संगीतज्ञांकीन देहभान विसरले. कित्येकांनीं डोळे मिटून ते स्वर हृदयाच्या तबकडीवर कायम टसविण्याचा प्रयत्न केला. कांहींनीं डोळे मिटले, 'तरी तेच न मिटले 'तरी तेच ?' असा पोक्त विचार करून, नजरेच्या पाऊलवाटेनं ते स्वर हृदयापर्यंत नेऊन पोहोंचविण्याचा अट्टाहास धरला. चीज संपली. कोनाकोपऱ्यांतून ध्वनि निघाला—'वहावा ! वहावा ! क्या कहेने ! !'

पुन्हा तोच प्रकार. तेच चार डोळे परस्परांना भेटले. मुन्नीबाईची नजर हंसत होती—नाचत होती. त्या खेळकर तरुणाचे डोळे भारावले होते. कमालीचे जड झाले होते. पापण्यांची उघडझांप न करतां तो मुन्नीबाईकडे पहात होता. सारी सजीवता—सारी शक्ति जणूं कुठल्या तरी अदृश्य शक्तीनं खेंचून नेली होती.

आतां 'तिरछी नजर लागी प्यारी' ही ठुमरी मुन्नीबाई गाऊं लागली. बैठकींत निराळाच रंग जमूं लागला. एकमेकांकडे अर्थपूर्ण पहात, गालां तल्या गालांत मिस्किलपणें हंसत 'वहावा ! सुभान अल्ला ! क्या कहे—'ची खैरात होऊं लागली. मुन्नीबाई अंतऱ्यावर आली आणि अगदीं ह्याच वेळीं तो तरुण त्याच्याच शेजारीं बसलेल्या नबाबसाहेबांच्या मुलाच्या—सलीमच्या कानांत कुजबुजला. त्याची हालचाल मुन्नीबाईच्या लक्षांत आल्या-खेरीज राहिली नाहीं. त्याच्यावर खिळलेल्या तिच्या नजरेला नजर देऊन एक डोळा किंचित् मिचकावून त्या तरुणानें सलीमला हळूच एक कोपरखळी मारली. मुन्नीबाई थांबली. दुगण न घेतां भलत्या ठिकाणीं थांबली. साथी-दारांनीं चमकून वर पाहिलं. तबलजी महमुदखाँचा कसबी हात वरच्यावर थांबला. लोक तालस्वरांच्या गिरकींतून बाहेर पडण्यापूर्वीच खड्या पण मृदु आवाजांत तिनें सवाल केला—" क्या बात है मुन्वर ? क्या बोल

रहा था अभी ?" प्रत्यक्ष आपल्या नांवाचा उल्लेख होतांच तो देखणा तरुण चांगलाच गोंधळला—ओशाळला.

" क्या बात है ? सचमुच बोलो. "

त्या तरुणाची नजर एकाएकीं खालीं वळली. नजरेंतली धुंदी पार उतरली. निरागस चेहेऱ्यावर लाली पसरली.

मुन्नीबाईच्या आवाजाला अधिकच धार चढली. "अच्छा, बेटा सलीम, तो तू बता दे—क्या बोल रहा था मुन्वर ?"

जबाब देण्याऐवजीं सलीम बोटांची उगाचच चाळवाचाळव करूं लागला.

" क्या बात है सलीम ?"

नवाबसाहेबांच्या—खुद्द वालीदच्या—तोंडची मेघगर्जना कानीं पडतांच सलीम थिजला. मुन्वरकडे आणि अब्बाजानकडे आळीपाळीनें तो पाहूं लागला. त्या तरुणानें नजर वर उचलली नाहीं.

" देख बेटा, तूं नहीं कहेगा तो मैं नहीं गाऊँगी. " मुन्नीबाईनं तंबोरा खालीं ठेवलेला पहातांच सलीमनं तोंड उघडण्याचा प्रयत्न केला—

" हाँ—जी—हाँ—वो बोल रहा था—आप—आप—बडी खुबसुरत—हाँ—जी—"

सलीम अडखळूं लागला. बसल्या जागेवरून किंचित् पुढें झुकून नवाबसाहेबांनीं आज्ञा केली,

" सलीम, खडे रहो. "

सलीम ताडकन् उठून उभा राहिला. सरळ अब्बाजानच्या नजरेला नजर दिली.

"अब कहो, क्या बोल रहा था मुन्वर ? साफ साफ कहो. "

सारं [illegible] धैर्य एकवटून सलीमनं जबाब दिला—

" क्या खुबसुरती ! देखतेही इतनी बेचैनी पैदा होती हैं तो न मालुम ये चीज हाँसील होने पर क्या होगा ? किसकी तकदीर इतनी बडी है—"

नवाबसाहेब ताडकन् उठले. सगळ्यांचे श्वास रोधले गेले.

मुन्वरनें कसलीच हालचाल केली नाहीं. नवाबसाहेबांनीं पुन्हा त्याच्या नावाचा पुकार केला—

" मुन्वर "

मुन्वरची खालीं झुकलेली मान ताठ झाली नाहीं. मुन्नीबाईनं नवाबसाहेबांकडे पाहिलं. तिच्या ओठावर केविलवाणं हंसूं उमटलं. नवाबसाहेब निमूटपणें खालीं बसले.

आतां मुन्नीबाईनी म्लान नजर मुन्वरच्या चेहेऱ्यावर स्थिरावली—

" इतनी शरमनेकी कोई बात नहीं है मुन्वर. सुन ले बेटा, ये खुषकिस्मती पानेवाले जिंदगीमें तुम्हारे वालीद सिवा कोई भी नहीं थे—उन्हीं के तुम औलाद हो."

मुन्वरनं झपकन् मान वर केली—नजरेला नजर भिडली—दुसऱ्याच क्षणीं खालीं वळली.

जणूं कांहीं घडलंच नाहीं अशा स्वाबांत मुन्नीबाईनं तंबोरा हातीं घेतला. सोहनी रागांतली नवीनच चीज ती गाऊं लागली—जीव तोडून गाऊं लागली. पण चीज रंगत नव्हती. हृदयाला भिडत नव्हती.

बसलेला हादरा कांहीं लहानसहान नव्हता. प्रत्येकाला तो चांगलाच जाणवत होता. कांहींच्या तीक्ष्ण नजरा अजूनही मुन्वरच्या चेहेऱ्यावर खिळल्या होत्या. तर कांहीं जवानमर्दांच्या कानांत अजूनही ते जळजळीत शब्द घुमसत होते—

' खुषकिस्मती पानेवाले तुम्हारे वालीदसिवा दुसरे कोई भी नहीं थे—उन्हींके तुम औलाद हो ! '

नवाबसाहेब तक्क्याला रेलून डोळे मिटून बसले होते. चेहेऱ्यावरून अंतरंगांतल्या खळबळीचा नक्की अंदाज लावणं मोठं कठीण काम होतं.

मुन्नीबाई गात होती. भरधांव आणि भरदार ताना घेत होती. पण तरीही कसलीतरी उणीव तीव्रतेनं जाणवत होती. त्या स्वरांच्या नर्तनांत पहिला जिवंतपणा उरला नव्हता. ती मनाला दिपविणारी विजेची चमक राहिली नव्हती. अधूनमधून ' वहावा ! क्या बात है ' ची निर्जीव खैरात होत होती खरी, पण फाटलेल्या आकाशाला ठिगळ लावण्यासारखाच तो प्रयत्न निष्फळ आणि खुळा ठरत होता !

आणि त्याच बेचैनींत शेवटची भैरवी आळवली गेली. मुन्नीबाईनं उठून जमलेल्या रसिक कलाभक्तांना शेवटचा मुजरा केला. नवाबसाहेब पुढें झाले. मुन्नीबाई त्यांच्या मागून महालाबाहेर पडली. नवाबसाहेब दोन पायऱ्या खालीं उतरले. गाडींत चढतांना मुन्नीबाईनं त्यांना कुर्निसात केला. नवाबसाहेबांच्या मानेची यांत्रिक हालचाल झाली. पण ओठावर हंसूं उमटलं नाहीं.

मोठ्या कमानी दरवाजांतून गाडी बाहेर पडतांना पाहून नवाबसाहेबांना एकदम याद आली. मुन्नीबाईला देण्यासाठीं तयार ठेवलेली बिदागी [illegible] जनानखान्यांत चांदीच्या तबकांत राहून गेली होती. त्यांचं मन चरफडलं आणि त्याच वेळीं कुरकुरलं—' छे ! ही मुन्नी म्हणजे गोड स्वप्नांतली धुंदी आहे. इतकीं वर्षं लोटलीं पण त्यांतलं माधुर्य कमी झालं नाहीं. [illegible] मुन्नी थांबली नाहीं म्हणून अखेरीस काळ खुद्द हिच्यासाठीं थांबला असावा आणि म्हणूनच बाळिशीच्या घरांत गेलेल्या [illegible] [illegible] नजर पडली. '

त्यांच्या त्रासिक नजरेंत आतां हंसूं उमटलं. मनावर आलेली अभ्रं भुर्कन उडाल्याचा भास झाला. गर्दीतून स्वतःचे पाय ओढीत चालणाऱ्या मुन्वरकडे पाहून नवाबसाहेबांनीं खुल्या दिलानं हांक मारली—

" बेटा मुन्वर—"

खालच्या मानेनं मुन्वर त्यांच्याजवळ आला. मुन्वरच्या भरदार पाठीवर त्यांनीं एक भरीव थाप मारली—

" बुरा नहीं मानना बेटा, जवानीमें ऐसी गलती तो हो जाती है. जाव बेटा. आराम करो. "



अनुक्रमणिका

नवाबसाहेब आंत निघून गेले. थोड्या वेळानें एका बड्या पाहुण्याला निरोप देण्यासाटीं ते जेव्हां बाहेर आले तेव्हां हंसले—अगदीं दिलखुलास हंसले. मुन्वर अजूनही तिथेंच उभा होता. त्याच्या खांद्यावर त्यांनीं हल्केच हात ठेवले—" अरे पागल तो नहीं हो गया तू ? इतनी मामुली बातपर इतनी बेचैनी ! जाव बेटा, फिर कभी ऐसी गलती न होने दो —अपने खानदानको कभी न भूलना चाहिये—"

नवाबसाहेब आंत जाण्यासाठीं वळले आणि मुन्वरची हांक ऐकून पुन्हा परतले—

" क्या बात है मुन्वर ?"

" चचा, मुझे कुछ पूछना है. "

" क्या पूछना है ?"

" जी नहीं—यही—य्ही—"

मुंन्वर अडखळला आणि त्या अडखळण्यांतूनच नवाबसाहेबांना त्याच्या प्रश्नाची अचूक कल्पना आली.

" आज इस बातका फैसला करनेकी कुछ जरूरत नहीं है बेटा. फिर कभी..."

मुन्वरच्या चेहेऱ्याकडे नजर जातांच ते थांबले. " अच्छा बेटा, ठहेरो—"

नवाबसाहेब आंत गेले. खांबाला टेकून मुन्वर तिथेंच उभा राहिला हुज्ऱ्यानें आणून दिलेला बदामी केशरी दुधाचा पेला एका दमांत खतम केला. थोड्याच वेळांत नवाबसाहेब कपडे बदलून खालीं आले. मुन्वरला घेऊन बागेंत गेले. संगमरवरी चबुतऱ्यावर नवाबसाहेब बसले. कारंजाच्या कठड्यावर मुन्वर टेकला. गोंधळलेली मनःस्थिति अजूनही ठिकाणावर आली नव्हती. त्याच्या हालचालींत तोच ओशाळेपणा भरला होता.

" क्या पूछना है बेटा ? "

मुन्वरनें उत्तर दिलं नाहीं. त्याची कांहीं गरजही नव्हती. नवाबसाहेबानीं क्षणभर डोळे मिटून घेतले. कधींतरी एका बेसावध क्षणाला घडून गेलेल्या इतिहासाचीं पानं आज पुन्हा चाळवलीं गेलीं होतीं. स्वतःभोंवतीच गिरक्या घेणाऱ्या वसुंधरेच्या अंतरंगांत नाहीं तरी सतत नावीन्य कोठून आढळणार ?

◆

वीस वर्षांपूर्वी ती 'कहानी' सप्तरंगांत, सप्तस्वरांत रंगली होती—निमाली होती. वाऱ्याची मंद झुळूक यावी—झुडपावर मोठ्या डौलानं डुलणारं टपोरं फूल गळून पडावं—पाकळ्यान्‌पाकळ्या भूमीवर विखुरल्या जाव्या—इतक्या न—अगदीं इतक्याच सहजपणें ती घटना घडून गेली होती. इतिहास-जमा झाली होती.

त्याच झिन्नतमहालांत नवाबसाहेबांच्या [illegible] बहिणीच्या शादीनिमित्त अशीच मैफल रंगली होती. आपल्या अस्सल गायकी घराण्याचं नांव राखणारी महशूर गायिका बाई जद्दनबाई आपल्या खुबसुरत लडकीसह महालांत हजर झाली होती. आज बाईची लाडकी बेटी मुन्नी प्रथमच मैफलींत गाणार होती. भागानगरीसारख्या रंगेल नगरींत मुन्नीच्या अप्रतिम सौंदर्याची चाहूल गुलहौशी जवानमर्दांना आधींच लागली होती. आजच्या बैटकींत बरेचसे रत्नपारखी मुरब्बी निव्वळ मुन्नीच्या अस्सल सौंदर्याचा अंदाज घेण्यासाटीं जमले होते आणि जेव्हां सौंदर्याच्या नशेबरोबर स्वर्गीय संगीताची-त्या बिजलीच्या स्वरलहरीची धुंदी चढूं लागली तेव्हां महालांतले विजेचे दिवे अधिक तेजानें उजळून उठले—झुंबराचे लोलक नव्या तेजानें लखलखले. हिरा अस्सल असल्याची खात्री पटली. मुरब्बी रत्नपारखी खूप झाले.

' ठुमरीनें ' तर कहर उडविला. ' वहावा—क्या बात है ' असल्या शब्दमौक्तिकांबरोबर प्रत्यक्ष खिशांतल्या नोटा मुन्नीच्या लवलवत्या सुकुमार देहावर उधळल्या जाऊं लागल्या. बाई जद्दनबाईनं [illegible] रुंद पंजांनीं मुन्नीचा चेहेरा कुरवाळला आणि स्वतःच्या कानशीलावर बोटं कडाकड मोडून तिथल्या तिथेंच आपल्या लाडक्या बेटीची नजर काढली.

नवाबसाहेब आपले बडे दोस्त रायबहादूर दलपतरायसह बैटकीच्या डाव्या बाजूला बसले होते. उजवा हात दोस्ताच्या गळ्यांत टाकून, मोठ्या आरामांत मौजमजाह देख रहेथे. साठी उलटलेल्या बुढ्ढ्या नबाब हमीद

खाँनीं जेव्हां रेशमी शेरवानीच्या वरच्या खिशांतून सोन्याची गिनी काढून उडविली तेव्हां नवाबसाहेब हळूच आपल्या दोस्ताच्या कानीं लागले–

" देखो जी रायबहादूर, कैसी मजाक उडा रहे हैं. " रायबहादूरांच्या धीरगंभीर चेहऱ्यावर कसलाच भाव उमटला नाहीं. मुन्नीच्या ओठावर मात्र हंसं उमटलं.

वाढत्या रंगांत आणि चढत्या सुरांत शेवटची भैरवी आळवली गेली आणि ' माँ से बेटी सवाई ' ठरली. सप्तस्वरांना अगदीं सहज लाडिकपणें हंसत खेळत नाचविणाऱ्या त्या नवथर परीची पहिली बिदागी नवाबसाहेबांनीं जद्दनबाईच्या हातांत टाकली. लाडक्या बेटीवरून ओवाळून त्या सात हजारांच्या नोटा बाईनं कबाच्या चोळींत ठेवून दिल्या. पहिल्याच बैठकींत स्वरूपसुंदरी मुन्नी स्वरसाम्राज्ञी ठरली. रसिकांच्या चरणीं शेवटचा मानाचा मुजरा करून मुन्नी निघाली आणि तोंच रायबहादूर दलपतराय पुढें झाले. मुन्नीचा हात हातीं घेतला. बोटांतली आंगठी काढून मुन्नीच्या लांबसडक निमुळत्या बोटांत सरकावली. कोंदणांतला बहुमोल हिरा झळकला. अमीरउमरावांच्या चेहऱ्यावर रंगीबेरंगी छटा उमटून गेल्या. नवाबसाहेबांच्या करड्या नजरेंत तीव्र नापसंतीची धार चमकून गेली. मुन्नीचा सुकुमार हात रायबहादूरांच्या कणखर हातांत होता. मुन्नीच्या काळ्याभोर विशाल डोळ्यांच्या दाट पापण्या लवलवत होत्या. ओठांच्या गुलाबी पाकळ्या थरथरत होत्या. तालासुरांत गाणाऱ्या, बोलणाऱ्या, नाचणाऱ्या मुन्नीच्या हृदयाचे ठोके चांगलेच बेताल पडत होते. रायबहादूरांची नजर मुन्नीच्या लालबुंद चेहऱ्यावर स्थिरावली होती. त्या नजरेंत इतकं देखील वादळ उठलं नव्हतं. जणूं होणाऱ्याजाणाऱ्या गोष्टीची ग्वाही त्यांच्या मनाला अशींच कधींतरी–कुठल्यातरी अदृश्य शक्तीनं दिली होती. जरतारी पडद्याआड सुवर्णकंकणं निनादलीं. नवाबसाहेबांच्या नजरेपुढें राजलक्ष्मीचा चेहेरा उजळून उठला. तिच्या सावळ्या पण गोंडस हातांतल्या बारीक तासाच्या बांगड्या झळकून गेल्या..

नवाबसाहेब झपकन् पुढें झाले. रायबहादूरांच्या खांद्यावर आपला पोलादी पंजा ठेवला. कणखर हाताची पकड सैल झाली. मुन्नीनं पटकन् आपला हात काढून घेतला. झपझप पाऊल उचलीत ती महालाबाहेर पडली. तिची अम्माजान तिच्या मागें धांवली.

आणि आत्तां कुठें रायबहादूर दलपतरायची नजर अंवतींभंवतीं भिरभिरली. नवाब यावरजंगच्या नजरेशीं भिडली आणि मग लांबलांब पण वजनदार पावलं टाकीत रायबहादूर निघून गेले. जमलेल्या बड्या पाहुण्यांचा–खुद्द नवाबसाहेबांचा निरोप न घेतां निघून गेले. आपल्या दोस्ताच्या ह्या असल्या विचित्र वर्तनानं नवाबसाहेबांची ' शान ' अधिकच बिघडली खरी, पण चेहेऱ्यावर हुकमी हंसूं आणून ते पुढें झाले. आमंत्रित पाहुण्यांना त्यांच्या मानमरातबाप्रमाणें निरोप देऊं लागले.

चार दिवस असेच लोटले. घडलेली घटना अशी कांहीं भयंकर नव्हती कीं त्यामुळें जोराचा हादरा बसून बेचैनी निर्माण व्हावी. बात मामुली होती. ढंगदार गाण्याच्या मैफलींत हे असे प्रकार चुटकीसरशीं घडून जात. त्याची दखलही कोणी घेत नसे. दूर कशाला, प्रत्यक्ष नवाबसाहेबांच्या आजोबांनीं ' नानाजान ' नीं आपल्या भर जवानींत गळ्यांतला पन्नास हजाराचा कंठा एका गायिकेच्या कोकीळ कंठांत घातल्याची बात सांगणारे दोन चार बुढे मियाँ भागानगरींत आजही सांपडले असते.

अजून चार दिवस थांबले आणि एका नव्या दिवसाच्या सकाळीं उर्दू अकबार वाचीत असतांना बेगमसाहिबा आसपास घुटमळूं लागल्या. नवाबसाहेबांनीं नजर वर केली आणि मग एका दमांत बेगमसाहिबा बोलून गेली–" देखते क्या हो ? किसनमहल रंजमें डूब गया है. जलसे की रातसे रायबहादूर का दिमाग बिघड गया है. वो रातदिन मुन्नी के पीछें पडे रहते हैं. सुना है, वो उसको अपने महलमें लानेवाले हैं."

नवाबसाहेब पहातच राहिले. शब्द कानावर आदळले. पण त्यांतला अर्थ बुद्धीला उमजत नव्हता–पटत नव्हता. " बिचारी राजलक्ष्मी की हालत बडी खराब हो गयी है. चार दिनसे खाना, पीना सब छोड दिया है. "

नवाबसाहेब ताडकन् उठले. उभ्या जिन्दगींत आज प्रथमच नवाबशाही पोशाख न चढवतां नुसत्या खमीजवर ते महालाच्या पायऱ्या उतरले. बेगमसाहिबा कांहीं बोलण्यापूर्वीच त्यांची गाडी कमानी दरवाजाबाहेर पडली आणि भर वेगांत दोन चार वळणं घेऊन ' किसनमहाल ' पुढें थडकली. घरची कळा अंगण सांगतं म्हणतात–गाडींतून उतरतांच बेगमसाहिबांच्या धांवत्या शब्दांतला अर्थ नवाबसाहेबांना पुरता उमगला. लवून मुजरा करणाऱ्या दरवानाच्या भकास चेहेऱ्याकडे नजर जातांच त्यांचा स्वतःच्या कानांवर विश्वास बसला.

मधल्या दिवाणखान्यांत दायीबरोबर खेळणाऱ्या रायबहादूरच्या छोट्या मनोहरला त्यांनीं पटकन् उचलून घेतलें. नवाबसाहेब आल्याची वर्दी देण्यासाठीं दायी आंत गेली आणि एकदोन क्षणांतच राजलक्ष्मी रडलेल्या

निर्जीव हातानं डोईवरचा पदर सांवरीत नवाबसाहेबांपुढें हजर झाली. नवाबसाहेब गोंधळले. आपल्यापुढें राजलक्ष्मी बसणार नाहीं ह्याची अंतर्यामीं पुरेपूर खात्री असूनही ते उगाच बोलून गेले, "बैठो भाभीजान."

राजलक्ष्मी स्तब्ध उभी होती. फक्त एकदांच नवाबसाहेबांनीं मान वर उचलून पाहिलं. देखाव्यांवरल्या त्या मराठमोळ्या अस्सल सौंदर्याची पुरती वाताहत झाली होती. स्त्रीच्या जीवनांत पुरुषाची मोहब्बत म्हणजे क्या चीज है ह्याचा प्रत्यक्ष पुरावा त्या कणखर मनाच्या पुरुषाला इतक्या प्रखरतेनं आज प्रथमच मिळत होता.

कोणीच कांहीं बोलत नव्हतं. सांगण्यासारखं कांहीं उरलंही नव्हतं. छोटा मनोहर नवाबसाहेबांच्या मांडीवरून खालीं उतरला आणि आईच्या पायाला बिलगला—"चाचा, मा लोती है."

नवाबसाहेबांनीं कसलीच हालचाल केली नाहीं. खालीं पसरलेल्या गालिच्यावरचा कश्मीरी कशीदा ते उगाचच पहात राहिले. दबलेला हुंदका उसळी मारून बाहेर पडला. राजलक्ष्मीच्या बदामी डोळ्यांतून टपोरे अश्रुबिंदू ओघळूं लागले. नवाबसाहेब उठले. एका झेपेंत आपल्या बेटा मुन्वरला हातावर घेऊन तीरासारखे बाहेर धांवले. दुप्पट वेगानं रस्त्याची वळणं घेत त्यांची गाडी जोराचा ब्रेक लागून मुन्नीच्या घरासमोर उभी राहिली.

बाई जहनबाई लगबगीनं पुढें आली. तिचा कुर्निसाद न स्वीकारतांच त्यांनीं सवाल केला—

"किधर है ?"

जहनबाईची नजर वर वळली आणि तोंडून शब्द उमटण्यापूर्वींच नवाबसाहेब जिन्याच्या पायऱ्या चढून वर गेले—लोडाला टेंकून मोठ्या आरामांत बसलेल्या रायबहाद्दर दलपतरायपुढें उभे ठाकले. पानाला चुना लावतां लावतां मुन्नी पडद्याआड धांवली.

दोघां दोस्तांनीं एकदां परस्परांना नीट निरखून घेतलं. अंगांत नुसती खमीज पहातांच दौलतरायना प्रसंगाची पुरती ओळख पटली. प्रतिकारासाठीं मनाची तयारी होण्यापूर्वींच पहिला हादरा बसला—

"दलपत—".

शब्द एकच खरा पण त्यानं आपलं काम चोख बजावलं. रायबहाद्दर सारखा पोलादी पुरुष नुसता शहारून उठला.

नवाबसाहेबांच्या तोंडून उभ्या जिंदगींत तें नांव पुन्हा दुसऱ्यांद निनादलं—

"दलपत."

"आज मैं आपके वहाँ आनेवाला थाँ.

"किसलिये ? शरम नहीं आती ?"

रायबहाद्दर दलपतराय कांहीं मेलेल्या आईचं दूध प्याले नव्हते ! त्यांच्याही नसनसांतून गरम रक्त वहात होतं.

"मुँह सम्हालो."

आतां मात्र लढाईला चांगलंच तोंड लागलं. दोघेही एकमेकांवर तुटून पडले. शब्दांच्या नुसत्या ठिणग्या उडूं लागल्या.

दोघे जिवलग मित्र खरे पण मस्करींत देखील त्यांनीं एकमेकांना कधीं एकेरी नांवानं हांक दिली नव्हती आणि आज ते एकमेकांच्या बापजाद्यावर घसरले होते. चवताळलेल्या वाघाच्या कुशींत हरणाच्या पाडसांप्रमाणं दडलेल्या दलपतच्या मनोहरला खालीं आदळून नवाबसाहेब गरजले—

"पहेले तेरे खानदान को खतम कर और फिर इस—इस ×× को अपने महलमे बडे खुशीसे ले जा. कसम है तेरे खानदानकी—ले कत्यार और चलाव अपने अवलादपे—"

आणि तोंच दारावरचा पडदा मागें टाकून मुन्नी त्या दोघांमध्यें येऊन उभी राहिली. दलपतरायच्या मनोहरला—नवाबसाहेबांच्या मुन्वरला—उचलून तिनें छातीशीं घट्ट धरलें—"मेरे लिये—दो दमडी औरतके लिये ?"

ती नखशिकान्त थरथरत होती—

"देखिये नवाबसाहिब, मेरे बच्चेकी—मेरे लालकी—मेरे खुदाकी कसम लेके कहती हूँ मै रायबहाद्दरके खानदानकी इज्जत मिट्टीमें नहीं मिला दूँगी. मेरी गर्दन छाट ली तो भी मैं उनके महलमें पाँव नहीं रखूंगी—"

बिजलीप्रमाणें ती बाहेर आली तशीच वादळी वाऱ्याप्रमाणे पुन्हा पडद्याआड निघून गेली.

झिन्नतमहालकडे परत जातांना विचारचक्र जोरांत फिरूं लागलं. नवाबसाहेबांनीं गाडीचा वेग कमी केला आणि मग हृदयाच्या तबकडीवर तेच शब्द संथपणें गिरक्या घेऊं लागले—

"मेरे बच्चेकी कसम—मेरे लालकी कसम—"

आणि आपल्या 'लालकी कसम' मुन्नीन जिन्दगींत मोडली नाहीं.

पडद्याआड वावरणाऱ्या मुन्नीनं आपल्या मोहब्बतीचं उघड प्रदर्शन कधींच केलं नाहीं. पांढऱ्या शुभ्र धुतलेल्या वस्त्रावर स्वच्छ पाण्याचा डाग देखील उठून दिसतो ह्याची सतत जाणीव ठेवून मुन्नीनं दलपतरायच्या चरणीं सर्वस्वाचं दान केलं. रायबहाद्दरांच्या 'किसानमहाल' कडे उभ्या आयुष्यांत ती कधीं वळली नाहीं.

आणि एकमेकांची पुरती जानपछान होण्यापूर्वींच खेळ खतम झाला. एकाएकीं छावींत कळ आली; रायबहाद्दरांना मुन्नीची आठवण येण्यापूर्वींच काळानं आपला डाव साधून घेतला.

रायबहाद्दरांच्या अवघ्या दोनच वर्षांच्या सहवासांत रंगलेलीं, रसरसलेलीं हिरवीगार पानं मुन्नीनं आपल्या हृदयमहालांत जीवापलीकडे जतन केलीं. त्याला जुनेपणाची छाया पडूं दिली नाहीं.

कारंजीत मधोमध असलेल्या संगमरवरी पुतळ्याप्रमाणें मनोहर बसला होता. नवाबसाहेब उठले. मनोहरचा हात पकडून त्याला उभा केला—

"चलो बेटा, मैं तुझे छोडके आता हूँ."

मुन्नीबाईला सोडून परत आलेल्या गाडींत त्यांनीं आपल्या मुन्वरला चढवलं आणि मग संथवेगांत खूप दूरच्या वाटेनं जाऊन त्यांनीं किसन-महालपुढें गाडी उभी केली.

कळसूत्री बाहुलीप्रमाणें मनोहर खालीं उतरला. आपल्या चाचाला सलाम न करतां—मागें वळून न पहातां तो सरळ पायऱ्या चढून वर गेला आणि दरवाजासमोर टांगलेल्या त्या भव्य छायाचित्रावर नजर जातांच तो जागच्या जागीं थबकला. विस्तीर्ण ललाटप्रदेश—आत्मविश्वासानं घट्ट मिटलेले ओठ—करारी नजर आणि तो बेमुरव्वत चेहेरा! बापलेकांच्या चेहेऱ्यांत विलक्षण साम्य होतें पण वृत्तींत स्वभावांत केवढी तफावत!

मनोहरनं खालचा ओठ दाताखालीं जोरानें दाबला. पश्चात्तापाची आंच लागतांच आलेली बधिरता वितळूं लागली. कानशिलं तापून लाल झालीं. आतां त्याला फिरून एकदां मुन्नीबाईची नजर आठवली. तो हादरा जाणवला. हृदय कांपत जाणारी ती तीक्ष्ण धारदार पण वैभवशाली वाणी मस्तकांत घुमूं लागली—

उन्हींके तुम औलाद हो—'

जोमदार भावनांच्या आवेगानं वहाणाऱ्या अश्रूंना मनोहरनं अडविण्याचा इतकासुद्धां प्रयत्न केला नाहीं.

आणि दुसऱ्या एका नव्या दिवसाची सुरुवात झाली. खालीं पोर्चमध्यें भर वेगांत आणलेल्या पॅकार्डला इतक्या जोराचा ब्रेक लागला कीं, नबाबसाहेबांनीं हातांतला उर्दू अखबार बाजूला टाकला. कपाळावर मधोमध आंठी पडली. अनेक वेळां सामोपचारानें सांगूनही सलीमच्या गाडीचा वेग कांहीं मंदावत नव्हता आणि आज तर...छे! त्याची एकदां चांगलीच खबर घेतली पाहिजे ह्या विचारानें नबाबसाहेब आरामखुर्चीतून उठले आणि सलीम धापा टाकीत त्यांच्यापुढें हजर झाला—

"अब्बाजान—अब्बाजान—"

"क्या बात है?"

नबाबसाहेबांच्या धीरगंभीर वाणीला चढलेली रुक्षतेची धार जाणवतांच सलीमची गोंधळलेली मनःस्थिति बरीचशी ताळ्यावर आली आणि आतां त्याला सरळ अब्बाजानकडे धांव घेण्यांत चूक झाल्याची जाणीव बोचूं लागली. सलीमच्या नजरेंत ती जाणीव उमटतांच नबाबसाहेबांच्या आवाजांत नकळत मृदुता आली.

"क्या बात है बेटा?"

आतां सलीमला थोडासा धीर वाटला—

"अब्बाजान, आपके मुन्वरनें—मुन्वरनें—"

"क्या किया मुन्वरनें?"

आणि मग एका दमांत सलीम बोलून गेला—

"मुन्वर मुन्नीबाईको महलमे ले आया है—"

"क्या--क्या कहा? पागल तो नहीं हो गया तू?"

"जी नहीं. मैं—मैं—खुद—खुद—"

आणि मग सलीम शब्दाशब्दाला अडखळूं लागला. ओटांची उगाचच चाळवाचाळव करूं लागला. त्या तुटक वाक्यांतून—अडखळत्या शब्दांतून—ओटाच्या चाळवाचाळवींतून—ओबळत्या शब्दांचा नबाबसाहेबांना अर्थ लागला—

मुन्नीबाई महालांत यायला तयार नव्हती पण तो पागल मुन्वर तिच्या दाराशीं धरणं धरून उभा राहिला—सारी रात्र त्यानें तिथें काढली आणि अखेरीस मुन्नीबाईनं हार खाल्ली. ती मुन्वरबरोबर किसनमहालांत आली तेव्हां गजलक्ष्मी दारांतच उभी होती. दोघींनीं एकमेकींना निरखलं आणि मग पहिलीनं दुसरीला घट्ट मिठी मारली. गळ्यांत गळा घालून दोघी कितीतरी वेळ रडत होत्या. एखाद्या पत्थराप्रमाणें मुन्वर सारं पहात उभा होता. दाराआड उभी असलेली मुन्वरची औरत डोळे पुशीत आंत निघून गेली.

खुर्चीच्या लाकडी हातावर नबाबसाहेबांच्या हाताची पकड घट्ट बसली—लगेच दुसऱ्या क्षणीं सैल पडली. त्यांची मान उंचावली. मुद्रा प्रसन्नतेनं उजळून निघाली. जरा कुठं चक्रव्यूहांतून बाहेर पडून पहातात सलीम फिरून गोंधळला—गडबडला आणि नग आवाज चढविण्याचा निष्फळ प्रयत्न करीत तो बरळू लागला.

"कितनी शरमकी बात! मुन्वर हैवान है. जानवर है."

संथपणें नबाबसाहेब उठले. दुसऱ्या दालनांत निघून गेले. त्यांच्या पाठमोऱ्या भव्य आकृतीकडे पहात सलीमनें खांदे उडविले आणि मग ओटांची उगाचच चाळवाचाळव करीत तो निमूटपणें खालीं निघून गेला.

बाहेर जाण्यासाठीं कपडे चढवून जेव्हां नबाबसाहेब खालीं आले तेव्हां सलीमपुढें आपल्या तकदीरला हात लावून बसलेल्या बेगमसाहेबांकडे पहातांच त्यांना हंसूं आलं. कोसळलेल्या साऱ्या जगाचा भार माथीं घेऊन बेगमसाहेबांनीं जड आवाजांत विचारलं—

"कहाँ जा रहे हो?"

हलक्याफुलक्या आवाजांत नबाबसाहेबांनीं उत्तर दिलं—

"किसनमहलमे."

"जानेकी कुछ जरूरत नहीं है. वो हैवान है. जानवर है. आदमी नहीं है."

"हाँ. सच कह रही हो. वो आदमी नहीं है, इसलिये तो जा रहा हूं."

आणि हातांतली काठी फिरवीत मोठ्या रुबाबांत हलकीं पावलं टाकीत नबाबसाहेबांना जातांना पाहून बेगम साहिबांनीं दुसराही हात कपाळावर मारून घेतला!

काळ धांवतो आहे. सारखा धांवतो आहे. नबाबसाहेब, मुन्वर, मुन्नी, सलीम सर्वांना बरोबर घेऊन धांवतो आहे.

अधून मधून एखादे बुड्ढे मियाँ बेवकुफ मुन्वर को—देखकर 'नबाब' साहेबांच्या कानाशीं लागतात—

"छा! छा! कितनी शरमकी बात! हैवान! जानवर!" नबाबसाहेबांची नजर आकसते. उजवी भुवई किंचित् वर चढते आणि मग ते हंसूं लागतात—दिलखुलास हंसूं लागतात.

लग्नसराईतल्या मैफलींत एखादा पंचरंगी रायबहादूर मनोहरकडे पाहून एखाद्या दिवाणाला नाहीं तर नबाबाला हळूच कोपरखळी देत छद्मी हंसतो—

"छी! छी!! प्रत्यक्ष बापानं ठेवलेली बाई आणि तिच्याशीं...च्छा! पशू—निव्वळ पशू!!"

आणि मग एखादे वेळीं किसनमहालच्या पायऱ्या चढतांना बेगम मुन्वरच्या औरतची मस्करी करण्याची नबाबसाहेबांना हुक्की येते. दरवाजांतूनच ते मिस्कील खड्या आवाजांत विचारतात—

"अरे बेटी, कहाँ गया तेरा पशू?"

पडद्याआड अनुराधा हंसते. गोड गोड हंसते. तोंड भरून हंसते.



## मिनार मक्केच्या मशिदीचे

पिवळी वाळू... भुरकट वाळू
सोनवाळुच्या असीम लाटा
डोंईवरती शाल निळीची
सोनवाळुंतिल पाउलवाटा
            धुकें भवाचें गड पिऊनी
            निघे आमुचा गुंड काफिला
            दहा दिशांच्या अनन्त व्योमीं
            जीवनपथ आमुचा हरवला
जवळ आमुच्या एक सुरई अन्
सफेत किनखापी तंबूच्या
जवळ आमुच्या उमदें जीवन
श्वेत ध्वजा सर्वेक्षतेच्या
            उठलीं वाळूवरी पाऊलें
            पूर्वयुगींच्या सहकाऱ्यांचे।
            ऐकुन त्यांची निगूढ परवल
            वाट शोधतों आम्ही अमुची
सुक्या खारका क्षुधा लागतां
मृगजळ ओलें तृष्णा येतां
पाठीवरचीं घरें घट्ट अन्
खडी रहातीं वादळ येतां
            क्षणांत आतां बुरखो काळा
            रजनी घेईल नक्षत्रांचा
            समद् ध्रुवाची, निरामयाची
            दाविल आम्हां मार्ग आमुचा
मग उंटांच्या पाठीवरचा
गुंड काफिला गजल गाइल
मिनार मक्केच्या मशिदीचे
अनजानांनीं निरन्त घुमातिल

—सदानन्द रेगे



अनुक्रमणिका

# अरसिक कवींना आणि रसिक शास्त्रज्ञांना एक न सुटलेलें कोडें होऊन राहिलेली वाकणारी भिंत !



**म... भा. भू. जगन्नाथ रघुनाथ आजगांवकर**

'अलौकिक चमत्कार' हा एक असा विषय आहे कीं त्याच्यासंबंधाचा वाद कदाचित् जगाच्या अंतापर्यंतही संपणार नाहीं. अलौकिक चमत्कार शक्य आहेत व ते घडतात असें म्हणणारा एक, आणि ते अशक्य आहेत व कधींच घडत नाहींत असें म्हणणारा दुसरा, असे दोन पक्ष जोंपर्यंत अस्तित्वांत आहेत तोंपर्यंत हा वाद असाच चालू रहाणार. परंतु डोकें ठिकाणावर ठेवून, कोणत्याही अभिनिवेशाच्या आहारीं न जातां, अगदीं खुल्या दिलानें, जर या विषयाचा विचार केला तर जगांत आजपर्यंत होऊन गेलेले धर्मसंस्थापक, सिद्धपुरुष, साधुसंत आणि योगी यांच्या हातून [illegible]लेल्या ज्या अलौकिक चमत्कारांच्या कथा प्रचलित आहेत त्या सर्वांच्या सर्व अगदीं खोट्या आणि बनावट आहेत असें छातीठोकपणें म्हणण्याचें धाष्ट्र्य सहसा कोणासही होणार नाहीं असें वाटतें. मनुष्यप्राण्याच्या वांट्यास आलेली बुद्धिमत्ता खरोखरच इतकी सर्वगामी आणि सर्वाकलनशील आहे काय कीं विश्वांत घडणाऱ्या प्रत्येक गोष्टीचा उलगडा ती समाधानकारक रीतीनें करूं शकेल? बुद्धिप्रामाण्यवादी लोकांनीं केवढेंही अकांडतांडव केलें तरी येवढी गोष्ट त्यांनीं पक्की लक्ष्यांत ठेवावी कीं केवढाही बुद्धिमान् पुरुष असला तरी त्याच्या बुद्धिमत्तेस मर्यादा ही आहेच. अशा स्थितींत, कांहीं गोष्टी आपणास अगम्य, अशक्य किंवा अनृत वाटतात म्हणून त्या खरोखरच तशा असल्या पाहिजेत असा अट्टाहास करीत बसणें म्हणजे ज्ञानाचें एक दालन स्वतःपुरतें कायमचेंच बंद करून घेणें होय. आणि ही प्रवृत्ति शोधकतेस मोठी विघातक आहे. ज्या पाश्चात्यांचें अनुकरण इतर पुष्कळ बाबतींत आपण केलें आहे त्यांचेंच अनुकरण या संशोधनाच्या बाबतींतही आपण केलें पाहिजे. अलौकिक चमत्कारांच्या खरेखोटेपणाविषयीं चर्चा करणारे इतके ग्रंथ आंग्ल वाङ्मयांत झाले आहेत कीं ते पाहून मन थक्क होतें. "सब झूट" असें म्हणून पाश्चात्य लोक कोणतीही गोष्ट दुर्लक्षित करणार नाहींत, तर त्या गोष्टीचें पूर्ण संशोधन करून, तिच्या सत्यासत्यतेविषयींचे अनुकूल प्रतिकूल पुरावे पाहून, नंतर त्या संबंधानें आपलें अनुकूल किंवा प्रतिकूल मत जाहीर करतील. पाश्चात्यांची ही ज्ञानपिपासा आणि तज्जन्य शोधकता अत्यंत प्रशंसनीय आहे. तेव्हां आतां त्यांच्यांतले व आमच्यांतले कांहीं थोर विद्वान् या संबन्धानें काय म्हणतात तें आपण पाहूं.

एक मोठे जगन्मान्य विज्ञानी (scientist) सर अँब्रोज फ्लेमिंग यांनीं १९३५ सालीं, "व्हिक्टोरिआ इन्स्टिट्यूट ऑफ फिलॉसफी ऑफ ग्रेट ब्रिटन" या संस्थेंत अध्यक्ष या नात्यानें जें भाषण केलें त्यांत येशू ख्रिस्ताच्या दैवी चमत्कारांविषयीं ते म्हणाले. "We cannot reasonably dismiss as simple legend and myth the accounts of the power of the historical Jesus Christ to create instantly shoals of fish in a lake where no fish were found just before, or to create bread and fish instantly to feed large multitudes, or to create wine out of water at a word, or raise dead human beings to life, seeming that the evidence is overwhelming that He Himself was raised to life again, as He had predicted, three days after He had most assuredly suffered physical death of the body by crucifixion.

"We have no right to assert that these statements are fictitious unless we have most carefully examined the evidence and found it certainly invalid. Those who have done so are agreed that the





अनुक्रमणिका

bodily resurrection of Christ is one of the most certainly attested facts in human history. But, if so, it certifies all previous Biblical miracles, and it was unquestionably predicted in prophecy which is a continual miracle."

सर अँम्ब्रोज फ्लेमिंगसारख्या जगद्विख्यात शास्त्रज्ञांचें हें मत आहे; पांगारकरांचें किंवा आजगांवकरांचें नव्हे, हें कृपा करून वाचकांनीं लक्षांत ठेवावें. मात्र यावर कोणी असा आक्षेप घेऊं शकेल, कीं सर अँम्ब्रोज यांच्या तोडीच्या दुसऱ्या एखाद्या शास्त्रज्ञांचें मत कदाचित् याच्या उलटही असूं शकेल. तर या आक्षेपाचें खंडन करणें सोपें नाहीं हें मी कबूल करतों; परंतु त्याबरोबर हेंही सांगतों कीं या विषयाच्या दोन बाजू आहेत येवढें जरी यावरून सिद्ध झालें तरी तें कांहीं थोडें नाहीं. सुमारें १५० वर्षांपूर्वी गुर्लहोसूर येथें होऊन गेलेले सिद्धपुरुष चिदंबर दीक्षित यांच्या अलौकिक चमत्कारांविषयीं कै. न्या. रानडे यांच्यासारख्या बुद्धिप्रामाण्यवादी पुरुषानें असें म्हटलें आहे कीं "या चमत्कारांपैकीं कोहीं चमत्कार खरोखरच घडलेले आहेत यांत शंका नाहीं; आतां ते कसे काय घडले असतील, याचा उलगडा करण्याचें काम संशोधकांचें आहे."

'बुद्धलीलासारसंग्रह' या प्रो. कोसंबी यांच्या ग्रंथाच्या प्रस्तावनेंत डॉ. सर रामकृष्ण भांडारकर हे दुसरे महाविद्वान् बुद्धिप्रामाण्यवादी गृहस्थ म्हणतात, "कोणत्याही धर्माचे प्रवर्तक आणि तत्संबंधानें प्रसिद्धीस आलेले साधुसंत यांनीं केलेल्या अद्भुत चमत्कारांविषयींच्या कथा त्यांच्या अनुयायांत प्रचलित असतात, त्यांचा सर्वथा परित्याग करितां नये. कां कीं त्यांत कधीं कधीं तथ्याचा अंश असतो." इंग्लंडांतील फिशर अन्विन नामक ग्रंथप्रकाशकानें प्रसिद्ध केलेला Clairvoyance and materialisation या ग्रंथांत अलौकिक चमत्कारांच्या अनेक कथा भरपूर व विश्वसनीय सुगव्यानिशीं दिल्या आहेत. त्यांत पोलंडमधील एका इंजिनियरानें एक भारी वजनाचा संगमरवरी दगडाचा पुतळा, आपल्या इच्छाशक्तीनें, कित्येक फूट चालवून दाखविल्याची एक कथा आहे. ज्याची बिलकुल आध्यात्मिक उन्नति झालेली नाहीं असा एक सामान्य मनुष्य केवळ आपल्या इच्छाशक्तीनें जर असला चमत्कार करून दाखवूं शकतो तर आमच्या ज्ञानदेवमहाराजांसारख्या भगवत्कृपासंपन्न पुरुषानें भिंत चालवून दाखविल्याची गोष्ट खोटी मानण्याचें काय कारण? १९०७ सालीं मालेगांव येथील एका जैन यतींनीं तेथील सुशिक्षित लोकांसमोर कांहीं अलौकिक चमत्कार करून दाखविले होते त्यांची हकीकत, नास्तिक म्हणूनि प्रसिद्ध असलेले, अहमदनगरचे वकील कै. बळवंत बाबाजी देशपांडे, बी. ए. एल एल. बी. यांनीं पुण्याच्या 'सुधारक' पत्रांत प्रसिद्ध केली होती. (पहा सुधारक ता. १० मे १९०७ आणि ता. ३ जून १९०७) दगडाचा पाट अधांतरीं ठेवणें, टेबल चालविणें, चौरंगाकडून छत्री आणविणें व दोन गावांमधील अंतर टोके मारून वदविणें इत्यादि चमत्कार सदर जैन यतींनीं, कोणत्याही वस्तूस स्वतः हात न लावतां, केवळ इच्छाशक्तीनें करून दाखविले होते. १९२७ च्या मार्च महिन्यांत, मुंबईनजीक खार येथें शेट बालकिसनदास यांच्या घरीं श्रीदेवजी महाराज या नांवाचे एक योगी आले होते ते योगबलानें आपला देह आकुंचित करितां करितां अकस्मात् अदृश्य होत असत व हा चमत्कार खार येथील एका गुजराथी गृहस्थांनीं, प्रत्यक्ष आपल्या डोळ्यांनीं पाहून, 'बॉम्बे क्रॉनिकल' पत्रांत प्रसिद्ध केला होता. समाधि लावून, कित्येक दिवस स्वतःस जमिनींत पुरून घेणाऱ्या योग्यांच्या गोष्टी तर वर्तमानपत्रांत आपण नेहमींच वाचीत असतों. असो. अलौकिक चमत्कारांच्या शक्यतेविषयीं व सत्यतेविषयीं असे शेंकडों पुरावे देतां येतील, परंतु विस्तारभयास्तव, अर्वाचीन पद्धतीनें शिकलेल्या आंग्लविद्याविभूषितांनीं लिहिलेलें भगवान् रामकृष्ण परमहंस यांचें एकच चरित्र जरी संशयात्म्यांनीं वाचलें तरी त्यांची संशयनिवृत्ति होईल इतकें सांगून पुढें वळतों.

## अद्भुत चमत्कारांचे प्रकार

१ जन्मादारभ्य ज्यांना सिद्धि प्राप्त झाल्या होत्या अशा पुरुषांनीं केलेले चमत्कार—उदाहरणार्थ, श्रीकृष्ण, येशू ख्रिस्त, ज्ञानदेव, चिदंबर दीक्षित.

२ सिद्ध पुरुषांचे चमत्कार—उदाहरणार्थ, अक्कलकोटचे स्वामी, माणिक प्रभु, कोल्हापूरचे कुंभारस्वामी.

३ योग्यांचे चमत्कार—चांगदेव, नृसिंह सरस्वती, [illegible] स्वामी.

५ देवानें भक्तांसाटीं करून दाखविलेले चमत्कार—उदा: तुकोबांच्या अभंगांच्या वह्या इंद्रायणींत तरणें, मेलेलें मूल जिवंत होणें इ.

६ भानामती तंत्र (ब्लॅक मॅजिक्)—मूट मारणें, अंगावर विंच्याच्या फुल्या उटणें, डोळ्यांत काजळ येणें वगैरे.

७ पिशाच्चकृत चमत्कार.

८ मोहिनी विद्या (मेस्मेरिझम)

९ जादूचे चमत्कार.

१० मंत्रविद्येचे चमत्कार.

हे अद्भूत चमत्कार करून दाखविण्याचें सामर्थ्य कांहीं व्यक्तींस कसें प्राप्त होत असतें याचा थोडासा विचार करूं. साधुसंत हे अनंताच्या निदिध्यासामुळें त्याच्याशीं जसजसे साधर्म्य पावूं लागतात तसतशी त्या अनंताची 'कर्तुमकर्तुं अन्यथा कर्तुं' ही शक्ति अंशतः त्यांच्या अंगीं येऊं लागते. लोहचुंबकानें आकर्षिलेला लोहखंड जसा दुसऱ्या लोहखंडास आकर्षूं शकतो, तसाच हा प्रकार आहे. शिवाय योगी आणि सिद्ध पुरुष यांस ज्या योगबलानें हें सामर्थ्य प्राप्त होतें असतें तो योग म्हणजे एक शास्त्रच असल्यामुळें यांत अशास्त्रीय किंवा अनैसर्गिक असें कांहीं नाहीं. ज्ञानेश्वरीच्या सहाव्या अध्यायांत, योग्यास प्राप्त होणाऱ्या सिद्धींचें ज्ञानेश्वर महाराजांनीं वर्णन केलें आहे:—

> आइकें देह होय सोनियाचें।
> पारि लाघव ये वायूचें।
> जें आप आणि पृथ्वीचें। अंशु नाहीं॥
> मग समुद्रापैलीकडील देखे।
> स्वर्गींचा आलोचु आइके।
> मनोगत वोळखे। मुंगियेचें॥
> पवनाचा वारिका वळघे।
> चाले तरी उदकीं पाऊल न लागे।
> येणें येणें प्रसंगें। येती बहुता सिद्धि॥

जडाला सचेतन करणें, परकायाप्रवेश, दिव्यदृष्टि प्राप्त होणें, भूत-भविष्यज्ञान, या सर्व गोष्टी योगानेंच साध्य होतात. पातंजल योगशास्त्र, हठयोगप्रदीपिका, एकनाथी भागवत वगैरे ग्रंथांतही या सिद्धींचें सविस्तर वर्णन केलेलें आहे. आतां, अद्भुत चमत्कारांचे जे दहा प्रकार पूर्वीं सांगितले त्यांचीं पुराव्यानें सिद्ध झालेलीं कांहीं उदाहरणें येथें देतों.

१ जन्मतःच ज्यांना सिद्धि प्राप्त झाल्या होत्या असे येशु ख्रिस्तासारखे पुरुष हे पूर्वजन्मींचे योगभ्रष्ट पुरुष होत. भगवद्गीतेच्या सहाव्या अध्यायांत अर्जुन श्रीकृष्णास विचारतो:—

> अयति: श्रद्धयोपेतो योगाच्चलितमानसः।
> अप्राप्य योगसंसिद्धिं कां गतिं कृष्ण
> गच्छति॥ ३७॥

योगाभ्यास करीत असतां आत्मसिद्धि झाली नाहीं आणि आयुष्य संपल्यामुळें मृत्यु आला. अशा स्थितींत, केलेला खटाटोप फुकट गेला काय? यावर भगवान् म्हणाले, "अर्जुना योग-

च्युत मनुष्याचा योगसिद्धीचा प्रयत्न फुकट जात नाहीं.

> जयाच्या कुळीं चिंता।
> जाली ईश्वराची पतिव्रता।
> जयातें गृहदेवता। आदि सिद्धि ॥
> ऐसी निजपुण्याची जोडी।
> वाढिन्नली सर्व सुखाची कुळवाडी।
> तिये जन्मे तो सुरवाडीं। योगच्युतु ॥
> अथवा ज्ञानाग्निहोत्रीं।
> जे परब्रह्म श्रोत्री।
> महासुखक्षेत्रीं। आदिवंत ॥
> जे सिद्धांताचिया सिंहासनीं।
> राज्य करिती त्रिभुवनीं।
> जे कूजती कोकिल वनीं। संतोषाच्या ॥
> जे विवेकद्रुमाचे मुळीं।
> बैसले आहाति नित्यफळीं।
> तयां योगियांचिया कुळीं। जन्म पावे ॥
> मोटकी देहाकृति उमटे।
> आणि निजज्ञानाची पाहांट फुटे।
> सूर्यापुढें प्रगटे। प्रकाशु जैसा ॥
> तैसी दशेची वाट न पाहतां।
> वयसेचिया गांवा न येतां।
> बाळपणींच सर्वज्ञता। वरी तयातें ॥
> तिये सिद्धप्रज्ञेचेनि लाभें।
> मनचि सारस्वतें दुभे।
> मग सकळ शास्त्रें स्वयंभें। निघती मुखें ॥
>
> —ज्ञानेश्वरी

कांहीं व्यक्तींस अगदीं बालपणींच अनेक विद्या कशा त्वरित अवगत होतात याचा उलगडा यावरून होतो. येशू ख्रिस्त हा कांहीं फारसा शिकलेला नव्हता किंवा त्यानें कांहीं योगसाधनही केलें नव्हतें, असें असतां त्यानें जें ज्ञान प्रसृत केलें आणि जे अलौकिक चमत्कार करून दाखविले तें सर्व त्यानें पूर्वजन्मसंसिद्ध योगबलानेंच केलें हें उघड आहे. ज्ञानेश्वरीसारखा सर्वश्रेष्ठ ग्रंथ लिहिण्यास ज्या विद्वत्तेची आणि प्रतिभेची आवश्यकता होती ती विद्वत्ता आणि ती प्रतिभा, येवढ्या अल्प वयांत आणि अत्यंत प्रतिकूल परिस्थितींत ज्ञानदेवमहाराजांनीं केव्हां आणि कशी संपादन केली ? अर्थात् त्यांच्या पूर्वजन्मांतील असिद्ध योगसाधनाचें तें फल होतें हें उघडच आहे. कर्नाटकांत दीडशें वर्षांपूर्वी होऊन गेलेले चिदंबर दीक्षित हे लहान असतां, त्यांच्या वडिलांनीं त्यांना, एका गृहस्थाच्या घरीं गजगौरीव्रताची पूजा सांगण्यास पाठविलें असतां, त्यांच्या करस्पर्शानें मृत्तिकेचा हत्ती हालचाल करूं लागला अशी कथा आहे. ती खरी मानल्यास, तो चमत्कारही चिदंबर दीक्षित यांस जन्मादारभ्य

प्राप्त झालेल्या योगसिद्धीच्याच परिणाम होय, यांत संशय नाहीं.

**सिद्ध पुरुषांचे चमत्कार**—अक्कलकोटचे स्वामी, माणिक प्रभु, कोल्हापूरचे कुंभारस्वामी वगैरे अर्वाचीन सिद्ध पुरुषांच्या चरित्रांत ज्या अलौकिक चमत्कारांच्या कथा सांगितल्या आहेत त्या सगळ्या बनावट आहेत असें म्हणणें धार्ष्ट्याचें होईल. मी माझा एक अनुभव येथें सांगतों. १८९४ सालीं मी कोल्हापूर येथील न्यू इंग्लिश स्कूलचा विद्यार्थी असतांना, पट्टणकुडीकर आणि मी, असे दोन असामी, एक दोन पैशांचा नारळ घेऊन, कुंभारस्वामींच्या दर्शनास गेलों. 'देव कसा मिळेल ?' हा प्रश्न आम्ही मनांत योजला होता. स्वामीपुढें नारळ ठेवून आणि त्यांना नमस्कार करून आम्ही उभे राहिलों. तेव्हां, आमच्याकडे न पहातां, "देव कसा मिळेल हें विचारावयास पोरें आलीं आहेत," असें म्हणून स्वामी मोठमोठ्यानें हंसावयास लागले. आम्ही लज्जायमान् झालों आणि त्यांना वंदन करून परत गेलों. दत्तगिरि या नांवाचे एक सिद्ध पुरुष माझ्या बालपणीं कोंकणपट्टींत होऊन गेले, ते दत्तोपासक होते. त्यांच्या निकट सान्निध्यांत असलेल्या एका गृहस्थांनीं त्यांच्या अद्भुत चमत्कारांच्या कांहीं कथा सांगितल्या त्यांतल्या एक दोन कथा येथें नमूद करितों. बेळगांव जिल्ह्यांत श्रीपादवाडी येथें दत्तगिरींचें वास्तव्य असतांना एके दिवशीं त्यांनीं आपल्या शिष्यांस सांगितलें कीं "मी या खोलींत महिनाभर समाधिस्थ बसणार आहें. मी समाधि लावली म्हणजे तुम्ही खोलीचें दार बंद करून कुलूप लावा व एका महिन्यानें दार उघडा." त्याप्रमाणें ते समाधि लावून बसतांच शिष्यांनीं दार बंद करून कुलूप लावलें. त्यानंतर सुमारें १५ दिवसांनीं शहापूरचे एक गृहस्थ श्रीपादवाडीस आले. बोलतां बोलतां दत्तगिरिंच्या शिष्यांस ते म्हणाले, "परवां महाराजांचा मुक्काम शहापुरास होता. आम्ही त्यांचें दर्शन घेतलें व प्रसादही घेतला." हें ऐकतांच शिष्य बुचकळ्यांत पडले. ते म्हणाले, "तुम्ही अगदीं भलतेंच कांहीं तरी सांगतां. महाराज या खोलींत समाधि लावून बसले आहेत व बाहेरून कुलूप आहे. अशा स्थितींत ते शहापुरास कसे जातील ?" यावर, त्या गृहस्थांनीं निक्षून सांगितलें कीं, "मी जें बोललों त्यांत एक अक्षरही खोटें नाहीं व खोटें बोलण्याचें मला कांहीं कारणही नाहीं." तेव्हां त्यांच्या सांगण्याचा पडताळा पाहण्यासाठीं शिष्यांनीं कुलूप काढून खोलीचें दार उघडलें आणि पाहतात तों स्वामी आंत समाधि लावून बसलेले आहेत ! पुढें त्यांनीं या गोष्टीविषयीं स्वतंत्र रीतीनें चौकशी केली, तेव्हां दत्तगिरिस्वामी शहापुरास खरोखरच गेले होते व तेथें पुष्कळ लोकांनीं त्यांचें दर्शन घेतलें ही गोष्ट पुराव्यानें सिद्ध झाली. श्रीपादवाडीपासून कांहीं मैल अंतरावरील एका गांवीं यात्रा भरली असतां, श्रीपादवाडीचे बरेच लोक बायकामुलांसह खटाऱ्यांतून यात्रेस जाण्यास निघाले. ज्या गृहस्थांनीं ही माहिती सांगितली ते गृहस्थ व दत्तगिरी पायीं चालत होते. पुढें वाटेंत एक नदी लागली, तिला मोठा पूर आला होता. गाडीवाल्यांस नदींत गाड्या घालण्यास धीर होईना. तेव्हां दत्तगिरी त्यांस म्हणाले, "नदींत गाड्या घाला. घाबरण्याचें कारण नाहीं." गाडीवाल्यांचा स्वामीवर विश्वास असल्यामुळें त्यांनीं बेधडक गाड्या पाण्यांत घातल्या. स्वामी एकाग्रदृष्टीनें गाड्यांकडे पहात होते. शेवटीं मंडळीसह सर्व गाड्यासुखरूपपणें पैलतीरास जाऊन पोंचल्या. एखाद्या गाडींतून आपणही पैलतीरास जावें, अशी, ही गोष्ट सांगण्याऱ्या गृहस्थांची इच्छा होती, परंतु त्यांचा हात धरून स्वामी त्यांस म्हणाले, "थांब, गाड्या पलीकडे गेल्यावर आपण जाऊं." पुढें हे गृहस्थ पाहतात तों स्वामी आपल्या शेजारीं नाहींत ! ते आश्चर्यचकित होऊन इकडेतिकडे पाहूं लागले तों पैलतीरावरून, "अरे, तूं आतां घरीं जा," असे स्वामींचे शब्द त्यांना ऐकूं आले !! निमिषार्धांत स्वामी पैलतीरीं कसे गेले याचा विचार करीत ते गृहस्थ मागें परतले आणि श्रीपादवाडीस आले ! रामकृष्ण परमहंस यांच्या मोठमोठ्या पदवीधर शिष्यांनीं त्यांच्या कांहीं आठवणी लिहिल्या आहेत, त्यांत एम्. ए. ही पदवी धारण करणाऱ्या एका प्राध्यापकानें आपली एक आठवण दिली आहे ती अशीः—रामकृष्ण परमहंस आणि तो प्राध्यापक, एके दिवशीं तारकेश्वराच्या बागेंत फिरत असतां, बागेंतील एका झाडास तांबडीं फुलें आलेलीं त्या प्राध्यापकानें पाहिलीं, तेव्हां तो सहज परमहंसांस म्हणाला, "महाराज, निसर्गाचे नियम इतके अबाधित आहेत कीं या झाडाला तांबडींच फुलें यावयाचीं, इतर रंगाचीं फुलें कधीं येणार नाहींत." यावर परमहंस म्हणाले, "असेंच कांहीं नाहीं, इतर रंगांचीही फुलें येतील." प्राध्यापक मनांतल्या मनांत हंसला आणि स्वस्थ राहिला. दुसरे दिवशीं ते दोघेही त्याच बागेंत फिरावयास निघाले असतां त्या झाडाजवळ आले, तेव्हां परमहंस प्राध्यापकास म्हणाले, "या झाडाला आज कोणत्या रंगाचीं फुलें आलीं आहेत, पहा बरें." प्राध्यापक महाशय पहातात तों सगळें झाड पांढऱ्या रंगाच्या फुलांनीं भरलेलें !

**योग्यांचे चमत्कार**—चांगदेव वाघावर बसत होते आणि हातांत सर्पाचा चाबूक घेत होते, आणि ते चौदाशें वर्षें जगले अशी कथा आहे. परंतु ती फारच अतिशयोक्तिपूर्ण म्हणून आपण सोडून देऊं. परंतु, समाधि लावून सहा महिने जमिनींत पुरून घेणाऱ्या एका योग्याची गोष्ट एका युरोपीयनानें स्वनेत्रांनीं पाहून लिहून ठेवली आहे ती खोटी मानण्याचें कांहीं कारण नाहीं म्हणून ती येथें देतोंः—पंजाबचा शीख राजा रणजितसिंग याच्या दरबारांत एक योगी आला आणि स्वतःस सहा महिनेपर्यंत जमिनींत पुरून घेण्याची आपली इच्छा रणजितसिंगापाशीं त्यानें व्यक्त केली. त्याप्रमाणें, हजारों लोकांदेखत, राजवाड्याच्या पटांगणांत खड्डा खणण्यांत आला व त्यांत तो योगी समाधि लावून बसला. समाधि घेण्यापूर्वीं त्यानें इतकेंच सांगून ठेवलें होतें कीं, सहा महिने पुरे होतांच समाधि उघडा आणि माझ्या अंगास ऊन ऊन भाकरी बांधा, म्हणजे मला चेतना येईल." खड्डा बुजवून तेथें कडक पाहरा ठेवण्यांत आला. सहा महिने पुरे होतांच समाधि उघडून त्या योग्यास बाहेर काढण्यांत आलें. त्या वेळीं तो अचेतन स्थितींत होता. त्यानें सांगून ठेवलें होतें त्याप्रमाणें गरम गरम भाकरी त्याच्या अंगास बांधल्यावर, कांहीं वेळानें तो हालचाल करूं लागला व आणखी कांहीं वेळानें उठून बसला. हल्लीं देखील पुष्कळ योगी हा चमत्कार करून दाखवीत असल्यामुळें लोकांस त्याचें फारसें महत्त्व वाटत नाहीं, उलट त्यांना तो एक कुचेष्टेचा विषय वाटतो; परंतु अन्न, पाणी आणि हवा यांच्या अभावीं सहा महिनेपर्यंत मनुष्य कसा जिवंत राहूं शकतो याचा विचार ते करीत नाहींत. योगसामर्थ्यानें आणि सिद्धींच्या बळावर मनुष्य कोणकोणते चमत्कार करून दाखवूं शकतो हें, पूर्वीं सांगितल्याप्रमाणें, ज्ञानेश्वरी, एकनाथी भागवत वगैरे ग्रंथांत खुलासेवार रीतीनें सांगितलें आहे. माझ्या वाचनांत आलेल्या दोनच चमत्कारांची माहिती येथें देतों. थोड्या वर्षांपूर्वीं पंजाबांतील एका गांवीं कांहीं युरोपीयन लोक शिकारीस गेले होते. शिकार करून परत जातांना त्यांतला एक मनुष्य मागें राहिला व बाकीचे लोक पुढें निघून गेले. मागें राहिलेला मनुष्य एका

अरण्यांतून चालला असतां वाटेंत त्याला एका सर्पानें गांठलें. तो त्याच्यासमोर फणा करून उभा राहिला आणि त्याला पुढें जाऊं देईना. साहेब घाबरला. इतक्यांत, थोड्या अंतरावरून उच्चारलेले 'बेटो, उनकू जाना दो,' असे शब्द त्याच्या कानांत पडले; व त्या क्षणीं, तो सर्प तें ठिकाण सोडून अरण्यांत चालता झाला. हे शब्द कोठून आले आणि ते कोणी उच्चारले हें जाणण्यासाठीं साहेब आजूबाजूस पाहूं लागला, तों सुमारें अर्ध्या फर्लांगावर एक झोंपडींत एका साधु बसलेला त्याला दिसला. तो सरळ त्या साधूकडे गेला आणि त्याला नमस्कार करून उभा राहिला. साधु म्हणाला, "मी इतक्या लांबून साप कसा पाहिला आणि माझे शब्द ऐकतांच तो कसा निघून गेला यांबद्दल तुम्हांस आश्चर्य वाटलें असेल. परंतु यांत आश्चर्य वाटण्यासारखें कांहीं नाहीं. मला जी दिव्यदृष्टि प्राप्त झाली आहे तिच्या योगानें त्रिभुवनांत कोठें काय चाललें आहे हें मला येथें बसून दिसतें. याचा अनुभव तुम्हांस पाहावयाचा असेल तर तुमचा जिच्याशीं संबंध आहे अशी एक गोष्ट तुम्हाला मी सांगतों. तुमच्या भावी पत्नीची आई या वेळीं फार आजारी असून ती या वेळीं अलाहाबाद येथील रुग्णालयांत रुग्णशय्येवर पडून आहे व तुमची भावी पत्नी तिच्या शेजारीं बसली आहे. आणखी एक गोष्ट तुम्हाला सांगतों ती ही कीं कलकत्ता येथील ज्या व्यापारी कंपनींत तुम्ही नोकर आहात त्या कंपनीचा मॅनेजर फार अप्रामाणिक असून, त्यामुळें तो लवकरच गोत्यांत येणार आहे." या दोन्ही गोष्टी ऐकून साहेबास मोठें आश्चर्य वाटलें, विशेषतः मॅनेजरविषयींचें त्या साधूचें बोलणें ऐकून त्याला विशेष आश्चर्य वाटलें, कारण तो फार प्रामाणिक आणि सज्जन आहे अशी त्याची समजूत होती. तो साधूचा निरोप घेऊन निघाला आणि त्यानें पहिल्यानें आपल्या पत्नीला तार केली. थोड्याच वेळानें तिचा उलट जबाब आला कीं, "माझी आई फार आजारी असून ती इस्पितळांत आहे. व मी तिच्याजवळ बसून आहें." अशा रीतीनें, त्या साधूनें सांगितलेल्या एका गोष्टीची सत्यता एकदोन तासांत त्याच्या अनुभवास आली. पुढें थोड्याच दिवसांनीं त्याच्या कंपनीच्या मॅनेजरवर अफरातफरीचा आरोप येऊन त्याला शिक्षा झाली व त्या साधूनें सांगितलेली दुसरी गोष्टही त्याच्या प्रत्ययास आली. त्या साहेबानें आपल्या सहीनें ही हकीकत वर्तमानपत्रांत प्रसिद्ध केली होती ही दिव्यदृष्टि योगाभ्यासानें प्राप्त होते. भारतीय युद्ध चालू असतां, त्या युद्धांत घडणाऱ्या सर्व गोष्टी, रणभूमीपासून दूर अंतरावर बसून संजय धृतराष्ट्रास सांगत होता अशी कथा आहे. त्याला दिव्यदृष्टि प्राप्त झाली होती म्हणूनच तसें करणें त्याला शक्य झालें. परंतु या जुन्या पुराण्या कथा आपण सोडून देऊं आणि येथील कांहीं दैनिकांच्या गेल्या ता. १५ सप्टेंबरच्या अंकांत 'पाणीवाले महाराज' या मथळ्याचा खुद्द हिंदुस्थान सरकारकडून आलेला, एक लेख प्रसिद्ध झालेला आहे त्याचा विचार करूं. हे 'पाणीवाले महाराज' आपल्या योगसामर्थ्याच्या जोरावर, पृथ्वीच्या पोटांतील एक मैल अंतरावरील पाणी पाहूं शकतात. "आत्मिक शक्तीच्या गडबडगुंड्याची थट्टा करण्याची प्रवृत्ति, असलेले 'शास्त्रीय वृत्ती'चे लोकदेखील त्यांचें हें सामर्थ्य पाहून थक्क झाले आहेत." आजपर्यंत कोठें कोठें, किती खोलीवर, पाणी मिळेल म्हणून त्यांनीं सांगितलें व त्याप्रमाणें तें कसें मिळालें याची खुलासेवार हकीकत सदर लेखांत दिली आहे. अगदीं ओसाड आणि निर्जल प्रदेशांतही पाणीवाले महाराजांनीं आपल्या दिव्यदृष्टीनें पाण्याचा शोध लावला आहे व याच कामासाठीं हिंदुस्थान सरकारानें त्यांना हल्लीं नोकरीवर ठेवलें आहे. योगसमर्थांनीं घडलेल्या व घडणाऱ्या चमत्कारांच्या अशा शेंकडो गोष्टी या ठिकाणीं देतां येतील, परंतु विस्तारभयास्तव हात आखडता घेणें भाग आहे.

परकायाप्रवेशविद्या हा योगाच्याच एक प्रकार आहे. त्यासंबंधानें पंजाबांतील, एका पदवीधर गृहस्थांनीं स्वतःच्या अनुभवाची एक गोष्ट एका इंग्रजी मासिकांत प्रसिद्ध केली होती. ती थोडक्यांत येथें सांगतों. सदर पंजाबी गृहस्थ एके दिवशीं गांवाबाहेर फिरावयास गेले असतां, एका चबुतऱ्यावर बसले होते व त्यांच्याजवळच एक जर्जरीभूत झालेला साधु अगोदरच येऊन बसला होता. थोड्या अंतरावर मुसलमानांची स्मशानभूमी होती. कांहीं वेळानें त्या गांवांतील कांहीं मुसलमान लोक एका तरुणाचें प्रेत घेऊन त्या स्मशानभूमींत आले आणि एक खड्डा खणून त्या प्रेतास त्यांनीं दफन केलें. हा प्रकार, तो पंजाबी गृहस्थ आणि तो साधु, दोघेही पहात होते. आलेले मुसलमान परत गेल्यावर तो साधु त्या गृहस्थास म्हणाला, "मी तुम्हाला एक विलक्षण गोष्ट दाखवितों, परंतु एक वर्षपर्यंत ही गोष्ट तुम्ही गुप्त ठेवली पाहिजे." त्या गृहस्थानें तें कबूल केल्यावर तो साधु त्याला म्हणाला, "माझ्या या जर्जर झालेल्या देहाचा मी आतां त्याग करितों आणि

आतांच ज्याचें प्रेत पुरलें आहे त्याच्या देहांत प्रवेश करितों. त्याचें प्रेत उकरून काढण्यास तुम्ही मला मदत करा व मी त्याच्या देहांत प्रवेश केल्यावर माझें कलेवर येथें पडेल तें त्याच खड्ड्यांत ठेवून पुरून टाका." मग त्या दोघांनीं त्या तरुणाचें प्रेत बाहेर काढलें. साधु त्या प्रेताकडे एकाग्र-दृष्टीनें पाहूं लागला. कांहीं वेळानें त्या प्रेताची हालचाल सुरू झाली व इकडे या साधूचा देह प्रेतवत् होऊं लागला. थोड्या वेळानें तें प्रेत जिवंत होऊन उठून बसलें, इतकेंच नव्हे तर उभें राहून त्या गृहस्थाकडे न पाहतां, तेथून निघून गेलें. हा सर्व प्रकार पाहून त्या गृहस्थास वेड लागण्याची पाळी आली. मोठ्या मुष्किलीनें त्यानें आपल्या मनावरील दडपण काढून टाकलें आणि जवळच पडलेलें त्या साधूचें प्रेत त्या खड्ड्यांत ठेवून पुरून टाकलें. तो साधु त्या तरुण मुसलमानाच्या देहानें गांवोगांव भटकत चालला. एके दिवशीं, त्याच गांवचा एक मुसलमान कांहीं कामासाठीं पेशावरला गेला असतां, तेथील एका भटारखान्यांत; त्या मुसलमान तरुणाच्या देहांत प्रवेश केलेल्या त्या साधूला त्यानें पाहिलें. थोड्या दिवसांपूर्वीं जो मृत्यु पावला व ज्याच्या प्रेताचें आपण दफन केलें तो तरुण जिवंत होऊन येथें कसा आला याचें त्याला मोठें कोडें पडलें. त्यानें त्याला त्याच्या नांवानें हाक मारून त्याच्याशीं बोलण्याचा प्रयत्न केला, परंतु तो एक चकारशब्दहि बोलला नाहीं. उलट, त्याच्याकडे न पाहतां उठला आणि चालता झाला. आपल्या गांवीं आल्यावर त्यानें ही हकीकत त्या मुलाच्या बापास सांगितली व थोड्याच वेळांत ती सर्वतोमुखीं झाली. त्या पंजाबी गृहस्थांस जेव्हां हें समजलें तेव्हां त्यानें स्वतः पाहिलेला तो प्रकार एका नियतकालिकांत प्रसिद्ध केला. मंडनमिश्राच्या पत्नीनें विचारलेल्या कामशास्त्रविषयक प्रश्नांचें उत्तर देण्यासाठीं श्रीमच्छंकराचार्यांनीं परकायाप्रवेश केला होता हें वाचकांस ठाऊक असेलच

**देवानें भक्तांसाठीं करून दाखविलेले चमत्कार**—संत जगमित्र नागा याच्यासाठीं देव व्याघ्ररूप धारण करून त्यांच्याबरोबर यवन अधिकाऱ्याच्या घरीं गेला, दामाजीपन्तांनीं लुटविलेल्या धान्याचे पैसे नबाबाकडे जाऊन देवानें भरले. मिराबाईला देण्यांत आलेलें विष देव प्याला, तुकोबांच्या कीर्तनांत आणून ठेवलेलें मृत बालक देवानें जिवंत केलें व बुवांच्या अभंगांच्या वह्या इंद्रायणीच्या डोहांत सुरक्षित ठेवल्या, गोपाळबोध मळगांवकर यांच्या कीर्तनांत देवानें समई चालविली वगैरे चमत्कार या सदरांत येतात.

**भानामती तंत्र**—इंग्रजींत याला 'ब्लॅक मॅजिक्' म्हणतात. अंगावरे बिछान्याच्या फुल्या उठणें, बासनांत ठेवलेल्या कपड्यांपैकीं मधलाच एकादा कपडा जळणें, अंगावरील वस्त्रास अकस्मात् आग लागणें, डोळ्यांत काजळ येणें, एके ठिकाणीं ठेवलेली वस्तु आपोआप दुसऱ्या ठिकाणीं जाणें, अन्नाची विष्ठा होणें, एकादी वस्तु जेथल्या तेथें नाहींशी होणें, वगैरे प्रकार या भानामती तंत्रानें होतात. निजाम हैद्राबाद, येथील हायकोर्टानें भानामती तंत्राचें अस्तित्व कायदेशीर रीतीनें मान्य केलेलें आहे. तिबेटांत व आफ्रिकाखंडांतील कांहीं देशांत या 'ब्लॅक मॅजिक्'चा उपयोग फार मोठ्या प्रमाणावर केला जातो.

**पिशाच्चकृत चमत्कार**— पिशाच्चाचें अस्तित्व न मानणारे कितीही लोक असले तरी पिशाच्चयोनी ही एक योनी आहे यांत काडीमात्र संशय नाहीं. मी स्वतः डोळ्यांनीं पिशाच्च पाहिलें आहे. आमच्या गांवांत, मागासलेल्या वर्गांतील एक बाई होती. कुडाळी भाषा ही तिची जन्मभाषा असतां, पिशाच्चानें झपाटल्यावर, ती अस्खलित उर्दू बोलूं लागली. इंग्रजींत या विषयावर पुष्कळच वाङ्मय निर्माण झालेलें आहे.

**मोहिनी विद्या**—( मेस्मेरिझम ) या विद्येचें अस्तित्व आतां सर्वमान्य झालेलें असल्यामुळें त्यासंबंधानें विशेष कांहीं लिहिण्याची आवश्यकता आहे असें वाटत नाहीं. तथापि एक दोन गोष्टींचा उल्लेख करितों. सुमारें पन्नास वर्षांपूर्वीं मेस्मेरिझमचा प्रयोग करणारे एक बंगाली गृहस्थ मुम्बईंत आले होते व येथें धोबी तलावावरील फ्रामजी कावसजी हॉलमध्यें त्यांनीं आपले प्रयोग करून दाखविले होते. त्यावेळीं मुम्बईंत प्रसिद्ध असलेले एक लॅटिनचे प्राध्यापक प्रेक्षकांत होते. त्यांनीं त्या बंगाली गृहस्थांस, स्वतःवर मोहिनी विद्येचा प्रयोग करण्याचें आव्हान दिलें आणि तें स्वीकारून त्या गृहस्थांनीं प्रोफेसरसाहेबांस नाचावयास लाविलें. सर्व प्रेक्षकांची हंसून हंसून मुरकुंडी वळली. अलीकडेच, मद्रासच्या बाजूस, आगगाडींतून प्रवास करीत असलेल्या एका हिंदु स्त्रीवर, तिच्यासमोर बसलेल्या एका मुसलमानानें मोहिनी विद्येचा प्रयोग केला व त्यामुळें ती स्त्री त्याच्याबरोबर, तो नेईल तिकडे जाऊं लागली अशी सत्यकथा वर्तमानपत्रांत प्रसिद्ध झालेली पुष्कळांच्या अवलोकनांत आली असेल.

**जादूचे चमत्कार**— यांत हातचलाखीचा भाग बराच असतो. शिवाय कांहीं जादुगार मोहिनी विद्येचाही उपयोग करितात. सुमारें ३५ वर्षांपूर्वीं, मी येथील 'इंदुप्रकाश' दैनिकाचा, मराठी बाजूचा संपादक असतांना आमच्या आलिबागच्या बातमीदारानें, तेथें एका जादुगारानें करून दाखविलेल्या कांहीं चमत्कारांचें वर्णन लिहून पाठविलें होतें. त्यांत मामलेदारांच्या सांगण्यावरून सदर जादुगारानें, सरकारी तिजोरींतले स्टँप कागद कसे आणून दाखविले व चालती आगबोट कशी थांबविली हें खुलासेवार रीतीनें लिहिलें होतें. कांहीं वर्षांपूर्वीं मुम्बईंत एक काठेवाडी मुसलमान रहात असे तो चालती आगगाडी थांबवून दाखवीत असे. मुम्बईंतील त्या वेळच्या पुष्कळ लोकांस ही गोष्ट माहित होती.

**मंत्रविद्येचे चमत्कार**—मंत्रविद्या म्हणून एक विद्या आहे व तिच्या जोरावर अनेक चमत्कार करून दाखवितां येतात. या विद्येचें साधन करितांना कांहीं कडक नियम पाळावे लागतात. सर्पाचें विष उतरविणें, सभोंवतीं नुसती मंतरलेली काठी फिरवून सर्पास जागच्या जागीं स्थिर ठेवणें, कांहीं रोग बरे करणें, पिशाच्चबाधा घालविणें वगैरे गोष्टी मंत्रविद्येनें करितां येतात.

अद्‌भुत चमत्कार या विषयावर पुष्कळच लिहितां येण्यासारखें आहे, परंतु प्रस्तुत लेखासाठीं आंखून दिलेल्या पृष्ठसंख्येच्या मर्यादेचें उल्लंघन करणें शक्य नसल्यामुळें येथेंच विराम पावणें भाग आहे.

सुंदर अक्षर कोणतें ? अक्षरें हीं तरुणीच्या कुचाप्रमाणें सारख्या उंचीची, वर्तुळ, घन आणि परस्पर विलग्न अशीं असावींत !





# आपणांस काळज्या असतीलच

प्रेम, प्रकृति, संपत्ती, जादूटोणा, कोर्ट, परीक्षा, नोकरी, शत्रूची करणी, भूतपिशाच, भांडणतंटे इ. काळज्या आपणांस असतीलच. तेव्हां आपण त्या काळज्या माझ्या **अध्यात्म** व **आकर्षण-शक्तिनें** तात्कडतोब नाहींशा कां करीत नाहीं, लाखो लोकांना शांति, सौख्य व भरभराट लाभली आहे. तात्कडतोब ३७ वर्षांचा अनुभव असणाऱ्या खऱ्या हिंदू अध्यात्मज्ञानी योग्यास व तांत्रिकास भेटा. तुमच्या आयुष्यपटाचे चित्र दैवी देणगीयुक्त आकर्षकता ज्याच्या डोळ्यांत आहे असा चमत्कारयुक्त माणूस, अध्यात्मज्ञान्याच्या डोळ्यांत आपण पहा, आणि जर आपण त्याच्या दृष्टींत आकर्षक किरणें पाहून झगझगून गेलांत तर निश्चित समजा कीं तोच आपणांस आपल्या काळज्य दूर करण्यास योग्य सल्ला देणारा खरा योगी आहे.

राजे, महाराजे, सरदार, पुढारी, वकील, डॉक्टर्स, संत, योगी आणि अनेक निरनिराळ्या थरांतील लोकांच्याकडून प्रशंसा मिळविलेले. जागतिक कीर्ति (इंग्लंड, अमेरिका, आफ्रिका, चीन, फ्रान्स, अरेबिया, एडन, फिजी, सीलोन, मलाया, ब्रह्मदेश इ. इ.) खुलाशाकरितां आणि प्रशंसापत्राकरितां, तिकिटे पाठवून विचारणा करा.

**भविष्यः**—३ रुपयांत आपणांस आपल्या तीन गुप्त प्रश्नांची (माझ्याकडे पाठवावयाच्या) तंतोतंत उत्तरें मिळतील. आपला भाग्यवान नं., भाग्यवान् खडा, भाग्याचा दिवस आणि आपल्या आयुष्यांत घडणाऱ्या अत्यंत महत्त्वाच्या घटना, ही सर्व माहिती रु. ३ च्या व्ही. पी. ने (परदेशी शि. १० आगाऊ; एअरमेल पोस्टेजसह) पाठविली जाते. आपले चांचणी प्रश्न, माझ्या ऑफिसांत सल्ल्याच्या फीसुद्धां प्रत्येकीं रु. ५१- (आपल्या समाधानानंतर) प्रमाणें सांगितले जातात.

## अशोक आणि त्यांचें अदृश्य गूढ

अशोक आपणांस **मृत** माणसाशी बोलण्यास मदत करतात. ते आपल्या **शत्रूची करणी** अगर काळी जादू गवताच्या काठीवर अगर नारळावर आपल्या डोळ्यासमोर आणूं शकतात आणि आपला जीव वाचवतात. **भयंकर भुतांखेतांस** ते एका बाटलीत आणूं शकतात आणि त्यामुळें आपण त्याच्या **भयंकर परिणामापासून** वाचाल. ते आपणांस एक **आध्यात्मिक बाण** देतील, कीं जो आपल्या कुलुप लावलेल्या लोखंडी सेफमधून अदृश्य होईल आणि आपल्या प्रियकरास, प्रेयसीस अगर शत्रूस आपल्या पायाशीं आणेल. ते आपणांस कोणत्याही औषधाशिवाय **पूर्ण मनुष्यत्व** प्राप्त करून देतील. ते आपल्या आकर्षक किरणानें, **मानसिक रोग, अशक्तपणा, हिस्टेरिया, फिटस्, नपुंसकत्व, पंगुपणा** इ. रोग बरे करूं शकतात.

## ताईताच्या शक्तीचे चमत्कार

### आपली आवश्यकता निवडा आणि आज ऑर्डर पाठवा

**१ मोहिनी काम विलासः**—प्रेम आणि विवाहांत यश. तुमचा प्रियकर अगर प्रेयसी तुमच्या पायाशीं लोळण घेतील. घरगुती भांडणांचा नाश. किंमत : सर्वसाधारण शक्ति. रु. ५१, विशेष शक्ति—रु. १०१.

**२ धन्वंतरी गृहनाशकः**—चांगल्या लाभाकरितां, भयंकर जादुटोण्याचे कांहींही परिणाम नाहींत. शांति आणि सौख्य. शर्यतीत यश, लॉटरी, कोर्ट, परिक्षा, बढती, इ. अनपेक्षितरीत्या पैसा येतो. किं. सर्वसाधारण शक्ति एक वर्षाकरितां रु. ११, जादा शक्ति ३ वर्षांकरितां रु. २१, विशेष शक्ति सर्व आयुष्याकरितां रु. ५१.

**३ शक्तिबाणः**—भयंकर भुताखेतांना रोखतो, शत्रूंच्या करणीपासून अगर जादूटोणा यापासून बचाव. अचानक अपघात अगर भयंकर आजारापासून अलिप्त ठेवतो. किं. सर्वसाधारण शक्ति रु. ५१, विशेष शक्ति रु. १०१.

**४ संतानसुखः**—निश्चित गर्भधारणा. माझ्या गुरुची देणगी सशक्त मुलाचा लाभ, गर्भनाशास प्रतिबंध. किं. रु. १०१ विशेष रु. ३०१.

**५ मॅग्नोमेस्मर आंगठीः**—रोगाची सांथ आणि बरे न होणारे रोग व मनुष्यत्वाचा नाश, यांपासून संरक्षण पुरुष आणि स्त्रिय शक्ति देते. लग्न झालेल्यांना किं. सर्वसाधारण रु. ११ विशेष रु. २१.

याशिवाय आणखी कितीतरी चमत्कार माझ्या कॅटलॉगमध्यें आहेत. रोज—स. ११ ते सायं. ५ शनिवारी—स. ११ ते दुपारीं २. पेस्टाच्या सुट्ट्यांचे दिवशीं बंद.

**प्रो. अशोक**
अध्यात्मज्ञानी व आकर्षणतज्ज्ञ (D. P. B.)

**पत्ताः**—२४५, फ्रिअर रोड,
जी. पी. ओ. समोर,
**मुंबई** (भारत)

६४ नवी पेठ, येथील पुणें ऑफिस कायमचें बंद झालें आहे

प्रा. श्रीधर बाळकृष्ण रानडे



पहिल्या मीलनाच्या रात्रीं
प्रत्येक प्रियकर आपल्या
वल्लभेला म्हणतो,

# तेथें चल राणी

पण शेवटच्या
पुनर्मीलनाच्या रात्रीं?

[ एका शहराजवळचें उद्यान. उद्यान म्हणजे बंगल्याच्या मागची पुढची फळबाग, फुलबाग किंवा भाजीबाग नव्हे. किंवा रोज सकाळीं साफसफाई होत असलेला आणि संध्याकाळीं शेंगदाण्याच्या कागदांनीं आणि केळ्यासंत्र्याच्या सालींनीं घाण होत असलेला शहराच्या मधोमध किंवा अगदीं खेटून वसलेला बगीचाहि नव्हे. या उद्यानांत मुद्दाम ओळीनें लावलेलीं झाडें नाहींत, माळ्याच्या झारीची वाट पहाणारीं नटवीं फुलझाडें नाहीत, कृत्रिम ताटवे, वाफे, कुंड्या, हौद नाहींत. पांचसहा चौरस मैल पसरलेलें हें निसर्गोद्यान आहे, उपवन आहे. उंच उंच घनदाट, डौलदार वृक्ष, त्यांवर चढणाऱ्या, अर्धवट उतरून झोके घेत वर पुन्हा दोरावरून दुसऱ्या वृक्षावर चढून मिस्कीलपणें हंसणाऱ्या वेली, काटेरी झुडुपें, दाट जाळ्या, मऊ गवतानें आच्छादलेला, फुलांची पखरण झालेला भूभाग, आढमुठ्याप्रमाणें मध्येंच डोकीं उंच काढून बघणारे खडकाचे सुळे, पाचोळ्यामुळें सळसळणाऱ्या, पावला-पावलाला वळणें घेणाऱ्या नाचऱ्या पाऊलवाटा, चढण्याउतरण्यास सोपीं अशीं टेकाडें, त्यावरून दडदड उतरणारे ओहोळ, लहान लहान शेवाळांनीं आच्छादलेलीं डबकीं, पाणवेलींची वेलबुट्टी काढलेल्या, कमळाचे गुंदके असलेल्या शालू-प्रमाणें दिसणारीं तळीं, तळाशीं खचलेल्या दगडगोट्यांवरून खळखळत जाणारे ओढे, मधोमध संथ वाहणारी, खोल डोह असलेली नदी !! छे ! असलें हें उपवन कल्पनासृष्टींतच सांपडणार ! कुठलें का असेना. आहे हें खरें ! मग या कल्पना सृष्टींतल्या उद्यानांत काय आभास होतील त्याची कल्पनाच करावी लागेल. न जाणो या यक्षसृष्टींतील कृमिकीटक, पशुपक्षी, वृक्षवेली, कदाचित् बोलतही असतील. त्यांच्या भावना, विचार व बिकट कूट प्रश्न आपल्याला समजतील सुद्धां ! या उद्यानांत 'रहदारीस मज्जाव' अशी पाटी नाहीं तरी रहदारी नाहीं. एखादा थकला भागला जीवास शिणलेला जीव येणार, एखादा शिकारी पारध करण्यास येणार. हो ! कदाचित् कांहीं रंगीभंगी टोळभैरव एकांतांत लोकांचा डोळा चुकवून–स्वच्छंद मजा लुटत वनभोजनास येऊन रहाण्याचाही संभव आहे.

आज फाल्गुनी पौर्णिमा. पूर्वकालांतल्या मदनोत्सवाची, वसंताच्या आगमनाची, शिशिर ऋतूच्या पलायनाची सूचक. आजपासून निसर्गाला प्रेमाची ऊब मिळणार. आज आपलें शहरांत काम नाहीं, समाजनियमांखालीं वर्षभर दडपलेलें मन आज उसळून येणार. होळ्या धडकणार, शंखध्वनी करीत नागरिक जन संस्कृतीचें प्रदर्शन करणार ! चला, थोडा वेळ आपण आभासनिय होऊन या उद्यानांतील यक्षसृष्टींत विहार करूं या.

तिसऱ्या प्रहरीं वळवाची सर येऊन गेल्यामुळें हवेंत किंचित् गारवा आला आहे. पश्चिमेकडे अजून ढग आहेत. कदाचित् अजून रात्रीं वादळ होण्याचा

संभव आहे. सूर्य नुकताच मावळला असल्यामुळें पश्चिमेला ढगांचे रंग पटपट बदलत आहेत. पूर्वेला चंद्राचें लाल पूर्ण बिंब हळू हळू वर डोकावून पहात आहे. विलक्षण प्रकाशामुळें झाडें व वेली अपूर्व आनंदानें डुलत आहेत. कावळ्याची कावकाव थोडा वेळ थांबली आहे.

[ तरुण मंद पावलें टाकीत खालीं मान घालून प्रवेश करतो. ]

**तरुण** : गळून गेले हातपाय अगदीं! जीवाचें बरेंवाईट करायला नदीच्या डोहापर्यंत जायलासुद्धां शक्ति राहिली नाहीं! डोकें कसें सुन्न झालें आहे! तोल जातो–या झाडाच्या फांदीला धरलें तरी–हेंच तें! आम्हीं माणसांनीं पाप केलें आहे! प्रेम करतो हा गुन्हा आणि तें निष्फळ होतें ही शिक्षा. हा वृक्ष मात्र सुखी. या लतेचें दृढालिंगन त्याला मिळावें आणि मी मात्र–

**माधवी लता** : काय हो वृक्षराज! आपला मत्सर कां करतो हा? कुणाचें कुठें चुकतें तें सांगूं का याला?

**वृक्षराज** : माधवी! हळूच विचार. उगीच हातवारे करून त्याला घाबरवूं नकोस.

**माधवी** : हो तर! मी हातवारे करतें काय? सहस्र हातांनीं, नाजुक ताण्याच्या बोटांनीं मीं तुम्हांला विळखे घालून पकडून ठेवलें आहे, पण तुम्हांला कुठें आहे माझी पर्वा? नुसते खांबासारखे स्तब्ध! शुक मुनि आहांत. तुम्हांला कुणाचा मत्सर वाटतो का कधीं? पहा, तो मेला दुष्ट वारा मघांपासून माझी खोडी काढतो आहे! पाहिलेंत, माझ्या हातांतला फुलांचा गजरा मेल्यानें हालवून पाकळ्या पाडल्या खालीं!

**वृक्षराज** : मोठा उपकारी आहे तो! अग, सुकलेल्या पाकळ्या टाकतो म्हणून तर तुझे पुष्पालंकार नेहमीं टवटवीत दिसतात. खरोखर, कल्पना नाहीं तुला! तुला फुलांच्या भारानें लवलेली पाहिली कीं, माझ्या गात्रागात्रांतून शिरशिरी उठते. तुझे ते भारावलेले टपोर पुष्पगुच्छ पाहिले कीं—

**माधवी** : पुरे पुरे! मायावी लाघवी बोलणें! वसंत संचारला वाटतें आजच! व्का उगीच फांद्या हलवूं! तुमची खोटीं कविबोलणीं ऐकून मी फसायची नाहीं! अगबाई, विसरलेंच मी हा प्रेमवेडा जवळ आहे तें!

**तरुण** : माझ्या गालाला कोवळीं पानें स्पर्श करून काय सुचवीत आहेत? अरे! ही माधवी लता पुटपुटते आहे कांहीं तरी! काय आश्चर्य? पण लते! तूं तरी काय सांगणार मला?

**माधवी** : काय सांगणार? सांगणार माझी कहाणी! माझा जन्म झाला, मीं डोळे उघडून पाहिलें अन् त्याच वेळीं या वृक्षराजाचे कोमल पाय मला दिसले. पादस्पर्शावरून मला त्यांच्या उदार हृदयाचा विश्वास आला आणि मी त्यांना मनानें वरलें. माझी कोमल असहाय तनु–त्यांनीं मला आधार दिला. पण मला किती कष्ट पडले याची तुला कशी कल्पना येणार? धडपडत, गोते खात अखेरीस माझ्या करपाशांत मी त्यांना बांधून ठेवलें. ते पळून जातील ही भीति नाहीं. पण त्या पहा माझ्यासारख्या, माझ्यापेक्षां उंच गेलेल्या मोठ्या वेली. त्यांच्या प्रबल बाहूंच्या विळख्यांत आवळलेल्या वृक्षराजाला माझी काय पर्वा असणार? खालीं पहा त्या दुसऱ्या अल्लड वेली. त्यांनासुद्धां आपल्या उदार वक्षावर हे वागवूं देणार. तेव्हां त्यांच्या जनानखान्यांतील एक मी, असेंच समजना घटकाभर! पुरुषजात अशीच. तूंही तसाच माळेंतला! तुम्ही कसलें प्रेम करणार? प्रेम करावें बायकांनीं! यांचें माझ्याकडे लक्ष नाहीं. वरकरणीं खोट्या प्रेमाचे कविताचरण गुणगुणतात माझ्या कानांत. 'पण मी? मी कोमल हातांनीं विळखा घालून अहोरात्र उभी आहें. हिरव्यागार पानांनीं यांचा राकट, भेगाळलेल्या सालीनें विद्रूप झालेला गांठाळ देह शोभिवंत करतें. रोज नवीन फुलांचे गुच्छ यांना अर्पण करतें! तुझी प्रिया माझ्यासारखीच असणार. मग तूं दुःखी कां? तुझें चुकतें आहे कांहीं तरी!

**वृक्षराज** : ए वेड्या! तुझ्या मनाला भुरळ पाडते आहे ती. हिचें सारें बोलणें मानूं नकोस! माझ्या आधाराशिवाय जगणें शक्य नाहीं म्हणूनच ती गोड आहे, समजलास? पहा, ही शेजारचीं स्वतंत्र झुडपीं माझ्याजवळ तरी येतात का? मला कुठें परवा आहे म्हणा त्यांची! वनस्पतींनसुद्धां अस्मितेची लागण झाली आहे! पण बाबा, या लतेची अंदरकी बात न्यारी आहे! "धिक्तां च तं च मदनं च इमां च मां च" म्हणायला मीं शृंगारलंपट नाहीं.

**तरुण** : तुम्ही खरेंच बोलतां आहांत, का माझ्या भ्रमिष्ट मनाचा हा उंदरामांजरांचा खेळ आहे? दोघांचेंही म्हणणें खरें असेल. पण माझी मालती? मी तिच्यावर प्रेम करतों, पण माझ्यावर प्रेम करायला ती कुठें या लतेसारखी निर्बल आहे! स्वतंत्र आहे ती. सुसंस्कृत नवमतवादी आहे. नोकरी करून खोऱ्यावारी पैसा ओढते आहे ती. माझी मीठभाकरी तिला कशी रुचणार? माझ्या टीचभर घराच्या पिंजऱ्यांत ती स्वच्छंदी मैना कशी राहाणार? तारुण्याचा मद आहे, रूपाची मस्ती आहे, दहा तरुण तिच्या भोंवतीं पिंगा घालत आहेत. माझें दुबळें प्रेम, आग्रही प्रेम, तिला कसें रुचणार? मला पाहतांच तिचे गाल लाल होतात, मान खालीं वळते, नजरेला नजर भिडत नाहीं, ओठांतून शब्द फुटत नाहीं. मीं आवडत नाहीं याशिवाय काय दुसरा अर्थ या वागण्याचा? प्रेम असतें तर पैशाला लाथ मारून एका क्षणांत माझ्याबरोबर आली असती. नाहीं, ती स्वतंत्र आहे. माधवी! ती तुझ्यासारखी प्रेमाला आसुसलेली निर्बल नाहीं. या पायाशीं ताणे पसरून पडलेल्या भोपळीच्या वेलीसारखी उद्दाम माजलेली आहे.

**वृक्षराज** : शाबास! आतां कसें पुरुषासारखें बोललास! बाबा रे! या जगांत खरें प्रेम फार थोडें. आहे तें नियमांनीं, रूढींनीं, संस्कारांनीं गुदमरून गेलें आहे. मेलेलीं मनें कसलें प्रेम करणार? प्रेम करावें बंडखोरांनीं! प्रेम करावें, मिळालें तर घ्यावें, भीक मागूं नये, तोंड वेंगाडूं नये! निधड्या छातीनें हंसत प्रेमभंग सोसावा! रडतोस काय? सुखी आहेस तूं. निर्बळ असहाय स्त्रीचें प्रेम तुला हवें. पण स्वतंत्र, बलवान् स्त्रीचें प्रेम तें खरें प्रेम. तें कदाचित् सुख देणार नाहीं. भाजून काढील प्रेमाच्या प्रखरतेनें! प्रेम हें सुखासाठीं नाहींच. प्रेम मिळालं तर सुखःदुखाचेंच काय, सारे सारे प्रश्न क्षणार्धांत सुटतात. मोक्ष, शांति मिळते!

छे! नाहीं पटायचें तुला! तुझी लता ह्या माधवीसारखी हवी तुला या निर्बल प्रेमाचा देखावा–खोटें वाटतें? थांब थोडा वेळ. मग दिसेल या मायावी चंचल प्रेमाचा खेळ.

होय. खोटें कशाला बोलूं? मीसुद्धां प्रेम करतों. अगदीं मनापासून–दुष्प्राप्य अशा एका लतेवर! पण कुणाला कल्पना आहे? मी मायावी प्रेमाला–व्यवहारी प्रेमाला फसत नाहीं. जरा वर बघ! फांद्याफांद्यांवर बिलगलेलीं वांडगुळें दिसलीं का? माझें रक्त शोषणाऱ्या या मायावी जळवा! किती मोहक दिसतें नाहीं यांचें कुसुमस्मित!! बाबा रे! पुष्कळ भुलभुलय्या बाहुल्या आल्या नी गेल्या. मीं कर्मांत कर्मा शंभर उन्हाळे पावसाळे पाहिले आहेत. तुझ्यासारखा प्रेमवेडा नाहीं; चुकलों. आहें–पण–



अनुक्रमणिका

**लता :** मला तुमचें कांहीं कळत नाहीं. माझ्या स्पर्शानें तुम्हांला सुख होत नाहीं. आलिंगनानें अवघडल्यासारखें वाटतें, ठाऊक आहे मला. मी कशी आहें हेंही तुम्ही जाणतां. अनुभववृद्ध मुरलेले राजे तुम्ही. पण तुम्हांला येवढें कसें कळत नाहीं? वनस्पतीसृष्टींतील निष्ठुर सत्यें नी गुपितें या कोवळ्या वेड्या मानवाला कशाला सांगतां? सृष्टि सुंदर आहे अशा याच्या कविकल्पना राहूं देत त्याच्याजवळ. थांबा. मग मीही सांगतेंच. तरुणा! माझें वृक्षराजावर मुळींच प्रेम नाहीं. भ्रम आहे तुझा! माझें कुणावरच प्रेम नाहीं. मी वृक्षराजाला आलिंगतें, भ्रमराला भुलवितें! पण तें कशासाठीं! मातृपद मिळावें म्हणून! आम्ही तरुणी तुमच्या कांता नाहीं. न जन्मलेल्या बाळांच्या माता आहोंत!

**तरुण :** अरे अरे! काय बोलतेस हें! माझ्या साऱ्या कविसंकेतांचा चुराडा झाला. नाहीं. मला तुझें कधीं पटणार नाहीं. माझ्या प्रियेचें नांव मालती, मी मनांत म्हणे, "मालती! ये, या माधवाला गाढ रंभण दे!" अरे-अरे! हा भ्रमर गुंगूं करून माझ्या कानाशीं कां कटकट करीत आहे? मी या लतेशीं बोललों तर याला कां मत्सर वाटतो?

**भ्रमर :** गुंगुं गुंगुं! आधीं थोडा मध पिऊं दे! लतेच्या कोमल सुमन अधराचा आस्वाद घेऊं दे! मग सांगतों! माझा त्रास वाटतो का? माणसा! ही लता वृक्षराजाची नाहीं! हीं फुलें तुझ्यासाठीं नाहींत. माझ्यासाठीं फुलांचा जन्म. फुलांसाठीं माझा जन्म! फुलांचा आस्वाद घेणें यांत माझ्या जीवितांचें सार्थक! वेड्या, माझा मत्सर करतोस? तुझ्या लतेभोंवतीं घोळका करणाऱ्या तरुणांचा तूं मत्सर केलास. त्यांना तुझी लता नको होती. दुसऱ्याच व्यक्ती—या फुलासारख्या तिच्या बहिणी—त्यांना हव्या असतील? भ्रमर झाल्याशिवाय नाहीं कळायचें तुला. मी माझ्या कुसुमचें आराधन करतों. लतेचें नाहीं. ही मला पुष्कळ भुलवील कोवळीं तांबुस पानें दाखवून. पण मी! काय रे माणसा! तूं कां नाहीं कुणा कुसुमच्या मागें जात! लता कशाला हवी? गुं गुं गुं गुं!

**माधव :** स्त्री जात सारी निमकहराम हेंच खरे! माधवी, तूं माझ्या लतेसारखीच आहेस. माझें निःस्वार्थी प्रेम मालतीला कळलें नाहीं. तुझ्याप्रमाणेंच ती लंपट लोलुप भ्रमराच्या घोळक्यांत आनंद मानीत आहे. पैशाचा लोभ सुटत नाहीं. गरिबींतलें भावडें सुख नको तिला. माझें मस्तक कसें सुन्न झालें आहे! या वृक्षराजासारखा लाकडाचा ठोकळा झालों असतों तर हृदयांत आग पेटली नसती. त्या निष्ठुर स्त्रीची आठवण नको! सुन्दर प्रेमळ म्हणून आजवर समजलों त्या मायावी सृष्टीचा निरोप घेण्याचा पहिला वेतच ठीक आहे. अरे! ढग चढूं लागले. आभाळ काजळून गेलें. चंद्र झाकून काळोखी पसरली. वादळी वारा वाहूं लागला. तुफान झालें. मायावी लता उन्मळून जमिनीवर कोसळली. वावटळींत भ्रमर उडून गेला. थोडा वेळ झाडाच्या आश्रयानें उभें राहूं आणि मग नदीवर जाऊं.

[ वारा घोंगावतो. वृक्षराजाच्या फांद्यांचा करकर, कडकड आवाज होतो. ]

**वृक्षराज :** माधव! दूर हो! माझी सांवली, माझा आसरा या वेळीं धोका देईल. जा बाबा दूर उभा रहा! पक्ष्यांनो इतके दिवस माझ्या फांद्यांवर घरटीं केलींत, फळें खाल्लींत, रात्रीं विसांवा घेतलात. जा. वादळ असो, पाऊसधारा पडोत—जा! उडून दूर जा! या वेळीं माझ्याजवळ कोणी नको! मला एकांत हवा. फांद्याफांद्यांतून पानापानांतून माझें जीवन उसळी घेत आहे! गात्रें नी गात्रें शहारलीं आहेत. हा फांद्यांचा आक्रोश नाहीं. हें हृदयाचें कंदन आहे. आतुर प्रेमाचें स्पंदन आहे. कां डोळे कां मिटलेस? दिपलास या लहानशी विजेच्या झळकीला (गडगडाट) भ्यालास या नाजुक हंसण्याला! अरे, अजून काय पाहिलें आहेस! आतां दिसणें आणि डोळे मिटणें—एकदमच. जा! पळ! चालता हो! मला भित्र्या मानवाचा संपर्क नको! सला व्यवहारी वेलींचा स्पर्श नको! मी निस्संग झालों आहें. प्रेमांत माझें निर्वाण आहे! तुला मरण भासेल तें पण तेंच माझें तारण आहे! इतकीं वर्षें उन्हातान्हांत वाऱ्यापावसांत वाट पाहिली, तपश्चर्या केली. एकदां वेळ आली होती पण काळ—प्रेमाचा क्षण चुकवून गेला. वेड्या! तुला काय वाटलें? माझें त्या स्वैरिणी लतेवर प्रेम होतें? त्या नखरेल मायावी अवखळ कुन्तन वेणाऱ्या बांडगुळांना मी भुललों होतों? भ्रम आहे तुझा—माझें प्रेम—माझी लता—हा हा हा! [ मधून मधून विजा आणि गडगडाट ]

**माधव :** काय विजा चमकत आहेत. माझ्या सर्वांगाला कांपरें सुटलें! पण हा निधड्या छातीचा वृक्षराज वर डोळे लावून आतुरतेनें प्रियेची प्रतीक्षा करीत उभा आहे! कोण असेल बरें याची भाग्यवंत प्रिया—

( मोठी वीज पडते. प्रचंड कानठळ्या बसणारे मेघगर्जना होते वृक्षराज कोसळून पडतो. )

**वृक्षराज :** भेटली माझी प्रिया! विद्युल्लता! भेटली! सर्वांगानीं कडकडून भेटली. शिरली, अंतरांत शिरली. एकजीव झालों. दिव्य प्रेमानें तेजाळून गेलों. कणाकणांतून प्रेमाच्या मंत्रानें भारून गेलों. देहाचें सार्थक झालें. वाजवा, देवांनो! नौबती वाजवा! पर्जन्यधारांचें मंगल स्नान घाला. या पार्थिव कणाकणांना धुवून सागराच्या तळीं नदीनो, न्या!

[ प्रचंड गडगडाट होतो. कांहीं काळानें शांत होतें. झिमझिम पाऊस पडूं लागतो. ]

[ सर्वांग ओलेंचिंब झालेलीं, वस्त्रें अंगाला चिकटून निथळत असलेली मालती डोक्यावर एक मोठें पान छत्रीसारखें धरून हळूं हळूं येते. ]

**मालती :** हें काय मध्येंच विघ्न आलें. आज भावाला नोकरी लागली. मी तावडतोब राजीनामा दिला. बहिणीला—कुसुमला—पत्करण्याचें त्या तरुणानें कबूल केलें. केवढा आनंद झाला होता मला. मीं माधवांची थट्टा केली पण त्यांना समजली नाहीं. एवढा काव्यप्रकाश वाचून प्रणयचेष्टा म्हणजे काय त्यांना कळत नाहीं. माझ्याकडे रागानें पाहिलें. मला गंमत वाटली. पण तो राग नव्हता. दारुण निराशा होती मला आतां कळतें आहे. हीच आपली शेवटची भेट म्हणून ते इकडे वळले. मी पाठोपाठ निघालें. काय ह्या या प्रेमवेड्या हळव्या माणसांचें! मलतेंच मनांत धरून डोहांत उडीसुद्धां घ्यायचे! पाऊस भरला म्हणून वाटेत थांबलें! हा क्षणभर उशीर, हें चार पावलांचें अंतर अखेरपर्यंत तसेंच कायम राहून कायमची ताटातूट करणार का? आतां ते कसचे भेटतात? मीच दुःखाला कारण. चांडाळीण त्यांच्या नाशाला कारण. मी कां नोकरी करतें तें कां नाहीं सांगितलें? दारुबाज बापानें कर्ज फेडतें, आई—भावंडांसाठीं नोकरी करतें. बहिणीला स्थळें पाहातें. कां नाहीं सारें सांगितलें? कां नाहीं विश्वासांत घेतलें? ही लाज आडवी आली. समाजाची खोटी लाज आडवी आली. मी कुसुमइतकी सुंदर नाहीं तरी त्यांना आवडतें म्हणून अभिमान वाटे. असलें प्रेम गुप्त ठेवावें असें वाटे! निर्लज्ज होऊन आपलें प्रेम मी व्यक्त केलें असतें, प्रेमभरानें मिठी मारली असती तर आज असा प्रसंग—

अगआई ग! कोण हे! माधव! असे अस्ताव्यस्त पानलांत भिजत निपचीत कसे पडले आहेत माधव! माधव! मला सोडून जाऊं नका! मी नाहीं जाऊं द्यायची! वसंत—सेनेसारखी पावसांतून भिजत मी माझ्या चारुदत्ताकडे आलें आहे! कादंबरीनें चंद्रपीडाच्या शरीरांत पुन्हा प्राण

घातला, तशी मीसुद्धां तुम्हांला माझ्या हृदयाशीं असें घट्ट धरून माझ्या ऊन फुंकराबरोबर माझे पंचप्राण तुमच्या देहांत घालीन आणि माझ्या ओठांनीं ते प्राण आंत असे कोंडून ठेवीन ! माधव ! माधव ! डोळे उघडून बघ ना माझ्या राजा !

**माधव** : कोण ? मालती ? तूं ! नाहीं, आभास आहे हा ! स्वप्न आहे हें ! पुन्हा डोळे मिटून पडूं दे ! वृक्षराज, अनुभववृद्ध योगिराज ! तुझी लता निष्ठुर, फसवी होती. तुला तुझी विद्युल्लता भेटली. तुझा प्रेमयोग साध्य झाला. हृदयांत पेटलेल्या प्रेमाच्या ज्योतींत तूं मिसळून गेलास. समाधानाच्या वर्षावानें तुझ्या क्लेशांचें चिताभस्म वरून गेलें. माझासुद्धां देह जळावा म्हणून अट्टाहासानें उभा राहिलों. पण विजेच्या झटक्यानें उडून येथें पडलों, बेशुद्ध झालों. मेलों कां नाहीं मी ?

मालती ! माझी मालती ! फसवी नाहींस तूं ?

**मालती** : माधव ! मी पूर्वी तुमची होतें. अजूनही तुमची आहें. पण माझें प्रेम तुम्हांला दिसलें नाहीं. व्यावहारिक बंधनानें मी गुलाम झालें होतें. खोट्या लाजेखालीं माझ्या प्रेमाचा कोंडमारा झाला होता. त्यानें हा प्रसंग ओढवला. खऱ्या प्रेमाला बंधनाचें बंधन नाहीं. मी आतां निर्लज्ज झालें आहें माधव. ओलेतीचें चित्र पाहून मला लाज वाटे. आतां तूं सारखा माझ्याकडे पाहतोस. कांहीं वाटत नाहीं मला. आतां तुला कांहीं संशय नाहीं ना माझा ? सगळें सांगतें हळू हळू तुझ्या कानांत ! अंहं, इथें पावसांत नाहीं. चल त्या टेकडीवरच्या फुटक्या देवळाच्या गाभाऱ्यांत जाऊन बसूं !

**माधव** : आणि सारी रात्र या निर्जनीं, विजनीं, वाघुळांच्या फडफड आवाजांत आणि घुबडांच्या घूत्कारांत, मानवांना विसरून एकमेकांच्या संगतींत घालवूं. वृक्षराजाला विद्युल्लता जशी कडकडून भेटली, एकजीव झाली तशी तूं—खरेंच किती वेडा मी ! माझी विद्युल्लता दगाआड लपली होती.

**मालती** : नाहीं, माधव ! तुझ्या हृदयांतच होती ती ! चल थंडी वाजायला लागली मला ! कळते कीं नाहीं तुला ? हं, असा चालतांना माझ्या अंगावर रेलूं नकोस. शुद्धीवर आला आहेस आतां. तूं वृक्ष, मी लता. या निर्बल जमिनीवर निपचीत पडलेल्या माधवीसारखी—

**माधव** : चूप् ! मी वृक्षराज आणि तूं विद्युल्लता. चल !
मी तुज, मला तूं, प्रभु दोघांस निदानीं
तेथें चल राणी !

[ जातात ]

[ आभाळ निवळतें. चंद्राचें शांत चांदणें पडलें आहे. रातकिड्यांची किरकिर चालू आहे. मधेंच पानांत सळसळ आवाज येतात. ओढ्याचा खळखळाट येत असतो. ]

[ उद्यानांतील दुसरा भाग. रात्रीचे दोन वाजले आहेत. चंद्र पश्चिमेकडे कलला आहे. झाडांच्या वर्तुळामध्यें साफ केलेली वनभोजनाची जागा. बाजूच्या लहान तंबूच्या कनातीच्या फटींतून दिव्याची मंद तिरीप दिसत आहे. वर्तुळाच्या मध्यभागीं पेटवलेल्या शेकोटीसभोंवतीं दिवसभर मजा करण्यास आलेल्या, मध्यरात्रपर्यंत गाणें बजावणें ऐकलेल्या आणि थकलेल्या तरुणांचे घोळके अस्ताव्यस्त घोरत पडले आहेत.

एक तरुण शेकोटीजवळ ओले कपडे वाळवीत, मधून मधून शेकोटीचे निखारे ढलप्या घालून फुलवीत विषण्ण मनानें बसला आहे. हळू हळू दबकत एक हरिणी येऊन शेकोटीजवळ उभी राहते. ]

**हरिणी** : अग आई ग ! गळून गेला जीव. काय करूं, कुठें जाऊं. रात्रीं दौडत, दिवसा लपत छपत, शंभर मैलांचा प्रवास करीत परत येथें येऊन पोहोंचलें. पण काय उपयोग ? माझ्या कमनशिबीं पूर्वीसारखें सुख कोठून येणार ? भुकेनें जीव कासावीस झाला आहे. त्यांनीं परत घेतलें नाहीं तोंपर्यंत गवताला तोंड लावणार नाहीं अशी शपथ घेतली. पण तें माणसांचें उष्टें पक्वान्न खाण्याची वासना झाली म्हणून आलें. तें तिकडे पडलेलें खाईन तर हा शिकारी वाटेंत बसला आहे ना—माझा जीव घ्यायला. पण बघतेंच एकदां प्रयत्न करून ! काय करायचें. दोन जीवांचा प्रश्न !

**तरुण** : ( चमकून ) काय म्हणालीस ? दोन जीवांचा प्रश्न ? तुम्हा चतुष्पाद जनावरांपुढें केव्हांपासून 'दोन जीवांचा प्रश्न' उभा राहूं लागला ? दोन जीवांचा प्रश्न अडवूं लागला तर आम्ही सुधारलेलीं माणसें एक जीव नाहींसा करतों ! दचकलीस कां ? अग, जीवाला थाराच मिळणार नाहीं असा पक्का बंदोबस्त करतों ! मग भेडसावणारा प्रश्नच कुठून उभा राहणार ! दंग्यांत, लढायांत लाखों माणसें मरतात तरी आपले लक्षावधी पाळणे हालत आहेत खोपटाखोपटांतून ! जमिनीवर कशाला येतात हीं पोरें ! स्वर्गांतच कां नाहीं मरत ?

**हरिणी** : किती अमंगळ बोललास तूं ! खास तूं वेडा झाला आहेस. जीव मूळ धरूं लागतांच नाहींसे करतोस ? आम्ही जनावरें असें कधीं करणार नाहीं. राग येतो, संताप—काहिली होते अंगाची. पण असें मनांतसुद्धां—

**तरुण** : तुझ्या कां मनांत यावें ? तूं कांहीं वाकडें पाऊल पडलेली अल्लड कुमारिका दिसत नाहींस. असे विचार मनांत कुमारिकेनें आणावे.

**हरिणी** : कुमारिका ? तूं काय म्हणतोस तेंच कळत नाहीं. मी कुमारिका असतें तरी काय निराळें झालें असतें ? मला तुमची ही मानवी समाजतत्त्वें कळतच नाहींत. हे भेद आम्हांला कळत नाहींत. एकाला एक कायदा आणि दुसऱ्याला राजरोस सवलती—हीं तुमचीं नीतितत्त्वें. आम्ही निसर्गाचे कायदे जाणतों. निसर्गाविरुद्ध असेल ती अनीति एवढेंच आम्हांला समजतें. आम्ही—स्त्रीजात—माता आहोंत. मुलांना जन्म देऊन त्यांचें संगोपन करणें हें आमचें काम. निष्पाप बालकांचें संगोपन-संरक्षण करणें हें कळपाचें काम आणि आम्हां दोघांचें संरक्षण करणें हें तुम्हां पुरुषांचें काम. आपल्या कामांत चुकारपणा करतां आणि उलट त्या कोवळ्या बालकांची हत्त्या करतां मातेची विटंबना करतां !

वीट आला तुम्हां माणसांचा. जातेंच मी ! तुझें तें उष्टें अन्न नको ! आठ दिवस उपास काढले ! उद्यां काय तो सोक्षमोक्ष होईल. तुझ्या उष्ट्या माणसी अन्नाचा मोह पडला, तो मला नाहीं—

**तरुण** : तुम्ही बायका सगळ्या सारख्या. स्वतः मोहांत पडणाऱ्या आणि दुसऱ्याला भुरळ पाडणाऱ्या. माझे डोळे साफ उघडले आहेत, फाटले आहेत आता ! माझें हृदय फत्तराचें झालें आहे. बोल, खरें बोल. क्षणिक मोहाला तूं बळी पडलीस. तेव्हां असेल. पण आतां—

**हरिणी** : मोह ! हो, मोह पडला, पण मला नाहीं. माझ्या पोटांतल्या बाळाला. माणसांचें उष्टें खाणाची चटक लागलेल्या मिंध्या, माणसाळलेल्या त्याच्या पिंडाला. त्याच्या जनकाचा मी द्वेष करतें पण बाळाची इच्छा पुरवावीशी वाटली. लाचार होऊन हें खरकटें खायला आलें. डोळे उघडले माझे खाडकन्. तूं माणसासारखा माणूस असून तुला माझी आणि या गोळ्याची दया येत नाहीं. माझ्या कळपांतलें बछडें तरी आमच्या वाऱ्याला उभें राहील का ! हें काय ? इकडे टापा कशा ऐकूं आल्या या वेळेला ?

**तरुण** : टापा ? मला नाहीं ऐकूं आल्या ! तुम्हां हरणांचे कान फार तीक्ष्ण असतात म्हणे. माझी कुरंगी मी फर्लांगभर दूर दिसलों तरी दारांत



अनुक्रमणिका

उभी राहून माझी वाट पाहायची ! अं हं कुरंगी म्हणजे हरिणी नव्हे ! माझी पत्नी कुरंगी. मीसुद्धां तिच्या वाटेकडे कान देऊन बसें. पण माझे कान आतां बधिर झाले आहेत, कानठळ्या बसल्या आहेत. मध्यरात्रभर भर पावसांतसुद्धां नाचगाणें चाललें होतें. तापलेलें शिसें ओतल्याप्रमाणें कानांत गाणें शिरत होतें. नाचाच्या प्रत्येक पावलाबरोबर हृदयाचे तुकडे तुकडे होत होते. पण मीं धीर धरला. आज चार वर्षं धीर धरला. दुःखानें माझा चेहरा काळवंडला आहे, तरुण असून केस पिकले आहेत. ती मला कसची ओळखते ? पण मी तिला ओळखलें. आजची संधि साधावी म्हणून तर या उनाडटप्पूच्या टोळक्यांत प्रवेश करून येथें आलों. आज पहांटे तिची निर्भर्त्सना करून मी नदीच्या डोहांत जीवाचा निकाल लावणार !

**हरिणी** : जीवाचा निकाल—आत्महत्त्या करणार तूं ! शक्य आहे तुम्हां माणसांना ! आम्हा जनावरांना तें जमतच नाहीं. दुःखानें डोळ्यांत प्राण आले तरी बुबुळें फोडून ते जात नाहींत. पुष्कळ मरावेंसें वाटतें. माझें दिवस भरत आले. मीसुद्धां सकाळीं शेवटचा प्रयत्न करून पाहणार आहें. माझ्या बाळासाठीं—अरे सगळे कशाला आले ? काळवीटामागून सगळा कळप कशाला भोंवती शोभा करायला ?

[ काळवीटामागोमाग हरिणींचा कळप येतो. मोठ्या माद्यांच्या कोंडाळ्यांत लहान बालकें उभीं आहेत. काळवीटाजवळ पट्टराणी आहे. ]

**हरिणी** : मी आलें, थकून गेलें आहे मी. माझ्या बाळाला थारा द्या !

**काळवीट** : बाळाला ? असं ! तुझ्या बाळाला. तो तुझा असेल, माझा नाहीं.

**हरिणी** : असें काय या माणससारखें बोलतां. मी तुम्हांला नकोशी असेन तर मी कुठेंतरी जाईन पण माझ्या बाळाला पोरकें करूं नका ! शिकारी, शिकारी कुत्रे, माणसाळलेले काळवीट यांनीं जग भरलें आहे हो ! एका बालकाचें कळपाला ओझें नाहीं होणार !—आली, दया आली तुम्हांला माझी ! माझ्यावर अजून तुमची माया आहे तर !

**पट्टराणी** : व्हा मागें, पुढें काय सरकतां ! अजून तुमची मस्ती कायम आहे ? इतक्या पन्नास हरिणी रात्रंदिवस तुमच्या सेवेला आहांत तरी ! काय ग सटवे ! एका बालकाचें ओझें म्हणतेस ! तुला ग काय संसाराचा अनुभव आहे ! पहिलटकरीण तूं. पोरांच्या खस्ता खातां खातां आमचा जीव मेटाकुटीस येतो. आणि ही दुसऱ्याची—माणसाळलेल्या काळवीटाची—अवलाद आमच्या कळपांत शिरवून भ्रष्ट करणार आमचा कळप ? तुला पळवून नेली तेव्हांच तूं आम्हांला मेलीस आणि आम्ही तुला मेलों. निलाजऱ्यासारखी पुन्हा परत कशाला आलीस ? चला हो ! नादीं नका लागूं तिच्या पुन्हा. तुम्हांला चाड नसेल कळपाची पण आम्हांला आहे. तुम्ही संरक्षण करतां म्हणून तुमचें आम्ही चालूं देतों. काय पण शूर तुम्ही ! दुसरा बळकट तरुण काळवीट या जंगलांत काल आल्यापासून तुम्ही आम्हांला घेऊन पळत सुटलां आहांत. पोरें दमलीं आहेत किती. आतां हें लचांड कशाला ? आम्हांला तुमचा वीटच यायला लागला आहे ! वाहवा रे शूर ! त्या दिवशीं शिकारी कुत्र्यांचा वास आल्याबरोबर तुम्ही हिला टाकून आम्हांला घेऊन पळ काढलात !

**काळवीट** : पण ती माझी कुठें झाली होती ? तिची माझी फारशी ओळखही नव्हती. नुसता कुठें तिच्या अंगाचा वास मला अंधुक अंधुक येऊं लागला होता.

**तरुण** : म्हणून तरुण्या ताठ्या पत्नीला सोडून भ्याडासारखें पळालास? माणूस नाहींस. जनावर आहेस.

**काळवीट** : तोंड संभाळून बोला माणूसराव! तुम्ही माणसें लांडग्या-सारखीं क्रूर, तरसासारखीं विश्वासघातकी—आणि हो! माझ्यासारखीं भ्याड, पळपुटीं झालेलीं हजारो पाहिलीं आहेत मी गेल्या चार वर्षांत. तूंसुद्धां... आतां कां खालीं मान घातलीस? जात्या भीरु हरिणीला आणि मला दोष देतोस!

**हरिणी** : मी अगदीं घाबरून गेलें. तुम्ही ओढ्यावरून उडी मारून गेलांत. माझे पाय लटपटूं लागले. मी एकटी पडलें. शिकारी कुत्र्यांनीं मला फाडून टाकलें असतें तर किती बरें झालें असतें. पण कुत्रीं आवरून शिकाऱ्यानें मला वांचवलें. घरीं नेलें. त्याच्या बायकोनें मला मुलीसारखें सांभाळलें. पण—

**तरुण** : आठवलें मला. तेजासिंग शिकारी माझाच मित्र आहे. त्याच्या-जवळ तो किती उमदा माणसाळलेला काळवीट आहे. त्याच्या जोडीस म्हणून तुला आणली होती असें तो म्हणाला. काय ग! कां, नाहीं आवडला तो काळवीट? किती हुशार! काळवीट नसता तर आम्हां माणसांत ओळखूं आला नसता. ह्या रानवट भेकड काळवीटापेक्षां तो शूर आहे. शर्यतीच्या झुंझींत अनेक अजिंक्य पदकें मिळालीं आहेत त्याला. त्यानें अतिप्रसंग केला म्हणून तूं आकाश-पाताळ एक केलेंस, अन्नपाणी टाकलेंस आणि डोळा चुकवून अशी पळून आलीस!

**हरिणी** : हो! काळवीट माणूस झाला होता. दुसऱ्याच्या पत्नीला भ्रष्ट करण्यांत त्याला मोठेपणा वाटला. तुझ्या त्या शिकाऱ्यानें तुझ्यावरच्या अन्या-याचा सूड दुसऱ्या एक निरपराध बाईवर घेतला असें तो काळवीट म्हणाला. माणसाळलेला तो! आपल्या आईचा सूड त्यानेंही माझ्यावर उगवला! मी त्याच्या वाऱ्याला उभी रहात नव्हतें. माझें प्रेम यांच्यावर होतें. पट्टराणीच्या धाकामुळें माझी यांची गांठच पडत नव्हती. पण मी मनानें यांना वरलें होतें.

**काळवीट** : तुझ्या टपोऱ्या डोळ्यांकडे पाहिलें तेव्हांच मला तें कळलें होतें. त्या दिवशीं त्या वेळेला शिकारी कुत्रे आले नसते तर हें तुझ्या पोटांतलें बाळ माझें—



**पट्टराणी** : लागलांत का गोंडा घोळायला? तरी मला वाटलेंच होतें. या तरुण हरिणीची तुम्हांला भुरळ पडणार म्हणून. जातिवंत काळवीट तुम्ही! पहा, माणसाचा वास नको म्हणते ही आणि चार उष्टे घांस खाण्यासाठीं या केस पिकलेल्या म्हाताऱ्या शिकाऱ्याची मनधरणी करीत कशाला उभी होती ती! चला, दुसऱ्या चार तरुण हरिणी पणांत आल्या आहेत. चला ग बायांनो. घाला गराडा आणि न्या यांना ढुशी देत. तुमच्या कोमल पुष्ट अंगाचा स्पर्श झाला म्हणजे येईल मागोमाग! चला, चला म्हणतें ना?

[ काळवीटाला गराडा घालून हरिणींचा कळप जातो. बिचारी हरिणी जड पावलें टाकीत शेकोटीपाशीं निश्चेष्ट पडते. तरुण आपल्याच विचारांत मग्न आहे.]

[ तंबूचा पडदा बाजूस सारून एक तरुण नर्तिका बाहेर येऊन चंद्राकडे तोंड करून उभी रहाते. केस मोकळे करून पाठीवर झटकते. तो आवाज ऐकून आणि अंगावर पडलेली सांवली हलल्यामुळें तरुण दचकून उभा राहतो. ]

**तरुण** : कुरंगी!

**कुरंगी** : कोण तें? मोहन! तुम्ही जागत बसलां आहांत? माझी वाट पहात आहांत? आज सारा दिवस येथें बाजूला बसलांत? मग ओळख कां दिली नाहींत? किती बदललांत तुम्ही चार वर्षांत? अरेरे, काय अवस्था झाली आहे तुमची!

**मोहन** : कुरंगी! किती भयंकर संकटांत आहेस तूं! ह्या हरिणी-सारखी —नाहीं. दोन जीवांचा प्रश्न नाहीं! तुझें सौंदर्य आहे तसेंच आहे. जास्तच आकर्षक झालें आहे. पण आवाज करडा निश्चयी वाटतो. डोळ्यांत प्रेम नाहीं. कांहीं तरी निराळें आहे. कुरंगी! माझ्यावर अजून तुझें प्रेम असेल का?

**कुरंगी** : ( भकासपणें हंसत ) आतां कां चौकशी? प्रेम? पूर्वी होतें हें विसरलां नाहींत अजून म्हणायचें. विसरून जा आतां तें. प्रेमाला समाजांत किंमत नाहीं. पुरुषांचें प्रेम हा शब्द मी आतां कोशांतून काढून टाकला आहे. माझें प्रेम निराधार, निर्वासित झालें आहे आतां. किती नाटकी बोललें नाहीं मी! नाटकीच झालें. नाटकी कां? नाटकशाळा म्हणा वाटलें तर!

**मोहन** : कुरंगी! असे कां वाग्बाण मारतेस मेल्या मढ्यावर! अशी फसवाफसवी करूं नकोस! तूं माझी पत्नी होतीस, हिंदु धर्माप्रमाणें आपला विवाह झाला होता. तूं अजून माझी पत्नी आहेस. अर्धांगी आहेस.

**कुरंगी** : मोहन! मी स्वप्नांत तर नाहीं? समाजाची पकड, सनातन संस्कृतीची पकड इतक्यांत कशी ढिली झाली! मी अर्धांगी, अजून अर्धांगी? बरोबर! दमयंती नलराजाची अर्धांगी होती म्हणून अर्धे वस्त्र घेऊन तो पळून गेला. तुमच्या या अर्धांगीला मवाल्यांनीं धरली पण तुम्ही अर्धें वस्त्रसुद्धां माझ्याजवळ ठेवलें नाहीं. माझी अब्रू उघड्या डोळ्यांनीं उघडी पडली.

**मोहन** : मागच्या आठवणी कशाला काढतेस कुरंगी? विसरूं म्हटलें तरी त्या रात्रंदिवस डोक्यांत थैमान घालीत आहेत. नल भ्याड नव्हता. मीं तुला बळी दिला. दहा धटिंगणांपुढें माझें कांहीं चाललें नाहीं. हातपाय बांधलेल्या स्थितींत मीं तुझी विटंबना पाहिली. तुला बेशुद्ध स्थितींत नेलेली पाहिली आणि मी बेशुद्ध पडलों. महिनाभर माझी तोळामासा स्थिति होती म्हणतात. त्याच वेळीं मी कां मेलों नाहीं? त्या काळवीटासारखा जीव बचावला!

**कुरंगी** : काळवीटासारखा? म्हणजे? मी नाहीं समजलें! जाऊं द्या त्या गोष्टी. तुमचा तरी काय-दोष? माझें नशीब फुटकें! मी कां मेलें नाहीं?

किती तरी नायिका सती गेल्या. मेल्या. पण तरुणपणीं जीवाचा लोभ मला सुटला नाहीं. मी देहानें मेलें नाहीं. तुमची भेट व्हावी ही इच्छा होती. तुम्ही तरी मला स्वीकाराल अशी वेडी आशा होती. मी देहानें मेले, आतां मनानें मेलें आहें.

**मोहन** : कुरंगी, मी मेल्यापेक्षां मी मेलों आहें. संधि आली ती घालविली. त्यांनीं तुझी मुक्तता करून आणली पण मीं तुझा स्वीकार केला नाहीं. समाजाची भीति वाटली, नातलगांची भीड पडली—सत्याला स्मरून सांगतों, कुरंगी ! पतितेला पूर्ववत् पत्नीपद देण्याची कल्पना मनाला कशीशीच वाटली.

**कुरंगी** : त्यांत तुमचा काय दोष ? तुमच्या मनावरचे पिढीजात संस्कार एकदम कसे जाणार. इतर लाखों माणसें वागतात तसें तुम्ही वागलांत. माझी अपेक्षा प्रेमाच्या बळावर. आभास होता तो. तुम्ही तुमच्या रामराज्याच्या रामाच्या पावलावर पाऊल टाकून चाललांत. गौतमानेंसुद्धां मनानें निष्पाप असलेल्या अहिल्येचा त्याग केला. शाप दिला शाप ! व्यर्थ होते श्रम वरशाप देण्याचे. अशा आम्ही बाया यांत्रिक दगडाच्या पुतळ्या असतों. मेंदू दगडाचा आणि हृदयही शिळेचें. रामानें उद्धार केला म्हणे ! म्हणजे काय ? निर्जीव दगडाचें माणूस करून त्याला मानसिक यातनांच्या नरकांत लोटलें ! कशाला विचार करतां या मागच्या गोष्टींचा ?

**मोहन** : तूं नाहींशी झालीस पुन्हा. मी पुष्कळ शोध केला. अनाथाश्रमांतसुद्धां तुला थारा मिळाला नाहीं असें कळलें. पण एके दिवशीं कळले आणि माझा राग मनांत मावेना. तूं सुखांत चैनींत—

**कुरंगी** : अडखळूं नका असे ! मी सांगतें. तुमच्या शिकारी मित्रानें माझा जलसा पाहिला. ओळखून लगट करण्याचा प्रयत्न केला. मी बधत नाहीं हें पाहिल्यावर तो खळवळला आणि म्हणाला कसा, ' माझा काळवीट माझ्यापेक्षां शहाणा आहे पण मीही हिकमती आहें. '

**मोहन** : अरे दुष्टा ! अशा शिकारी करतोस काय ? हो. त्यानें मला सांगितलें, " तूं छुपी बाजारबसवी नर्तिका आहेस. " " देहविक्रय करीत नाहीं असा बहाणा करून जलशाची किंमत वाढवतेस, " असेंही तो म्हणाला.

**कुरंगी** : एवढें मात्र तो खरें बोलला. जलशाची किंमत वाढली आणि देहविक्रयही केला नाहीं. माझ्या गाण्यावर मोहून तुम्ही माझ्याशीं लग्न केलें. तेवढीच एक कला माझ्याजवळ होती, माझी स्वतःची—पवित्र भ्रष्ट न झालेली अशी. भ्रष्ट देहाचा देहविक्रय नाहीं केला पण गळ्यावर पोट भरलें तर मात्र समाजाला तो देहविक्रय वाटत नाहीं. आणि देहविक्रय केला असता तरी समाजानें नांवें ठेविलीं नसतीं. गरज आहेना पवित्र समाजाला पतितांची ? समाज पतितांना पत्करतो पण ते गायिका म्हणून, नर्तिका म्हणून, वेश्या म्हणून, गरती बायको म्हणून नव्हे.

मी गरती बायकांत येऊं शकत नाहीं यांत माझा काडीमात्र दोष नाहीं हें कोणत्या न्यायालयांत सांगणार ? कोणती तुमची पंचायत मला निवाडा देणार ? मला फक्त एक वेडी आशा. उराशीं बाळगून बसलें होतें मी. तुमच्या कुशींत तोंड खुपसून मनसोक्त रडावें, तुम्ही छातीशीं धरली नाहींत तरी तुमच्या पायाशीं मला जागा मिळेल. दासी म्हणून काबाडकष्ट करीन, पाळलेली कुत्री म्हणून दारांत उभी राहीन, या हरणीसारखी तुमच्या पायाशीं निपचीत पडून मरणाची वाट पाहीन. फार फार वेडी आशा होती



## कमलदलासम तुझ्या पाकळ्या

कमलदलासम तुझ्या पाकळ्या
मिटतां मिटतां पुन्हा उघडिसी;
मावळतीला भाद्रपदांतिल
तुझेच गहिरे रंग लुटविसी.

मदिरेच्या प्याल्यांतिल उरल्या
थेंबासम तूं उसवुन झरसी;
लुप्त कधींच्या ताऱ्यासम अन्
प्रकाश मागें विसरुन जासी.

स्वच्छंदाचें गाणें उधळुन
शब्दांतच तूं अडकुन पडसी;
गळ्या-मळ्यांतिल मिठि उस्कटतां
क्षणांत ओठांवरच्या छपसी

—पुरुषोत्तम शिवराम रेगे

मला. हजारों वर्षांचे संस्कार तुम्ही तोडावे. कुणी आजवर जगांत तोडले नाहींत. तुम्ही मला घ्याल असें वाटलें. मूर्ख मी ! पुष्कळ वेळां आत्महत्या करावीशी वाटली. पण मी माझें हृदय पाषाणाचें केलें जगलें मी !

**मोहन** : माझ्यासारखे. रागावून सूड घ्यायला ? निर्भर्त्सना करून शेवटीं आत्महत्या करायला ?

**कुरंगी** : मोहन ! कसें ओळखलें तुम्ही. पण निर्भर्त्सना—तुमची ? काय बोलतां हें ! प्रेमाशिवाय तुमच्याविषयीं दुसरी भावना माझ्या मनांत कधींच आली नाहीं

होय ! मीं निर्भर्त्सना केली. पण कुणाची ? माझ्याशीं लग्न करूं पाहाणाऱ्या, मला स्वतंत्र बंगला, मोटार देऊन सुखी करण्याचीं वचनें देणाऱ्या प्रत्येक नरपशूची. त्या शिकाऱ्यासारखी मी निर्भर्त्सना केली आहे. चार वर्षांत चारशें शत्रू उत्पन्न करून ठेवले आहेत मीं. त्यांत जर का एखादा राजकारणी महाभाग असला तर उद्यांच तडीपार होण्याचा हुकूम सुटायचा. हो ! समाजाला केवढा धोका आहे माझ्यासारख्या डिंवचलेल्या, उलटलेल्या कृमिजन्तूकडून. पण आज सारें पालटलें. दुपारीं तुम्हांला पाहिलें. तुमची मनस्थिति ओळखली. आज रात्रीं त्रिवट जीवाचे धागे धागे मोकळे केले. जीवाचा पीळ उसकटून टाकला. आत्महत्या करायला निघाले होतें मी.

**मोहन** : मला नाहीं खरें वाटत. काल नाच—गाण्याची बहार केलीस तूं !

**कुरंगी** : मी आतां शेवटच्या घटकेला कशाला लपवूं ? फायदा काय खरें खोटें बोलण्याचा ? मी तुम्हाला ओळखलें. मी जिवंत असेपर्यंत तुम्हाला झालेली हृदयाची जखम कधींच भरून येणार नाहीं तें मला समजलें. काल मी नाचले तें अखेरचें ! इतरांसाटीं नव्हे, तर तुमच्यासाठी मी नाचलें. मोहन ! काल माझ्या कलेचा तुमच्यासमोर मी होम केला. नृत्याच्या समेवर आयुष्याचा ताल संपवला. गाण्याच्या शेवटच्या तानेबरोबर, आशा, आकांक्षा, प्रेम दिगंतरावर फेकून दिल्या.

**मोहन** : कुरंगी !

**कुरंगी** : थांबा—मला पुरतें बोलूं द्या ! माझ्या आशेला मुळींच जागा नाहीं हें मला रात्रीं कळलें. तुमची जखम दुहेरी आहे. कदाचित् प्रेमानें मीं बरी केली असती. पण मेंदूवरची ? समाज वरचेवर प्रहार करीत असल्यामुळें ती सारखी वाहात आहे. दुहेरी जखम असाध्य असते. हें काय ? ही हरिणी कां चमकून उठली ?

[ काळवीट येतो. ]

**काळवीट** : हरिणी ! चल लवकर माझ्या मागोमाग ! आतां आपल्या देशांत कोणी येणार नाहीं.

**हरिणी** : आणि हरिणींचा कळप ? मला कशी येऊं देईल तुमची पट्टराणी ?

**काळवीट** : पट्टराणी—ती झाली पट्टराणी राजा नंतर दोनची. मी तुला सोडून गेलों त्या दिवसापासून त्यांचीं मनें विटलीं होतीं. काळ्या काळवीट आल्याबरोबर सारा कळप त्याच्या मागोमाग गेला. मी कशाला त्याच्याशीं लढाई देतों ? असल्या चंचल हरिणींचा समाज ! माणसाच्या समाजांत गुप्त पापें चालतात. एक खरें बोलत असेल तर शपथ. सगळे समाज इथून तिथून सारखे. त्यापेक्षां जोडीनें आमरण रहाणारीं कबूतरें बरीं.

मला क्षमा कर. मला मघांशीं धीर झाला नाहीं. ह्या कळपाचे कायदे झुगारून देणारा एक तरी काळवीट आहे तुझ्यापुढें. मी माणूस नाहीं सत्य, प्रेम, दया विसरायला ! तूं माझी हरिणी मला परत मिळालीस. तुझा दोष नव्हता, माझा होता, कळपाचा होता. आम्हीं तुझें रक्षण केलें नाहीं. तूं दुःख भोगलेंस. आणखी तुला दुःख कां जन्मभर ? त्या अजून न जन्मलेल्या अर्भकांना का शिक्षा ? चल, हळूहळू नदीकाटीं जाऊं कोवळें गवत खा, पाणी पी. हुशार हो. त्या जाळींतली तुझी आवडती जागा आठवली का ? चल, तिथें स्वस्थ नीज. चल, अशी मागें वळून कां पहातेस ?

**मोहन** : काळवीटा ! तूं जंगली असून आम्हां माणसांना लाजेनें मान खालीं घालावयास लावलेंस. तूं खरा माणूस झालास. नाहीं. चुकलों. मी माणूस नाहीं. मी तुझ्यासारखा काळवीट झालों आहे.

**काळवीट** : म्हणजे ?

**मोहन** : नाहीं कळायचें तुला तें. शिकल्यासुधारलेल्या माणसांना कळत नाहीं, कळलें तरी वळत नाहीं. तें तुला जनावराला काय समजणार ? अरे रागावूं नकोस असा ! शिवी नाहीं ही ! तुझ्यासारखें मी वागणार. मग समाज मलाही जनावरच म्हणेल. सत्य, न्याय, दया यांना रूढीपेक्षां, पूर्व कुजकट संस्कारांपेक्षां जास्त किंमत देणाऱ्या माणसाला जनावर म्हटलें तर तें भूषणच ठरेल. मी जनावर आहें आणि कुरंगी, पुढें ये—ही माझी पत्नी, तुझ्या भाषेंत मादी ! बरें—प्रिय हरिणी कुरंगी.

कुरंगी ! तंबूतून पक्वान्नाचा घांस आणून या हरिणीला दे. हरिणीचे—पवित्र मातेचे डोहाळे आहेत ते.

काळवीटा, चल आपण सगळेच बरोबर जाऊं. हा मानवी समाज येथें घोरत पडला आहे. चंद्रमा अस्ताला जात आहे. नव्या विचारांचा, नव्या मनूचा भानु उदयाचलावर येत आहे. माणसांनीं टाकलें तर या निसर्गोद्यानांत, या आभास सृष्टींत आपल्याला निवास मिळेल. या उद्यानांत सत्याचे, प्रेमाचे, भूतदयेचे धडे मिळतील. सभा—बेठकांतून नाहीं मिळणार

या आभास सृष्टींत आलों म्हणून आपलें पुनर्मीलन झालें. हरिणीचा, कुरंगीचा संसार पुन्हां सुरू झाला. कुरंगी ! मीलनाच्या दिवशीं तूं म्हटलेलें गाणें म्हणत म्हणत आपण जाऊं. चला—

सुखगिरिशिखरीं बसुनी पाहूं
भावी जीवित-स्तोत्र गाऊं !
भिन्न दिशांनीं वहात येतीं
नद्या संगमीं मीलित होतीं,
साम्य बघुनि निज प्रत्यय घेऊं !
दोन नयन परि एकच दिसतें,
भिन्न गतायू-भावी जुळतें
तार तान मी-मंद्र सूर तूं !
जुळलीं काष्टें वहात सागरीं
सहज प्रीति स्फुलिंगापरि
जीवित उजळत प्रभुपदिं जाऊं !!

—

शान्ता शेळके



शब्द करून पोपटाला रिझविणारी चंचल माशुक मैना, दीपकळीचा रंग पाहून वेहोषीनें झुरणारा पतंग आणि

# मी नागीण तूं केवडा..

अशी एकलेपणाची साद घालणारी ही नायिका पाहून तुम्हालाहि वाटेल—

मराठी लावणीवाङ्मयांत प्रकट झालेला निसर्ग हा जेवढा विविध स्वरूपांचा तेवढाच रमणीय आहे. लावण्यांतलीं निसर्गवर्णनें हीं संस्कृत काव्यांतील निसर्गवर्णनाप्रमाणें केवळ संकेताधिष्ठित नाहींत, अगर मराठी काव्यांतील निसर्गवर्णनांप्रमाणें बहुतांशीं कल्पनारम्यहीं नाहींत. लावणीवाङ्मयांतील निसर्गचित्रें हीं सूक्ष्म अवलोकनामुळें विनचूक वठलेलीं आणि आन्तरिक जिव्हाळ्यानें रंगलेलीं आहेत. मनांतील भावभावनांच्या ऊर्मींना कधीं संवादी तर कधीं विसंवादी पार्श्वभूमि म्हणून निसर्गांतील निरनिराळ्या दृश्यांचा मराठी लावणीकारांनीं भरपूर उपयोग करून घेतला आहे. यांखेरीज उपमा–रूपकें द्यावयालाही निसर्गाची त्यांना बहुमोल मदत झालेली आहे ती निराळीच. अर्थात् संस्कृतांतील निसर्गवर्णनांची व तद्विषयक संकेतांची मराठी लावणीवाङ्मयावर मुळींच छाप पडलेली नाहीं असें मात्र म्हणतां येणार नाहीं. प्रभाकर व रामजोशी हे लावणीकारांतले जे दोन प्रमुख 'तुरे' ते दोन्ही जातीनें ब्राह्मण असून संस्कृत काव्यसाहित्याचे ते मर्मज्ञ अभ्यासू रसिक होते. त्यामुळें त्यांच्या लावण्यांत संस्कृत साहित्यांतील ठराविक संकेतांचे वारंवार पुनर्दर्शन व्हावें यांत कांहींच नवल नाहीं. तथापि होनाजी बाळासारखा जातीचा गवळी आणि सामान्यतः अशिक्षित समजला जाणारा लावणीकारसुद्धां—

हार नव्हता मधीं साहत कसें आन
संकट वडवडलें ?
संसार भट पडो,
दोघांमधीं आड पर्वत पडले !

या आपल्या ओळींमध्यें—

हारो नरोपितः कण्ठे मया विरहभीरुणा
इदानीमन्तरे जाता सरित्सागरपर्वताः

या सुप्रसिद्ध संस्कृत श्लोकाची हुबेहुब प्रतिकृति वठवितांना पाहून आश्चर्य वाटतें. परंतु असें असलें तरी एकंदरीनें लावणीकार कवी हे निसर्गवर्णनें करतांना संकेतांवर अगर कल्पनेवर विसंबून राहण्यापेक्षां प्रत्यक्ष दिसणाऱ्या निसर्गाच्या सूक्ष्म निरीक्षणावरच अधिक भर देतांना आढळून येतात आणि म्हणूनच कीं काय, लावणीवाङ्मयांत प्रकटलेला निसर्ग हा अगदीं खराखुरा, जिवन्त, रेखीव आणि अस्सल मराठमोळ्या स्वरूपाचा वाटतो. या निसर्गाचें सौंदर्य मराठी मनालाच जाणवेल आणि त्यालाचें तें उमजून सोडील. लावण्यांतलीं अन्यकाळाचीं रसार्द्र वर्णनें





अनुक्रमणिका

वाचून ज्याचें अंतःकरण पर्युत्सुक होणार नाहीं असा सहृदय मराठी रसिक विरळाच. कालिदासाच्या 'मेघदूत' काव्यांतील 'आषाढस्य प्रथमदिवसे' पर्वतशिखरावर आरूढ झालेल्या मेघाचें वर्णन वाचून अगर जयदेव कवीच्या 'गीतगोविंदा'तील 'मेघमेदुर अम्बरा'चें चित्र कल्पनेनें डोळ्यांपुढें आणूनही आपलें चित्त स्थिरच राहतें. तथापि—

—झिरमिरे पर्जन्य बरसे
भर महिना श्रावण
कठिण लष्करची हवा दारुण !

किंवा—

येती सरीवर सरी सरसरुन
गगन भरभरुन पडे धरणी
होति धुंद दिशा चहुंकडे
पडेना दृष्टि दिसा तरणी

किंवा—

शिळंधार पर्जन्य झडीचा थंड सुटला
गारवा
उठा उठा वर चला
म्हणुन जणुं फिरे भंवति पारवा

हीं प्रभाकरानें केलेलीं पावसाळ्याचीं वर्णनें वाचून मात्र महाराष्ट्रांतील श्रावणमासाचें सारें लोभस रूपलावण्य हुबेहूब मनःचक्षूंपुढें उभें राहतें आणि आपलें हृदय रोमांचित होतें. प्रभाकराच्या काव्यांतलीही निसर्गविषयक सूक्ष्मदृष्टि आणि संवेदनाशील वृत्ति लावणीवाङ्मयांत इतरत्र तेवढ्या तीव्र स्वरूपांत सहसा आढळून येत नाहीं. तथापि दुसऱ्या कांहीं कवींनींही सुंदर ऋतुवर्णनें केलीं आहेत. होनाजी बाळाचेंच हें 'पाऊसकाळी'चें वर्णन पहावें—

बहुत विजा कडकडाट
त्यामध्यें सूर्यकिरण लोपले
एकसारखे मेघ सदोदित आभाळ झांकळलें
कठिण वाट डोंगरच्या जाळ्या
निबिड ओहळ धरियले
दोहीं थड्यांनीं पाणी नद्यांना
पूर भरुन चालले

प्रभाकर व होनाजी बाळा यांच्या काव्यांतलीं पावसाळ्याचीं हीं सुंदर शब्दचित्रें वाचलीं म्हणजे त्यांच्या रसिकतेचें व शब्दप्रभुत्वाचें कौतुक वाटतें. या चित्रांशीं तुलना करून बघतां—

हीं सुदें हवा घनगर्द करी उपमर्द
मदनकन्दर्द देत भडिमार
हा कहर जातिचा बहर मदनाची लहर
येति सरसरा
घनघोर गर्जती मोर तिमिर वर जोर
रात बहु थोर वाजे करकरा
सारे बिळांत नयन हे जळांत होत पळपळांत
जीव घाबरा

हें रामजोशीनें केलेलें पावसाळ्याचें वर्णन अगदींच सामान्य वाटतें. रामजोशीसारख्या प्रतिभासंपन्न कवीच्या काव्यांत निसर्गविषयक सौंदर्यदृष्टीचा मात्र अभाव कां असावा हा एक विचार करण्याजोगा प्रश्न आहे. पावसाळ्याच्या वर्णनाप्रमाणेंच इतर ऋतुवर्णनांच्या पार्श्वभूमीवर मानवी भावना चित्रित केल्यामुळें तीं वर्णनें अधिकच हृदयंगम वठलीं आहेत. उदाहरणार्थ 'ऐन उन्हाळ्यामध्यें कठिण मुलुखगिरी' करावयास निघालेला प्रभाकराच्या एका लावणींतला हा नायक आपल्या प्रियेचा निरोप घेतांना काय म्हणतो तें पहावें—

कंठ येतो भरभरुन मुलुखगिरी
कठिण लष्कराची
घामें मुखींचा कोण पुशिल मग
सय येइल घरची
येति उन्हाच्या झळीं स्वारि जाचेल
घोडयावरची
कोण खबर कळवील तुला गे नारी
प्रहराप्रहराची

आणि दुसऱ्या एका लावणीमध्यें—कदाचित् याच प्रियकराची प्रेयसी स्वारीवर गेलेल्या आपल्या जिवलगाची उन्हाळ्याच्या तापानें काय दशा होईल कोण जाणें म्हणून खंत करतांना गर्हिवरून म्हणते—

उष्ण कधिंग पाहिलें तयानें दुर पाठविलें
तरी कुणी
दिपूं नको विनविते दुपारीं ऐस ढगामध्यें
चूडामणी
वरुणा तूं वनामधिं खपून
ठायिं ठायिं जलें ठिव जपून
श्रीहरी जातिनें आपुण
सांभाळ करा स्वामिचा पदोपदिं गर्हिवर
मज दाटती

ऋतूंच्या वर्णनाप्रमाणेंच चांदण्यांतील व अंधारांतील प्रणयाचींहि अनेक वर्णनें लावण्यांतून आलीं आहेत. सुंदर चांदणें पडलेलें पाहून एक रसिक नायिका हर्षभरानें आपल्या प्रियकरास म्हणते—

चांदणें काय सुंदर पडलें
त्यांत पाखरूं तुम्हासारखें अवचित सांपडलें

तर याच शब्दांत किंचित् फरक करून दुसरी एक विरहाकुल स्त्री म्हणते—

—पडलें शुभ्र चांदणें मी काय करूं
अशा चांदण्यामध्यें नाहीं पांखरूं

चांदण्याची शोभा अधिक खुलविण्यासाठीं एक कामिनी आपल्या जिवलगाला सांगते—

—शीतळ चांदण्यामधें लावी
उदबत्त्याचें झाड

विरहतप्त जीवाला चांदणें तापदायक होतें परंतु प्रियकराच्या संगतींत तेंच चांदणें आल्हाददायक वाटतें हा संस्कृत वाङ्मयांतील प्रसिद्ध संकेत पुढील एकाच ओळींत किती प्रभावीपणानें सांगितला आहे पहा—

—आपण शीतळ असल्यास प्रभा चंद्राची
शीतळ दिसती

दुसऱ्या एका लावणींतला नायक जीवनाची क्षणभंगुरता पुढील शब्दांत आपल्या प्रियेला सांगतो—

—चांदणें दो दिवसांचें गार
पडतसे सर्वेच अंधःकार
पहा हा क्षणभंगुर संसार !

चांदण्या रात्रीचीं अनेक रसरम्य वर्णनें संस्कृत व मराठी काव्यांत आलेलीं आहेत. परंतु थोडक्याच पण अगदीं परिणामकारक शब्दांत केलेलें हें पुढील वर्णन पहावें—

—बहार हा झाला रात्रीं मोतिया फुलला
झुळझुळ वारा वाहतो चांदणं थंड ग
झगमग करिती तारे आकाशीं उदण्ड ग
पाहतां आनंद वाटे मनाला अखंड ग

लावण्यांतलीं चांदण्यांचीं वर्णनें सुंदर असावींत यांत नवल नाहीं. परंतु अंधाऱ्या रात्रींचीं वर्णनेंहि लावणीकारांनीं आकर्षक रीतीनें केलेलीं पाहून विस्मय वाटतो. संस्कृत काव्यांत मध्यरात्रीं प्रियकराच्या भेटीस जाणाऱ्या अभिसारिकांचीं चित्रें अनेकदां रंगवलेलीं आढळतात. आतां होनाजी बाळाच्या लावणींतली ही एक अभिसारिका पहा. ती म्हणते—

पाऊस वर पडतो आहे रात्र सख्या अंधारी
भिजतें तुजसाठीं केव्हांची द्वारीं !

दुसरी एक नायिका आपल्या पतीचा अनुनय करतांना त्याला म्हणते—

तुम्ही सर्वगुणसंपन्न प्राणप्रियकरा
कांहीं माझी किंचित् माया करा
छळूं नये असें कुळवन्ताच्या लेकरा
जन्माची अक्षयीं झालें [illegible]
दोहीं घरची मी मापुक श्रीमंतिण

नंतर मध्यरात्र उलटून गेल्याचें ती कसें सूचित करते पहा—

—झाली रात्र गजर दोन प्रहराचा वाजला
शनि चंद्र मंगळ माथ्यावरतीं आला !

लावणीवाङ्मयांतलीं फुलांचीं वर्णनें तर इतकीं विविध आणि विपुल आहेत कीं, 'लावणीकार कवींची पुष्पसृष्टि' म्हणून एक निराळाच विस्तृत लेख सहज लिहितां येईल. प्रभाकर, सगनभाऊ,

होनाजी बाळा यांच्या काव्यांतून फुलांनीं बहरलेल्या बगीच्यांचीं तपशीलवार वर्णनें वरचेवर पहावयास मिळतात आणि हीं वर्णनें केवळ कल्पनेवर विसंबून न राहतां प्रत्यक्ष तसे बगीचे पाहूनच मग केलेलीं असावींत असें वाटण्याइतकीं तीं वैशिष्ट्यपूर्ण वटलीं आहेत. प्रभाकराच्या लावण्यांतलीं हीं पुढील वर्णनें बघा—

'केली मजसाठीं रंगित हवेली खाशी
छतें आरश्यांचीं बसवीलीं रंग गुलबाशी
हवाशिर उडती कारंजीं ठायीं ठायीं
छट्या निट गेल्या गुलछबू फुलल्या जाई

त्याप्रमाणेंच आणखी या एका बागेची शोभा पहाण्यासारखी आहे—

सुफल प्रफुल्लित थंड निबिड तरु
बहु बसले चौसरी
बहार घ्या बंगल्यांत बसुन या
वसंतऋतु अवसरी
निपाल जागा स्वच्छ सभोंती सपाट पटांगणें
रंगसुरंगित सुरेख सगळीं ठायिं ठायिं
चैत्रांगणें
मधुनमधुन किति दाट थाट तरु केळि फुलें
फुलगणें
क्रीडा करुन छावलींत घेती कबुतर लोटांगणें
--जाइजुई जास्वंदी गुलाला
गुलाब गुलदावरी
सुवर्णचंपक बकुलमोगरे सुरंगि फुलशेवरी
इश्कपेंच गुलछबू सदोदित
भर शेवंती सांवरी
पार्वानक गुलटोप गुलगुलित
जाळिं कमळण बावरी

फुलांप्रमाणेंच फळांचीं वर्णनेंहि लावण्यांतून भरपूर ठिकाणीं आलेलीं आहेत. एका गरोदर स्त्रीचे डोहाळे पुरविण्यासाठीं तिच्या पतीनें तिजकरितां आणलेलीं हीं फळें पहा—

—ओले नारळ फणस केळे
दाळिंबें द्राक्षें–ढवळे
घोंस खिरण्या खजुर पिंवळे
अंजिर आणि आंबे आंवळे
रामफळें सिताफळें, जांभुळ जांब बोरे

तथापि फुलांचीं अगर फळांचीं हीं स्वतंत्र वर्णनें वाचण्यापेक्षांहि उपमा व रूपकांदाखल फळं-फुलांचा जो उपयोग लावणीकार कवींनीं करून घेतला आहे तो बघणें अधिक मनोरंजक आहे. स्त्रियांच्या विविध अवयवांचीं वर्णनें करतांना फळांच्या व फुलांच्या सुंदर उपमा लावण्यांतून दिलेल्या आढळतात. क्वचित् प्रसंगीं त्या अश्लील असल्या तरी अभिव्यक्तीच्या दृष्टीनें त्या फारच श्रेय आहेत असें म्हटल्याखेरीज राहवत नाहींत. प्रभाकर एका लावणींत नायिकेचें वर्णन पुढील शब्दांत करतो—

स्तन छातिवर बुंद गेंद जणुं
गुलाब बहरामधिं फुलती
वसंतकाळीं कळे कोवळे तसे
तुझे जोबन खुलती

तर दुसऱ्या एका लावणींत एक आत्मप्रेमी (नार्सिसिस्ट) मनोवृत्तीची स्त्री स्वतःच स्वतःच्या सौंदर्याचें वर्णन कसें करते पहा—

--मऊ मऊ फूल मखमूल
तसें शरिर गुलगुलित सुगंधिक जसें
गुलाबी फूल
मलाच माझें स्वरूप पाहवेना उगीच
पडते भूल

एक नायक आपल्या प्रेयसीला 'पिंवळ्या नागवेलीं'ची उपमा देतो तर एक नायिका आपल्या प्रियकराला 'गोड गोड द्राक्षाच्या घोंसा'ची उपमा देते. प्रभाकराच्याच लावणींतील प्रकार स्त्रीनें आपल्या शृंगारवर्णनांत दाखविलेली ही 'रंगदृष्टि' आजच्या कवींना नावीन्यपूर्ण वाटेल—

अरे सख्यारे तूं पिंवळें चंपक फूल
अरे सख्यारे मी नार पिंवळी मखमूल
अरे सख्यारे करीं पिंवळी कळी डुलडूल
गुलगुलित अशी नादर विरळा!

याखेरीज 'देहकांति कर्दळीचा गाभा', 'दन्त डाळिंबाचे दाणे', 'लिंबापरि मुसमुसलें तारुण्य' या उपमा लावणी वाङ्मयांत वरचेवर दिसून येतात. आपल्या प्रीतीची परिपूर्णता झाली हें सांगतांना एका लावणींतला नायक खुषींत येऊन आपल्या प्रेयसीला म्हणतो—

डागरचे आवळे समुद्राचें मीठ
गोडी अकल्पित झाली अवीट
खुडुं नको प्रीतिचा नखलुन देठ

तर आपल्याला नाकारून भलत्याच्याच गळ्यांत पडणाऱ्या चंचल प्रेयसीचा धिक्कार करतांना एक नायक तिला म्हणाला—

अमृतफळ टाकून खातिस शुद्ध पिकलीं वांगीं

ही उपमा सुंदर नसली तरी यथार्थ नाहीं असें कोण म्हणेल? एका नायकानें आपल्या बांधेसूद प्रेयसीचें 'जशी पोकळ फळी भरली' असें वर्णन केलें आहे तर एका नायिकेनें आपल्या प्रियकराला 'तुम्ही माझें तुळशीवृन्दावन' म्हणून गौरविलें आहे!

फळीफुलांच्या उपमांप्रमाणेंच निसर्गातील सजीव प्राण्यांच्या उपमाही लावण्यांमधून भरपूर दिसून येतात. विरहिणी स्त्री ही 'भालूप्रमाणें सुकलेली' किंवा 'वाळूंतील मत्स्याप्रमाणें तळमळणारी' असावयाची हें ठरलेलेंच.

संस्कृत काव्याप्रमाणेंच लावण्यांमधूनहि सुंदर स्त्रीला 'मृगनयना' 'सिंहकटि' 'गजगामिनी' म्हणून तिची स्तुति केलेली आढळते. तथापि कांहीं उपमा मात्र खास लावण्यांतच दिसून येतात. त्या अन्यत्र आढळावयाच्या नाहींत. उदाहरणार्थ पुढील लावणीच्या या प्रारंभीच्या ओळी बघाव्यात.

झुलत खुलत डौलांत कमर
हलहलवित नखऱ्यानें
ठुमक चाल चौरंगी कबुतर
झडपी कुऱ्यानें

याप्रमाणेंच 'मानें पाहून पिंगळे फळती', 'मी एक बंगाली मैना अशी' या उपमा खास लावणीवाङ्मयांतल्याच आहेत.

उत्कट प्रीतीचें वर्णन करतांना संस्कृत काव्यांत मेघ–चातक, चंद्र–चकोर, पुष्प–भ्रमर या जोड्यांचे दाखले देतात. उर्दू साहित्यांतहि गुलाब–बुलबुल किंवा शमा–परवाना हीं अमर प्रीतीचीं ठराविक उपमानें आहेत. लावण्यांतूनही अशीं अनेक उपमानें आपणांस दिसून येतात व तीं वैशिष्ट्यपूर्ण असतात. पोपट–मैनेचा किंवा राघू-मैनेचा जोडा हें प्रेमाचें प्रतीक केवळ मराठी लावण्यांतूनच आपणांस पहावयास मिळतें. याखेरीज नागीण–केवडा, शेवंती–गुलाब, ललडी-लाल, चांदणी–चंद्र, कोकिळा–वसंत अशा कितीतरी जोड्या रमणीवल्लभांच्या उपमानादाखल मराठी लावण्यांमधून उपयोगांत आणलेल्या दिसतात. होनाजी बाळाच्या पुढील काव्यपंक्ती आपल्या 'प्रेम आणि मरण' या सुंदर कवितेच्या अग्रभागीं देऊन गडकऱ्यांनीं त्या केव्हांच मराठी काव्यसाहित्यांत अमर करून ठेवल्या आहेत—

जगीं सांगतात प्रीत पतंगाची खरी
झड घालून प्राण देतो दीपकाचे वरी

तथापि याच आशयाच्या व हीन प्रेमाची उत्कटता व्यक्त करणाऱ्या आणखी कितीतरी काव्यपंक्ती लावणीवाङ्मयांत जागजागीं विखुरलेल्या दिसून येतात. त्यांपैकीं पुष्पसृष्टींतल्या कांहीं दाखले देण्याचा मोह अनिवार होतो. 'मज कमळिणीवर पहिल्यापासून इच्छा तुझि मधुकरा', 'मदनबाण तुम्ही मी कळी जाईची', 'मी पिंवळी पाकळी, पिंवळा प्राणसखा चांफ्याची कळी', 'तुम्ही वृक्ष मी साउली' या ओळींतल्या कल्पना जेवढ्या उत्कट तेवढाच त्यांतील भावहि हृदयंगम आहे. यापेक्षांहि प्राणिसृष्टींतून जीं उपमानें घेतलेलीं आहेत तीं अधिक आकर्षक वाटतात. या दृष्टीनें पुढील ओळींतल्या उपमा बघण्याजोग्या आहेत.

—मी नागिण चालिन झडा तूं एक केवडा
—चंचल मैना बांधुन पैना आणि सजणा
भेटाया
—लावण्यगाळी कोकिळा तुम्हाला आहे मी
राजा
—दीपकळीचा रंग पाहुनी पतंग झुरतो
मनीं
—वसंतकाळीं दुरें अंतरलें तुम्हास मी
कोकिळा
—राजहंस पक्ष्यांचा मिलाफ करवे भगवाना
-लंपट स्वरूपावरून पांखरावाणी फिरेन
भंवतीं
—हंसिणी कधिं ग करशिल न्याहाल हंसाशीं
—आधिंच मंदिर सर्व सुशोभित
माधिं सापुक मैना
शब्द करुन पोपटा रिझवितें
तुज राजिव नयना !

या उपमांवरून लावणीकारांचें निसर्गांतील प्राणिसृष्टीचें सूक्ष्म निरीक्षण, त्यांची रसिकता व व त्यांची भावोत्कटता या सर्व गोष्टी एकदमच व्यक्त होतात.

निसर्गांतील कांहीं घडामोडी पाहून त्यांवरून विशिष्ट सिद्धान्त काढण्याची किंवा कांहीं बोध घेण्याची प्रवृत्ति लावणीकार कवींत सहसा दिसून येत नाहीं. किंबहुना तत्त्वविवेचक आणि अन्तर्मुख वृत्तीचा अभाव हें लावणीवाङ्मयांतलें एक ठळक वैगुण्य आहे. तथापि असें असूनही, अगदीं क्वचित् कां होईना, पुढील पंक्तींसारख्या विचार-गंभीर कल्पना लावण्यांमध्यें अधूनमधून दिसतात. सगनभाऊच्या एका लावणींतली ही नायिका म्हणते—

भर नवतीचा बहार ऋताचा पहा नेत्र
भरून
नानापरिचीं पुष्पें सुकती सुवास देना
फिरून

प्रभाकरानें चांदण्याचा दाखला घेऊन जीवनाची क्षणभंगुरता दर्शविली आहे—

चांदणें दो दिवसांचें गार
पडतसे सवेंच अंधःकार
पहा हा क्षणभंगुर संसार

तर आणखी एक कवि म्हणतो—

दुपारची सांवली नाहीं धन दौलतिचा
भरंवसा

वर दिलेल्या निरनिराळ्या उदाहरणांवरून लावणीवाङ्मयांत प्रकट झालेल्या निसर्गाचें चित्र डोळ्यांपुढें उभें राहिलें. हें चित्र अगदीं संपूर्ण नसलें तरी प्रातिनिधिक स्वरूपाचें खचित आहे. अनेकांनीं लावण्या लिहिलेल्या आहेत. तथापि रामजोशी, प्रभाकर, होनाजी बाळा, परशराम, सगनभाऊ, अनंतफंदी हे सहा लावणीकार त्यांतल्यात्यांत प्रमुख समजले जातात. म्हणून वरील विवेचनांत या सहा जणांचें काव्यच प्रामुख्यानें विचारांत घेतलेलें आहे. एक रामजोशी वगळला तर बाकीच्या पांचांहि जणांना निसर्गाचें सूक्ष्म निरीक्षण करणारी दृष्टि व त्या निसर्गाचें यथायोग्य शब्दचित्र रंगविणारी कुशल प्रतिभा लाभलेली होती यांत कांहीं शंका नाहीं. विशेषतः प्रभाकराच्या काव्यांत हें कौशल्य इतरांहूनहि अधिक मोठ्या प्रमाणांत व्यक्त होतें. या प्रतिभासंपन्न कविला रंग-रूप-रस-गंधाची प्रतीति अत्यंत तीव्रतेनें येत असावी असें वाटतें. त्याची ही संवेदनशीलता प्रत्यक्ष पाहिलेल्या निसर्गाच्या वर्णनांत तर दिसून येतेच पण जेव्हां तो काल्पनिक वर्णनें करतो तेव्हां तींसुद्धां अतिशय प्रभावी वठलेलीं असतात. उदाहरणार्थ त्याच्या 'मुरली'-तले हें पुढील वर्णन बघावें—

—निर्वैर धरित्री झाली चालित व्याघ्र
करींना
भेटतात सन्मुख अंगें शार्दुल आणि शरभ
हरींना
निर्जिवां सये शिव झाले श्रव सुटती महान्
गिरींना
नवपल्लव तरुंना फुटती
गरगर्जुन मधुकर उडती
अन्तरिक्षिं तारे तुटती
अंबरांत नाद न मायें
मुरलीनें मन अवघ्याचें मोहिलें गं
सखये बायें

प्रभाकराप्रमाणेंच सगनभाऊही अत्यंत संवेदनाक्षम होता. तथापि या दोघांचेंहि काव्य अश्लीलतेच्या दोषानें डागळलेलें पाहून वाईट वाटतें.

लावणीकार कवींच्या काव्यांत निसर्गाचें सूक्ष्म निरीक्षण व त्याचें यथातथ्य चित्रण आढळून येत असलें तरी त्यांचें हें चित्रण सर्वस्वीं निर्दोष आहे असें मात्र मुळींच नाहीं. अश्लीलता हा एक मोठा दोष बहुधा प्रत्येक लावणीकाराच्या काव्यांत ओंज्यबहुत प्रमाणांत आढळतो. लावण्यांत अश्लीलता कां आली हा प्रश्न कुणी साहित्यशास्त्राच्या दृष्टीनें सोडवो अगर कुणी समाजशास्त्राच्या दृष्टीनें सोडवो, ती अश्लीलता लावण्यांत आहे हें मात्र नाकारतां येत नाहीं. लावणीकार कवींच्या निसर्गचित्रणांतहि क्वचित् ही अश्लीलता दिसते व त्यामुळें त्या त्या ठिकाणीं रसभंग होतो यांत मुळींच शंका नाहीं. लावणीकारांच्या निसर्गवर्णनांतला दुसरा मोठा दोष म्हणजे त्याच त्याच पद्धतीचीं टोकळेबाज वर्णनें. 'गव्हळी नागीण' 'पिवळी कवळी नागवेल' या कल्पनांची वीट येईपर्यंत पुनरावृत्ति आलेली दिसते. संस्कृत काव्याच्या अगर पंडिती काव्याच्या ठराविक वर्णनपद्धतीपासून व संकेतांपासून लावणीकार कवी कसोशीनें अलिप्त राहिले याबद्दल त्यांचें जरूर अभिनंदन करावयास हवें. परंतु त्यांची स्वतःची म्हणून जी एक विशिष्ट परंपरा होती तीपासून त्यांना फारसें अलग राहतां आलें नाहीं हें खरेंच आहे. प्रत्येक कवि हा आपल्या वेळच्या समाजपरिस्थितीनें व काव्यसंकेतांनीं बद्ध असतो. लावणीकार कवीही या नियमाला आपवाद नव्हते. यामुळें त्यांचें सर्वांचें बरेंचसें काव्य एका ठराविक सांच्याचेंच झालेलें आहे. त्यांतल्यात्यांत प्रतिभेची कांहीं स्वतंत्र चमक रामजोशी व प्रभाकर या दोघांनींच दाखविलेली दिसते. लावणीकार कवींच्या निसर्गवर्णनांतला तिसरा मोठा दोष म्हणजे त्यांत असणारा अन्तर्मुख वृत्तीचा अभाव. निसर्गाचीं सुंदर, रसपूर्ण व जिवन्त चित्रणें करतांना मानवी मनांत आणि निसर्गांत जी एक विशिष्ट सहसंवेदना असते, मानव हा निसर्गाचाच एक भाग असल्यामुळें निसर्गांतील विविध घडामोडींची त्याच्या मनावर जी प्रतिक्रिया होते त्या सहसंवेदनेचें त्या प्रतिक्रियेचें चित्र लावणीवाङ्मयांत सहसा कुठें रेखाटलेलें दिसत नाहीं. कालिदासानें एके ठिकाणीं म्हटलें आहे—

रम्याणि वीक्ष्य मधुरांश्च निशम्य शब्दान्
पर्युत्सुकी भवति यत्सुखितोऽपि जन्तुः

म्हणजे, रम्य दृश्यें पाहून आणि मधुर शब्द ऐकून सामान्यतः सुखी माणसाचें चित्तही पर्युत्सुक होतें. निसर्गांतील भव्य, भीषण किंवा सुंदर दृश्यें पाहून माणसाच्या मनाला ही जी—'पर्युत्सुकता' येते तिचा पडसाद लावणीवाङ्मयांत कुठेंही उमटलेला आढळत नाहीं. किंवा ताम्ब्यांसारखा कवि निसर्गांतच जसें परमात्म्याचें स्वरूप पाहूं शकतो ती 'परतत्त्वस्पर्श' पाहण्याची वृत्तीही लावणीवाङ्मयांत कुठें दिसून येत नाहीं. लावण्यांतलीं निसर्गवर्णनें रमणीय असलीं, जिवन्त असलीं तरी तीं अत्यंत बाह्य स्वरूपाचीं, अतिशय 'पार्थिव' आहेत यांत शंका नाहीं व म्हणूनच तीं वाचतांना मनाला कुठें तरी मधूनच खटकल्यासारखें होतें.

लावणीवाङ्मयांतील निसर्गवर्णनातले हे सारे दोष जमेला धरले तरी त्या वर्णनांत रसरशीतपणा आहे, जिव्हाळा आहे, रसार्द्रता आहे आणि एक कणखर व निरोगी अशी वेहोषीहि आहे. लावणीकारांनीं साहित्यशास्त्राचे नियम काटेतोलपणें पाळलेले नसले तरी या नियमांनाही गुंडाळून ठेवणारा असा एक विशिष्ट 'सजीवपणा' त्यांच्या काव्यांत आहे. अस्सल मराठमोळा निसर्ग, मराठमोळ्या डोळ्यांनीं त्यांनीं पाहिला व तो रांगड्या पण जोमदार अशा मराठमोळ्या भाषेनें त्यांनीं वर्णन केला. त्यांच्या काव्याचें वैशिष्ट्य हेंच. या वैशिष्ट्यानें नटलेल्या त्यांच्या लावण्या आजही रसिकांच्या मनाला निर्भर आनंद देतात आणि कांहीं वेळ कां होईना एका वेगळ्याच कल्पनारम्य सृष्टींत त्या त्याला घेऊन जातात. म्हणूनच कोणत्याहि काव्यप्रेमी व निसर्गप्रेमी रसिकानें लावणीवाङ्मयांतल्या निसर्गाचें दर्शन एकदांतरी जरूर घ्यावयास हवें.





● कमलाक्षीच्या ज्या पदराच्या योगानें वाऱ्यापासून दीपाचें प्रथम संरक्षण झालें, तोच पदर पुढें त्यास अस्तास पोंचविण्यास कारणीभूत झाला ! तेव्हां दैव प्रतिकूल झालें असतां मित्रही शत्रू बनतात हेंच खरें.

मनमोहन



दुधाच्या, अत्तराच्या आणि शेवटीं औषधाच्या बाटलींतून माणूस आपलें साधें जीवन जगत असतो; पण हा

# तेलाच्या बाटलींतील माणूस

आज तुम्हाला आपली विचित्र, रहस्यमय आणि करुणरम्य कहाणी सांगत आहे—

......एका महिन्यापलीकडली...म्हणजे सप्टेंबरांतलीच ही हकीकत आहे. दादरला गणेशोत्सवांत व्याख्यान द्यावयासाठीं मी गेलों होतों. व्याख्यान रात्रीं होतें. ज्या मंडपांत व्याख्यान झालें त्याच मंडपांत रात्रीं माझा बिछाना टाकला होता. परंतु त्या रात्रीं मला झोंप अशी आलीच नाहीं. पुष्कळ रसिक मंडळी कडें करून माझ्या-भोंवतीं 'काव्यविनोद' करीत बसली होती. रात्रींच्या कॉफींत पहांटेचें दूध घालून आम्हीं प्यायलों. सारेजण बोलत होतें. पण एक जण अगदीं 'इळी-मिळी' होता.

......हिरवा कोट त्याच्या अंगांत होता. कोट म्हणजे बुशकोट...त्यानें केंस नटासारखे खूप वाढवले होते. ऐतिहासिक नाटकांत अनावर रागाचा आविर्भाव करण्यासाठीं ललाटावरल्या बटा शेंदाड नटाला जशा 'उडवून' मागें न्याव्या लागतात...जाऊं दे,...कांहीं मनांत योजिलें होतें. कल्पनांचा गोंधळ उडाल्यासारखा वाटतो. असा गोंधळ उडणें म्हणजे कपाळाभोंवतालच्या जागेंत अक्कल या नांवाचा पदार्थ 'बेतास बात' आहे याची कबुली देणेंच. आपल्याच बेअकलीपणाचें असें प्रदर्शन रसिकां-समोर करणें म्हणजे एक खुळेपणाचें लक्षण. पण इतरहि तेंच करत आले आहेत. कशावरून निघालं बरं हें? आतां हें सांगायचं म्हणजे वरच्या चार ओळी वाचावयास पाहिजेत. आणि खालचें लिहीत असतांना 'आम्ही' जर वरचें वाचू लागलों तर मग त्यांत आमचा मोठेपणा तो काय राहिला?

कशावरून का निघेना? मला एवढें आठवतें कीं त्या हिरव्या बुशकोट घातलेल्या मुलापाशीं येऊन आपण थांबलों होतों. मेंदूला द्राविडी प्राणायाम् करून ज्ञान सांगावयाची संवय नसती तर एव्हांना आपण या प्रस्तुत कथेचे पुण्याहून निघालेले घाट ओलांडून कर्जतपर्यंत येऊन पोंहोचलों असतों. कर्जत...हिरवें निशाण...तांबडें निशाण...तिकीट प्लीज!... गेले सर्व महिना प्रवासांत गेल्यामुळें हल्लीं मला अनेक वेळां एखाद्या ल्हान खोलींत जरी मी शुद्धीवर बसलेलों असलों तरी आगगाडीच्या डब्यांत बसल्यासारखें वाटतें.

एखाद्या माणसाला टाळावयाचें असलें म्हणजे आपण दुसऱ्या रस्त्याला जातों. प्रतिभेचें एका कठीण व्यक्तिदर्शनासाठीं मला टांक हातांत घ्यावयास भाग पाडलें आहे; परंतु माझ्यांतल्याच कांहीं शक्तींनी त्या व्यक्तीचें नोट-

चित्रण होणें अशक्यप्राय वाटतें आणि म्हणूनच त्या हिरव्या कोटाच्या मुलाची ओळख करून देतां देतां टांक एवढा तिरका सरकला.

असें भिऊन चालावयाचें नाहीं. नागपूरची नर्मदा आणि सीताबर्डीचा सदाशिव यांचीं वर्णनें वाचून चिडलेल्या रसिक मनीला नीट रंजवावयाचें असेल तर नव्या लेखकानें कांहीं तरी साहसानेंच लिहावयास हवें.

मन आढेवेढे घेत असतांनाच माझी प्रतिभाशक्ति पुन्हां त्या 'हिरव्या' रंगाकडे धांवते आहे. गार्टरचा बंद तुटतांच रेशमी मोजा खालीं घरंगळावा तशी माझी प्रतिभा माझ्या मनाला दूर सारून त्या वाढवलेल्या केसाच्या हिरवा बुश कोट घातलेल्या मुलाकडे धांवत धांवत जाऊन पोहोंचली

...मी त्याच्याकडे पाहूं लागलों. मला नवल वाटलें होतें. साऱ्यांचीं थोबाडें वाजत असतांना हा निमूट बसला होता आणि त्याच्याकडे पहात असतांना मला एका कल्पनेचें हसूं आलें. आतांपर्यंत माझ्याभोंवतीं जमलेल्या, बडबडणाऱ्या मुलामुलींचा हेतु माझें लक्ष वेधून घेण्याचाच होता. बोलून माणसाचें लक्ष वेधून घेता येतें ही गोष्ट खरी, परंतु त्या वेळीं मी जेव्हां मनाशीं विचार करूं लागलों तेव्हां अनुभव अगदीं उलटा आला. आत्तापर्यंत बडबडणाऱ्या, प्रश्न विचारणाऱ्यांपेक्षां या अबोल राहिलेल्या मुलानेंच माझें लक्ष वेधून घेतलें होतें. मी त्याच्याकडे पहात होतों. त्याचा वर्ण...?केशरपाण्यांत भिजवून काढलेल्या पिवळ्या सोनचाफ्याच्या फुलाप्रमाणें त्याचा रंग दिसत होता. एकदम पहाणाऱ्याला तो कॉलेजमधला एखादा गुजराथी विद्यार्थी असें वाटलें असतें. थोड्या वेळानें तो डावखोरा नाहीं याचा प्रत्यय आल्यानंतर हा एखादा मराठी रंगभूमीवरील उदयोन्मुख स्त्री–नट असावा असें वाटलें असतें. नंतर तो वेळीं अवेळीं जरूरीपेक्षां जास्त मुरके मारतो आणि भिवया, 'नाकतोड्या' सारख्या उडवून बोलतो याचा प्रत्यय आल्यावर तो 'भावगीत गायक' असावा असा त्यांनीं निर्वाळा दिला असता.

—आणि खरेंच तो एक लेकाचा भावगीत गायक होता. उदयोन्मुख होता का अंतर्मुख होता हें आपणाला पुढें कळेलच. भाव (?) गीत गायक!

मी त्याच्याकडे लक्षपूर्वक पहात आहें ही गोष्ट त्याच्या लक्षांत येणें शक्य नव्हतें. कारण त्याचें लक्ष मंडपाबाहेरील एका चाळींतल्या गॅलरींत बसलेल्या एका 'साळुंकी' कडे लागलें होतें. त्याची अगदीं तंद्री लागली होती असें म्हटलें तरी चालेल. अडकित्त्यांत सुपारी कांपतां कांपतां पोक्त माणसानें मदनदहनाची गोष्ट सांगावी तसें 'तिकडे' पहात असतांना तो बुशकोट आपल्या ओटांच्या दोन पात्यांमध्यें 'सांग गोरी सांग सारें' हें पद वेतावयासाठीं कातरीत होता. त्याच्या ओटांची हालचाल कांहीं वेळानें एवढ्या भावविवशतेनें होऊं लागली कीं शिंप्यानें काचोळीचें माप 'अंगा'वर घ्यावें तसें तो हें पद तिच्यावर, त्या साळुंकीवरच वेतीत आहे असें वाटत होतें. (कल्पना नवीन आहे, रसिकानें जरा ती कष्टपूर्वक ग्रहण करावयास हवी!)

मी त्याच्याकडे पहात आहें नि त्याचें लक्ष तिसरीकडे आहे. ही गोष्ट माझ्या भंवतीं बसलेल्या एका फटकळ माणसाच्या लक्षांत आली. पुढें मला अनुभव असा आला कीं त्या हिरव्या बुशकोटासंबंधीं बोलतांना 'सारीच मंडळी' फटकळ होऊं शकत होती.

"अहो! जरा इकडे बघा कीं! मनमोहन तुमच्याकडेच पहात आहेत. आणि तुमची तंद्री तर......" प्रथमदर्शनीं ज्यांचा मी फटकळ म्हणून उल्लेख केला ते नाबर नांवाचे गृहस्थ 'भावगीता' कडे पाहून म्हणाले.

परंतु ब्रम्हानंदी...नव्हे साळुंकीनंदी लागलेली टाळी अशा चार शब्दांची लाही फुटून भंग पावणारी नव्हती.

मग?

कांहीं 'इश्श'!

कांहीं 'अय्या'!!

कांहीं 'गडे'!!!

कांहीं 'अरे ए'!!

या सर्वांनीं आपल्या गालांचे 'हॉर्नस्' बराच वेळ वाजवले आणि मग तो अनिरुद्ध आपल्या सावळ्या साळुंकीच्या सुंदर स्वप्नांतून (कसें 'स! स!' जमून आलें आहे, कमाल आहे अनुप्रासाची!) कुंभकर्णासारखा जागा झाला आणि महादजी शिंद्यानें वानवडीला असलेल्या आपल्या छावणींतल्या डेऱ्यांतून इतमामानें बाहेर पडावें तसें आपल्या पातळ पापण्या उलगडून ७५ च्या अँगलनें हिरव्या बुशकोटाची दोन्हीं बुबुळें माझ्याकडे पाहूं लागलीं.

"क्षमा करायची हं मला, माझं चित्त चवचाल, चाळवलं होतं किंचितसं! या नाबरांनीं, या तालीमांनीं, या गडकऱ्यांनीं, या कोतवालांनीं, या तेलंगांनीं जर कीं नई मला वेळीच सावध केलं नसतं तर...आणि तेलंगाप्रमाणेंच या प्रभाताई नामजोशी, या गुलाब माहीमकर याऽयाऽया मेनका जोगळेकर, या या झेलम मेणवलीकर यांनी कीं नई जर माझ्या मानसहंसाला वेळींच जागृती दिली नसती तर मनमोहन काय सांगूं? कसं सांगू? तुम्हाला..."

"ए! तूं नको बडबड करूंस. च्यायला...! जेव्हां बघावं तेव्हां आपलंच घोडं पुढं दामटायचं! काय सांगूं मनमोहन, ही अशी वल्ली आहे! तुम्ही आतां तिकडें लक्ष दिलं म्हणून! नाहींतर आम्ही कांहीं ओळख करून देणार नव्हतों या माणसाशीं तुमची!" फटकळ नाबर मला म्हणाले.

"घाल मुंड्या पाताळ धुंड्या आहे"—गडकरी म्हणाले.

"चालेल एकीकडे, बोलेल भलतीकडे, पाहिल तिसरीकडे आणि म्हणेल गडे गडे आणि नजर इकडे तिकडे चढे! खाईल गुलाबी गालांचे पेढे, माजवील बखेडे, देईल प्रीतिचे वेढे, त्याच्या हृदयाचं कबूतर दहा चाळींच्या कौलांरावरून उडे." एक होतकरू कवि म्हणाले.

"अय्या! किती 'डे' जुळविले त्यांनी!" ह्या होतकरू कवीचा जीव ज्या जॉर्जेटच्या साडीच्या झोळींत अडकला होता तिचेच शेंदरी ओठ वरील 'अय्या'ची शेंडी पकडण्यासाठीं फडफडले.

"असले डे ला डे जुळविले म्हणजे काव्य होत नाहीं! नाहीं का हो मनमोहन? होय कीं नाहीं हो मनमोहन? मी म्हणतों तें बरोबर आहे कीं नाहीं? तुम्हींच सांगा न मनमोहन? असे 'डे'ला 'डे' जुळवितां मला नाहीं का येणार? मी त्या राजकवि बनारसे यांचें एक भावगीत बसवलं होतं. त्यांत तर तेरा ओळींत ७३ 'डे' होते. डे डे म्हणजे काय? आजसुद्धां 'संडे' आहेच ना!"

...हिरवा बुशकोट थोडा धीटपणा पत्करून उदयोन्मुख कवीकडे आणि त्याच्या प्रिय 'साडी'कडे पहात पुटपुटला.

"हेही भावगीतगायक आहेत हं मनमोहन! ह्याना सांगा ना म्हणायला? हो म्हणतील मग." राजवर्खी बांगड्या पुटपुटल्या.

भोंवतालचें वातावरण थोडेसें नको तेवढें गमतीदार आहे असें मला वाटलें. चार मंडळींत कुठल्यातरी एका व्यक्तीची टिंगल उडालेली मी न रागावता पाहूं शकत नाहीं.. मी स्वतःच थोडासा अधिक गंभीर झालों.



## शेतकी अवजारें निर्मात्यांच्या
# आ–घा–डी–व–री–ल
## औद्योगिक भूषण–

### पटवर्धन हातपंप →

त्रोअरमधील १५० फूट खोलीवरील पाणी सहजासहजीं वर खेचून, पाण्याच्या रोजच्या व्यवहारांतील घरगुती अडचणी दूर करतो.




### पटवर्धन सायरप पंप्स

हे पंप काकवी, स्टार्च व तत्सम चिकट पदार्थ, ७० फूट हेडला चढविण्यास उपयुक्त असल्याबद्दलचे दाखले आहेत.

### पटवर्धन (सेन्ट्रिफ्युगल) पॉवर पंप्स ←




१″ ते ४″ पर्यंतच्या साइजचे सेन्ट्रिफ्युगल पंप्स, मिनिटाला १० ते ४०० गॅलन पाणी १० ते १०० फूट उंचीपर्यंत खेचूं शकतात असा अनुभव आहे.

### पटवर्धन नांगर →




हे नांगर २ ते ८ बैली तयार होतात. फाळ अत्यंत कमी झिजणारे असल्यामुळें हे नांगर टिकण्यास सर्वश्रेष्ठ मजबूत असून थोडक्या श्रमांत जास्त कामाचा उठाव करतात, अशी त्यांची ख्याती आहे.

अधिक माहितीसाठीं भेटा अगर लिहा:—

MIRAJ

# यशवंत
## इण्डस्ट्रिअल वर्क्स लि. मिरज (S.M.C.)

TOM & BAY LTD., POONA.


अनुक्रमणिका

आणि मग माझ्या भोवती कडें करुन बसलेल्यांना माझ्यापेक्षां जास्त गंभीरपणा पत्करावा लागला.

"काय ? म्हणून दाखवतां काय एखादं भावगीत तुम्ही ?" मीं विचारलें

"आज आवाज बसला आहे. चार गणपतींपुढें आज माझे कार्यक्रम झाले. कसा राहिल गळा ठीक ? तुम्हीच सांगा मनमोहन ! शक्य आहे का मनमोहन ? खोटं नाहीं सांगत मनमोहन !" अंमळ पुढें होऊन भावगीतगायक बोलूं लागले.

"आवाज बसणें शक्य आहे"—मीं म्हटलें.

"खरं ना मनमोहन ? ही समजूत या सुमनताईंना आहे, प्रभाताईंना आहे, गुलाबला आहे, पिरोजला आहे पण या नावरना नाहीं. या तेलंगांना नाहीं. या निपुणग्यांना नाहीं. या बनारस्यांना नाहीं. इकडे आमच्या गळ्याचं हें असं धिरडं झालं असतांना चहाच्या कपावर हे आम्हांला भावगीत म्हणायला सांगतात. मी आपला चहा तेवढा पिऊन टाकतों आणि गाणं कांहीं म्हणत नाहीं. मग काय करावं मनमोहन ?"—हिरवा बुशकोट हें बोलत होता हें मला वाटतें आतां न सांगितलें तरी फारसें बिघडणार नाहीं.

'अय्या ! चार गणपतींपुढें गाणं झालं ? दादरला गाणं झालं आणि आपल्याला कळलं नाहीं होय ?" एक साडी सळसळली.

"थापा मारताहेत !" रंगवलेले दोन अधर अलग विलग झाले.

"गडे ! थापा मारायला तरी सीमा असावी नं !" उन्नत वक्षःस्थलावरील दोन शेपटें गडबडलें.

"अहो ! मनमोहन, अजूनपर्यंत यांचे एके ठिकाणींही गाणं झालें नाहीं. थापा मारतात सरळ. कां थापा मारतात हें आपल्याला समजत नाहीं. यांचीं काल रात्रीं गाणीं होतील कुठून ? अहो, याच मंडपांत रात्रीं आठ वाजल्यापासून आत्तांपर्यंत बसलेले मी ह्यांना बघतोंय." फटकळ नावर म्हणाले.

मीं साऱ्यांना निमूट बसावयास सांगितलें.

सारे निमूट झाले.

मी साऱ्यांना अधिक गंभीर व्हावयास सांगितलें.

सारे गंभीर झाले.

आणि मग......?

"हें पहा, तुम्ही भावगीत-गायक असाल तर मी तुम्हांस हवी ती मदत करीन. तुमचा गळा थोडासा गोड असेल आणि सभाधीटपणा थोडासा अंगांत असेल तर प्रसिद्धीच्या वाटा मी तुम्हांस मोकळ्या करून देईन. परंतु तुम्ही मला विश्वासांत घ्यावयास हवें. मला भाऊ समजावयास हवें." मी नेटक्या नजरेनें त्याच्याकडे पहात वरील वाक्य उच्चारलें.

कांहीं वेळ तो कांहींच बोलला नाहीं. उकळत्या पाण्यावर बुडबुडे फुटतांना दिसावेत तसें भोंवतालच्या, मी मुद्दाम केलेल्या शांत नि गंभीर वातावरणांत त्याचें व्यक्तित्व, मुग्ध राहूनही, त्या स्फुटित ओठांतून मला अडत होतें. बुडबुडे जसे नुसतेच फुटतात तसे त्याचे ओठ नुसते हलत होते. मग मींच त्या शान्ततेचा भंग केला.

"तुमचं नांव काय ?" मीं विचारलें परंतु त्यानें कांहींच उत्तर दिलें नाहीं. आगगाडीचा सिग्नल पडावा तशी त्याची मान अधोमुख अवनत झालेली मला दिसली.

"यांचें नांव काय ?" मीं भोंवतालच्या कड्यालाच प्रश्न टाकला.

"यांचें नांव जयकिशोर ××××" एक जण म्हणाले.

"त्या त्या ×××चे हे चिरंजीव." दुसरें एक म्हणालें.

"हे सांगतात असं—खरं कीं खोटं देव जाणें." तिसरें एक म्हणालें.

"हेंहि एक थंडल असेल." चवथे एक म्हणाले.

मीं पुन्हा साऱ्यांना गंभीर व्हावयास सांगितलें आणि कांहीं वेळानें सौम्य आवाजांत त्याला विचारलें, "तुमचें नांव जयकिशोर ×××× आहे काय ?" यावर तो होय असें उद्गारला. मग मीं पुन्हा विचारलें, "त्या ×××× तुम्ही कोण ?"

तो म्हणाला, "मुलगा."

माझें मन विचारांत पडलें. एका सुप्रसिद्ध नटाचा हा मुलगा ! बापसाऱ्यांच्या कौतुकाचा विषय होता. आणि हा मुलगा ? साऱ्यांचे हात मस्करीसाठीं ह्याच्या मनीची माती करीत होते.

आतां पहांट उलटून गेली होती. अरुणानें पूर्वेच्या फडांत कुस्ती मारली होती व एका सिद्दी पहिलवानास चीतपट केलें होतें. अंगावरल्या लाल मातीनिशीं एका मस्त अवसानांत विजयोन्मादानें फुरफुरलेले दंड थोपटीत तो गगनाच्या गुलाबी अंगणांत उभा होता. साध्या शब्दांत सांगायचें म्हणजे स्टँडर्ड टाईम ६–३५ झाले होते.

त्या थोर नटश्रेष्ठाचा हा मुलगा आहे हें कळल्यानंतर माझ्या डोळ्यांत कृतज्ञता पापण्यांच्या केसांचीं वल्हीं वल्हवीत नौकाविहाराला निघाली होती. अनेक बेटें, अनेक दीपगृहें, चांचपत चांचपत, न्याहळत न्याहळत, ती चालली. कांहीं बेटांवर गुलामांची सत्ता होती. कांहीं दीपगृहांवरील अधिकाऱ्यांचे संसार संन्याशासारखे होते. कांहीं बेटांवर बाप आणि मुलगा इतके विभक्त राहात असत कीं त्रयस्थाला हाच का त्या मुलाचा बाप; असा संशय येई.

अंधारांतून उजेडाकडे, पश्चिमेकडून पूर्वेकडे, नैऋत्येकडून ईशान्येकडे, अखेरीकडून आरंभाकडे, असा उलटा प्रवास करणें फार गमतीचें असतें. कृतज्ञता डोळ्यांतल्या आंसवांतून तसलाच प्रवास करीत होती. गॅसच्या दिव्यांसारखे अंग लखाखणारे मासे थव्याथव्यानें जातांना तिला दिसले डोक्यावरून आभाळाच्या निळ्या रंगाला डहुळत जाणारें काळ्या, तांबड्या, शेंदरी, अशा नाना रंगांच्या पक्षांच्या पंखांच्या हालचालीचा देखावा नाट्यमंदिरांत 'once more' देणाऱ्या हातांच्या टाळ्यांसारखा दिसला. हास्य आणि अश्रू हातांत हात घालून तिच्या नौकेच्या शिडावर बसले होते. लांब चोंचीचा एक सुंदर पक्षी तिच्या स्कंधावर येऊन बसला होता. त्याच्या चोंचीच्या एका पाकळीवर यश आणि दुसरीवर अपयश असें लिहिलें होतें. तिनें किनाऱ्याकडे पाहिलें. मुंबईहून पुण्याकडे एका लाल मोटारींत बसून एक बुटका माणूस वेगानें मैल मुरगळीत चालला होता. त्याचा मोटर चालविण्याचा वेग एवढा होता कीं बस कंडक्टरच्या गोल पेटींतून तिकिटांची पट्टी बाहेर यावी तसा रस्ता त्याच्या चार रबरी चाकांतून काळ्या रिबनसारखा बाहेर पडत आहे असें वाटत होतें.



आणि...तो चालला होता. फक्त प्रगतीकडे फक्त वेगाकडे त्याचें लक्ष होतें. फक्त वर्तमानाकडे त्याचें लक्ष होतें. फक्त 'आज'वर त्याचा विश्वास होता.

भविष्यावर त्याचा भरंवसा असता तर त्यानें आपल्या गाडीला एवढा वेग दिला नसता. वाटेंतल्या आडांकडे त्यानें पाहिलें असतें. वाटेंतल्या विहीरींकडे त्यानें लक्ष दिलें असतें. प्रवासांत अनेक ठिकाणीं सेल्युलाईडच्या पट्ट्यांचे साप त्याच्या मोटारखालीं भरडले जातांना तो पहात होता. परंतु हीं तक्षकाचीं दुखावलेलीं पिल्लेंच पुढें आपल्याला अखेरीच्या अखेरीकडे मुसक्या बांधून नेणाऱ्या वाद्या आहेत याची त्याला कल्पना नव्हती.

चार चाकांच्या सुपांत फर्लांगांचे फुटाणे पाखडीत जातांना त्याचे वाढवलेले केंस वायुलहरींच्या हातानें उधळले जात होते. फारसा सुंदर नसतांही त्याच्या हालचालींत असणाऱ्या ऐटीनें एक रमणीहृदय आकर्षिलें गेलें होतें. हें आकर्षिलेलें हृदय पुढें सामर्थ्यशाली व्यक्तित्वानें वेधलें गेलें होतें. हें वेधलें गेलेलें हृदय पुढें सुरेल संगीतानें कांहीं काळ त्याच्याशीं समरस होऊन गेलें होतें.

कुठेंतरी 'तीन इसम तेरा आण्या'चा ललकार झाली आणि मी सावध झालों. कल्पनेच्या पैलतीरावर बसून भासाच्या साखरपाण्यांत आभासाचें लिंबू पिळून त्याचें सरबत करून पिणारी माझी प्रतिभा पुन्हा त्या हिरव्या बुशकोटापाशीं येऊन स्थिर झाली.

पुन्हा कॉफीचे पेले आले, पुन्हा बिस्किटाचे पुडे आले आणि मग पुन्हा...

मी त्याला माझ्या अधिक जवळ यावयास सांगितलें. कॉफीचा आणखी एक प्याला त्याच्यापुढें ठेवीत मीं त्याला तो घ्यावयाचा आग्रह केला. सिगारेटचें पाकिट माझ्या पुढ्यांत पडलेलें होतें: माझ्या परवानगीची वाट न पहातांच त्यानें तें उचललें. सिगारेट पेटवून झाल्यावर त्यानें नाबरांकडे एक तिरका कटाक्ष टाकला.

"सुपारी असली तर हवीय मला."...तो म्हणाला. यावर नाबर कांहींच उत्तरले नाहींत. नुसते मिस्किलपणानें हंसले. पण त्या हसण्यांत "तुझ्या बापानें सुपारी ठेवलीय" असें वाक्य अनुच्चारित स्थितींत दडलेलें दिसत होतें.

त्या हास्याच्या उखळामागें अवहेलनेचा बाळकृष्ण दडून राहिला आहे हें हिरव्या बुशकोटला कळत होतें. परंतु......

"अहो प्रभाताई...तुमच्यापाशीं असली तर द्या हो. सुमनताई तुमच्या जवळ असते ना गुलाबी रुमालांत बांधलेली चिकणी! या नाबराना किनई कुठें काय बोलावें हें अगदीं उमजत नाहीं. इकडचा सूर्य तिकडे उगवेल परंतु नाबर किनई, मनमोहन? खरं ना मी म्हणतों तें!...मिळालीच कीं नाहीं शेवटीं! कशी गंमत झाली एका माणसाची! जिरली बरं का नाबर तुमची! ही घ्या, चिकणी मिळाली. दाणेदाणेपर नव्हे सुपारीसुपारीपर लिखा है खानेवालेका नाम, नाहीं का हो मनमोहन? होय ना?" हें कोण म्हणालें हें सांगावयास नको.

"तुम्हीं कोणकोणत्या चित्रपटांत कामें केलीं आहेत?" मीं नेटक्या नजरेनें त्याच्याकडे पहात त्याला विचारलें.

"पुष्कळ! गेल्या दोन वर्षांत सोलापूर सोडल्यापासून 'छेल आणि बटाऊ' 'चहाचा पुडा' 'अनिरुद्धाचें स्वप्न' 'गांठीचा जन्म' 'मागचें

पाऊल ' ' दैत्य पावला ' ' गलोलवाली ' ' पानाचा मान ' ' मीं बेवडा सोडला ' ' शपथेचा गळा ' ' पाटलाची पंढरी ' ' शेजारची चाल ' मावशीचा मोल ' ' राज्यांतले गरीब ' ' सख्याचा जीव ' ' तिचा राम ' बाजारांतली माया ' ' गीता स्वयंवर ' ' चावट चवळी ' ' लालाचा लाल ' दिव्याचा वंश ' ' काठीवर काठी ' ' म्हसोबाचा सोटा ' ' कां ? ' ' मी ' ' तूं ' ' ये '

" हे ' कां ?' ' मी ' ' तू ' ' ये ' ही काय भानगड आहे ? " मीं त्याला मध्येंच थांबवून विचारलें.

" हीं चित्रपटाचीं एकाक्षरी नांवें आहेत, मध्येंच जसा पांच अक्षरी नांवाना भाव होता तसा आतां एकाक्षरी नांवांना भाव येणार आहे असें कथासम्राटांचें मत आहे. " तो म्हणाला.

" कथासम्राट् कोण ?" मीं विचारलें.

" जे गीत्सम्राट आहेत तेच कथासम्राट आहेत. "

" गीतसम्राट् कोणी आहेत ? " मीं.

" ते कांहीं आपल्याला समजत नाहीं मनमोहन. " हिरवा बुशकोट.

" एवढ्या चित्रपटांत तुम्हीं कामें केलीं ? " मी.

" याशिवाय कांहीं हिंदी आणि बंगाली चित्रपटांतही मीं कामें केलीं आहेत. ' सात साले ' ' सरोवरकी शूर्पणखा ' ' खिडकी की बिजागिरी ' ' फूल का फत्तर ' ' भेल और चौपाटी ' ' काला सिंह ' ' संत मंबाजी ' ' उण्ड का काळवीर ' या हिन्दी आणि ' थडेरे मासे ' ' मासे थडेरे ' ' कोपडीदास ' या बंगाली आणि ' गल्लम थंडी ' ' सुनमनाडू ' ' चावल-कोडूडु ' ' अमसुलमूसारम् ' ' पांटम्बरवंटम् ' इत्यादि तामिली चित्रपटांत मी प्लेबॅक दिलेले आहेत. त्याचप्रमाणें मी तुम्हांला सांगतों मनमोहन, एका चित्रपटांत तर मी गाण्यांचेही प्लेबॅक दिलेले आहेत. "

" कोणत्या ?" मीं विचारलें.

" ' अक्कल हंगामी देणें आहे ' या चित्रपटांत व ' चल प्रवाशा जग हें आपुलें ' हे गाणें मीच म्हटलें आहें. "

" तुम्ही खोटं सांगतां. "—मी म्हणालों. " तें गाणें माझे मित्र श्री. कुळकर्णी यांनी म्हटलें आहें. हे पहा जयकिशोर, मी तुम्हांला पुन्हा एकदां विनंती करतों कीं तुम्ही खरें बोला. तुम्हीं हें जें आत्तापर्यंत सोंग सजवलें आहे तें टाकून द्या. चंदनाचा लेप देऊन जसें कोड बरें होत नाहीं त्याचप्रमाणें थापा मारून भोंवतालची विरोधी परिस्थिति विरघळवितां येत नाहीं. अशा थापा मारून कांहीं लोक कांहीं वेळ फसतील. कांहीं दिवस तुम्हांला स्वार्थ साधला जात आहे असें वाटेल परंतु केव्हांतरी शेवटीं तुम्हांला कळून चुकेल कीं आपण जेथें आरंभाला आहांत तेथेंच आहोत. नाटकी जीवन पत्करतांना तुम्ही तुमच्या जीवनाचेंही नाटक करून टाकीत आहांत. गोडगोड थापांचे दोन चेंडू जवळ बाळगले म्हणजे आपण कांहीं उन्नत उरोजांची मस्तानी होत नाहीं. तुम्ही कां खोटें बोलतां हें मी सांगतों. तुमच्या साऱ्या महत्वाकांक्षा, तुम्ही ज्याचा मुलगा म्हणवतां त्याच्यासारख्या थोर आहेत परंतु तुमचें नशीब खडतर. त्या महत्वाकांक्षा कधींच सफल होणार नाहींत याची जाणीवही तुम्हांस होऊन चुकली आहे आणि जें कधीं लाभणार नाहीं याची तुम्हांस खात्री पटली आहे तें आत्तांच लाभलें असें तुम्ही साऱ्यांना सांगत सुटतां. जीवनांत घोर निराशा पदरीं आली म्हणजे कांहीं माणसें अशीं वागूं लागतात. परंतु या वाटेनें तुम्ही पुढें गेलांत तर एक दिवस अफू खाऊन आत्महत्या करावी लागेल. तुम्ही हुशार आहांत. लोक आपली टिंगल करताहेत हेंही तुम्हाला समजतं. परंतु आपण थोडेसे खुळे आहोत असें तुम्ही त्यांना मुद्दामच भासवतां. कारण या तुमच्या नाटकी वागण्यानेंच सध्यां तुमचें पोट भरत आहे. मी स्पष्ट बोलतों याचा राग मानूं नका. ज्याचें नांव तुम्ही सांगतां त्यांना एकच मुलगा आहे हें मला ठाऊक आहे आणि तो माझ्या चांगल्या परिचयाचा आहे. हें पहा, पुन्हा मी तुम्हांस सांगतों, तुम्ही खरें बोलून मला विश्वासांत घ्याल तर मी कांहीं करूं शकेन. " मी म्हणालों.

भोंवतालचें कडें आतां अगदीं गंभीर बनून गेलें.

कांहीं वेळ अगदीं शांततेंत गेला. कुणीच कांहीं बोललें नाहीं. मीं मनोरच्या बुशकोटाकडे पाहिलें. त्याचे डोळे मला थरारलेले दिसले. कांहींतरी घडत होतें. कांहींतरी शिजत होतें. कांहीं विरघळत होतें. कांहीं नष्ट होत होतें. कांहीं जळून भस्म होत होतें. कांहीं जळूनही उरत होतें.

" हें पहा, मनमोहन, आतां जें मी तुम्हांला सांगणार आहे तें कधीं कुणालाच सांगितलें नाहीं. इथें जे माझे परिचित जमलेले आहेत त्यांची मी क्षमा मागतों. मी आत्तापर्यंत त्यांना खोटें सांगत आलों ह्याची माफी मागतों. मी मूळचा सोलापूरचा. माझे वडील. . .पण नको. वडिलांच्या हकीकतीपेक्षां माझ्या आईची हकीकत जास्त महत्वाची आहे. माझी आई ही सोलापूरचीच. माझ्या आईचें लग्न एका श्रीमंताशीं झालें. माझी आई ही त्या श्रीमंताची तिसरी बायको. पहिल्या दोन बायकांना मूल झालें नाहीं म्हणून त्यांनीं हें

तिसरं लग्न केलं. आईच्या व त्यांच्या वयांत खूप अंतर होतें. आई १६ वर्षांचीन्तर ते ६० वर्षांचे होते. सोलापूरला एक नाटक कंपनी आली होती. त्यांच सुमाराला माझे वडील वारले. मरासच्या आधीं आपल्या भाच्याचा मुलगा त्यांनीं दत्तक घेतला होता. तिन्ही बायकांना चांगली इस्टेट ठेवून ते वारले. आपल्या मातांना पतिनिधनाच्या दुःखाचा विरंगुळा पडावा म्हणून, निदान या दर्शनी कारणाकरितां तरी, दत्तक मुलानें घरांत गाणें बजावण्याचे कार्यक्रम करवले. पुढें असेच कांहीं दिवस गेले. काशीयात्रेच्या निमित्तानें आपल्या विश्वासू दासीसह ही तिसरी बायको बाहेर पडली. परत जेव्हां यात्रा संपवून १० महिन्यानें परत तिचें येणें झालें तेव्हां त्या दासीजवळ दोन-एक महिन्यांचें मूल होतें. बनारसच्या घाटावर तें सांपडलें असें ती सर्वांना सांगे. "

दम लागला होता, हिरव्या बुश कोटांतून त्यानं रुमाल काढला, तोंड पुसलें. सारे गप्प होते. गणपतीच्या मंडपांत देखील गप्प होते, जवळच्या तांब्यांतून त्यानें भांडं भरून पाणी घेतलं, सावकाशपणें घोट घेतले, ती स्तब्धता सार्‍यांनाच असह्य झाली होती. कांहीं वेळानें पुनः तो बोलूं लागला—

" मुलगा दहा वर्षांचा झाला. ती सावित्री त्याचा संभाळ करीत होती. एक दिवस ती त्याला म्हणाली, " तूं मला आई म्हणून हांक मारतोस, पण मी तुझी खरी आई नव्हे. तुझी खरी आई एका महिन्यापूर्वीच परलोकवासी झाली, हें मला ठाऊक आहे नि तें आज मी तुला ठाऊक करून देत आहें. तुझे वडील प्रसिद्ध गवई आहेत. नट आहेत. सोलापूरला पुनः त्यांची कंपनी येणार आहे. मी तुला घेऊन जाईन त्यांच्याकडे ..." आणि एक दिवस आई...नव्हे...सावित्री त्या मुलाला घेऊन रंगपटांत नाटक चालू असतां घेऊन गेली. रंगलेल्या तोंडानेंच एका भरजरी पोषाख केलेल्या बुटक्या माणसानें त्या मुलाला आपल्या हृदयाशीं धरलें, त्याचा मुका घेतला...पुढें अधूनमधून पुण्यामुंबईस मनिऑर्डरी येऊं लागल्या. पुढं एक दिवस त्यांच्या मरणाची बातमी समजली. ज्या वेळेला ते मेले त्या वेळेला त्यांच्या ओठावरले लाल रंग उडून गेले होते. मोटारची चाकें पंक्चर झालीं होतीं. पोशाखावरील सारी जर खोटी होती म्हणून काळी पडली होती. एका सेल्युलाईडच्या काळ्या पट्टीनें त्यांचं गळा आवळून टाकला होता.

काळ धांवत होता...पुढें सावित्रीही वारली...

एक दिवस सोलापूर सोडून देणेकर्‍यांचा त्रास चुकवण्यासाठीं मी मुंबईस आलों. मुंबईस आल्यावर मी भावगीत गायनाचे कार्यक्रम कुठं मिळतात का याची चौकशी केली. परंतु त्यांत यश येईना. मग मी अमक्याचा मुलगा म्हणून प्रकट रीतीनें सांगूं लागलों. माझें मूळचें नांव बदललें आणि ' जयकिशोर ' हें नांव घेतलें. माझी चेहरेपट्टीही वडिलांसारखी आहे. रंगानें मी फक्त गोरा आहें आणि ते काळे होते. मुंबईस आल्यावर त्यांना ज्या लकबी होत्या त्या मी मुद्दाम आत्मसात् केल्या. त्यांना खांद्यांत मान घेऊन बसायची संवय होती. ओठांची चाळवाचाळव मी त्यांच्यासारखीच करतों. पैसे खर्च केल्याशिवाय त्यांच्यासारख्या ज्या ज्या गोष्टी मला करतां येतात त्या त्या मी करतों. माझ्या वडिलांच्या कीर्तीचा उपयोग होईल असें मला वाटले होतें. परंतु...परंतु तसा थोडासा उपयोग झाला. दोन चार चित्रपटांत मला कामें मिळालीं. ७००–८०० फूट लांबीच्या फिल्मवर आतांपर्यंत माझें चित्रण झालें आहे. मला वाटलें होतें हजारो रुपये मिळतील, लाल मोटारींतून मी हिंडेन. मी रस्त्यांतून चालूं लागलों म्हणजे रस्त्यावर इंद्रधनुष्यें माझ्याकडे पहातील. पण तसें कांहींच झालं नाहीं. अगदीं थोडे पैसे मला मिळाले. जे सज्जन होते त्यांनीं थोडे तरी पैसे दिले. पण मनमोहन, त्यांत कांहीं अर्थ नाहीं हें मला कळून आलें. दोन महिन्यांपूर्वी या चंदेरी वाटेनें जावयाचें नाहीं असा मीं निश्चय केला. सध्यां मी तो नाद सोडला. कांहीं अर्थ नाहीं. आतां मी काय करतों हें जर तुम्हांला सांगितलें तर तुम्हांला आश्चर्य वाटेल. मला आतां कशाचेंच कांहीं वाटत नाहीं. सार्‍या स्वप्नाची विल्हेवाट लागली. आतां मी कधीं सोलापूरला जाणारच नाहीं. काय करायचें आहे जाऊन ? मोटारींतून हिंडणारा तो दत्तक मुलगा पैसे कसे खर्चावेत या फिकिरींत आहे. एकदां वाटलें त्याला भेटावें. सारें सांगावें. परंतु स्वार्थासाठीं आईच्या अब्रूची विल्हेवाट लावावी असें मला अजून वाटत नाहीं. माझी आई प्रेमळ असली पाहिजे. तशी ती नसती तर अनेक सोंगेंढोंगें करून तिनें मला सोलापूरास परत कशाला आणलें असतें ? कधींतरी मला तिची आठवण येते. आणि मग माझ्या ढोंगी अंगावर चिकटवलेलें सारें ' नाटक ' झरणाच्या अश्रूंतून विरघळून जातें. आणि जसा होतां तसा मी उरतां. माझी आई ! आज ती असती तर तिच्या कुशीची उशी करून मी खुशींत निजलों असतों. ती गेली ! आतां जगांत माझें कुणी नाहीं. ही माणसांनीं भरलेली मुंबई माझ्या दृष्टींत रिकामी आहे. आतां जगण्यांत कांहीं अर्थ नाहीं. परंतु मी मरत नाहीं, कारण मला मरण्याचें फार भय वाटतें. थोडेंसें धाडस...थोडेंसें साहस जरी माझ्याजवळ असतें, तरी मी माझ्या आईला केव्हांच जाऊन भेटलों असतों—

त्या ओल्याचिंब झालेल्या रुमालांतून त्याचे डोळे दिसत होते. जणूं काय तो प्रत्यक्ष आतां आईला जाऊन भेटणार होता. खेळीमेळीच्या उत्साहांत सारेजण एकत बसले होते, त्याची टिंगल जे करीत होते, ते सारे गप्प बसले होते, रुमाल भिजवीत होते; एखाद्या भयाण, निर्मनुष्य गुहेंतील अंधःकाराकडे बघावें त्या दृष्टीनें ते बघत होते. तेलाच्या बाटलीचा ओशटपणा त्यांच्या चेहऱ्यावर आला होता, सगळीकडे शांत होतें. त्यानं थांबूं नये, पुढें सुरू करावें अशी इच्छा साऱ्यांची होती, पण त्याचे तोंडांतून शब्दच बाहेर पडेनात. त्यांचा नाईलाज होता, पण मग तो एकदम बोलूं लागला, त्याच्या वडलांच्या लकबींत बोलूं लागला, ऐतिहासिक नाटकांतील खलनायकाच्या मुखांतून बोलूं लागला—

"मला वाटतं, जगांत यशस्वी लोकांनींच रहावें. मनमोहन ! तुम्हांला रहायला हरकत नाहीं. तुम्ही यशस्वी कवि आहांत. थोरांच्या हृदयांत आणि पोरापोरींच्या लुसलुशींत अधरावर तुमच्या कविता नाचताहेत. मिस्टर ! तुम्हांला जगायला कांहींच हरकत नाहीं. परंतु अनेक 'डे' जुळवणाऱ्या, भावगीतें घडवणाऱ्या या...या...आमच्या इथल्या या धारकर–बाटकरांना जगायचा अधिकार नाहीं. जगावें सुरैय्यानें, या इथल्या 'अय्यां'ना जगायचा कांहींच अधिकार नाहीं. चाळींतील चार मुलें माना मागें वळवून चौकसपणानें बघतात म्हणून चढेल बनलेल्या या मुलींना जगायचा काय अधिकार आहे ? या या रेल्वेंत गार्ड असलेल्या नाबरांना तरी काय अधिकार आहे हो ! या इथें बसलेल्या कोणालाच जगायचा अधिकार नाहीं. यांची कोळशाची वखार आहे—ह्या—ह्यांची फेरीची गाडी आहे...हे वृत्तपत्रांचे एजंट...यांची पुस्तकांतल्या दुकानांत नोकरी... या साऱ्यांच्या कुवस्था म्हणजे घड्याळाच्या दोन काट्यांत कातरल्या जाणाऱ्या भरड्या सुपाऱ्या. मी मरत नाहीं म्हणून जगतोंय...तसेंच हे... अहो एवढे मोठे हे आमचे मंगलमूर्ती ! ! ज्यांना तुम्ही व्याख्यानापूर्वी नमस्कार केलात ते सुद्धां १० दिवसांचेंच दैवत. पुढें आरती बंद होते, नमस्कार सरतात...आणि समुद्रांत विरघळण्याचे चमत्कार सुरू होतात. मिस्टर ! देवाचें देवत्व जर १० दिवसांचें तर माणसाचें ममत्व किती तासांचें ? ? करा गणीत किनरे मास्तर, आपल्याला जमत नाहीं हें गणीत..."

अन् असं म्हणून तो विकटपणें हंसला, तेजाबानें धातू वितळत जावी, शरीराला जखमा व्हाव्यात तसं साऱ्यांना होऊन गेलं. तें कटु सत्य जणूं काय आवंढे गिळून त्यांनीं पचवलं, क्षणभर तो हंसला, 'जाऊं दे' अशा आविर्भावांत त्यानें हात हलवले व नंतर कहाणी पुन्हा सुरू केली—

"सध्यां मी आपला दुसराच उद्योग आरंभला आहे. दोन महिन्यांपूर्वी एका बाईनींच आम्हाला या धंद्याला लावलें. बाई 'प्रोडयूसर' होती. दोन महिने तिच्याकडे राबलों. चित्रपट पुरा झाल्यावर पगार मिळेल असं तिनं सांगितलं होतं, पगार १२० रु. ठरला होता. दोन महिन्यांऐवजीं तीन महिने राबलों, तोंपर्यंत एक दमडादेखील मिळाला नव्हता. पुढें तो चित्रपटही थिएटरांत लागला. बाई नव्या मोटारींतून मिरवूं लागली. १०–२० हजारांचे दागिने तिनें खरेदी केले. यशस्वी प्रोडयूसर म्हणून तिचीं तीनरंगी छायाचित्रें झळकूं लागलीं आणि इतके दिवस बाकीसाठीं थांबलेल्या आमच्या खानावळवाल्यानें भरपंक्तींत आम्हांला भरल्या ताटावरून उठवलें. रात्रीं ८ ची वेळ होती. मी त्या बाईकडे गेलों. वाटेल तें करून आत्तां पैसे द्या असें मी म्हणालों. ३००



## अतृप्तिच्या तृप्तिमध्यें

क्षण एक अंतरींची थांबतांच धडधड
भावनांची तडफड पदराची फडफड
बावरल्या नयनांची मूक भाषा समजलीं
गालावरी आणि त्यांचीं प्रतिबिम्बें उमटलीं
माझ्या हाताचा विळखा घट्ट झाला, सैल झाला
तुझा हात चलाखीनें मऊ केसांत फिरला
क्षण एक मीलनाचा नंतरचा विरहाचा
क्षण एक चुम्बनाचा नंतरचा आसवांचा
क्षणभंगुर जीवन केव्हां संपूनि जाईल
परि प्रीतीस आपुल्या कुठें मरण येईल
नाहीं प्रीतीस मरण माझ्या मनाला वाटतें
मृत्युनंतरची प्रीति माझ्या मना मोहवितें
अतृप्तिच्या तृप्तिमध्यें सखे, घोटाळे जीवन
अतृप्तिच्या तृप्तिमध्यें तसें आपुलें मरण

—योगेश्वर अभ्यंकर

नकोत, २०० देखील नकोत फक्त ७५ रुपये आतां द्या असें मी म्हणालों. खानावळवाल्यानें जेवतांजेवतां भरपंक्तींत उठवून लावलें हें सांगितलें. परंतु माझ्या सांगण्याचा परिणाम कांहींच झाला नाहीं. आपल्या गुबगुबीत कुत्र्यापुढें हंटले पामरच्या बिस्किटांचा पुडा ठेवून ती शृंगारसाज करीत होती. समोरच्या स्टुलावर तिनें नुकतीच रिकामी केलेली शांपेनची बाटली विमनस्कपणें पडली होती. माझ्याकडे ढुंकूनही न पाहतां हातानेंच तिनें चालते व्हा म्हणून सांगितलें. माझा झालेला अपमान मला तेथून पैसे घेतल्यावांचून हलूं देत नव्हता. मी तेथून हलत नाहीं हें पाहतांच तिनें आपल्या ड्रायव्हरला हांका मारल्या. त्या शिखानें माझा दंड धरतांच मीं त्याला झिडकारून दूर ढकलला. बाई रागानें फणफणल्या आणि अचकट विचकट शिव्या देऊं लागल्या. तरीही मी तेथून हललों नाहीं. मला पैसे द्या म्हणजे मी जातों एवढेंच मी सारखें म्हणत होतों. तिचा रंग अनावर झाला. मग तिनें आपल्या आचाऱ्यालाही बोलावलें आणि धक्के मारून बाहेर काढावयास सांगितलें. त्या दोघांनीं मला उचललें आणि धक्के मारून बाहेर काढावयास प्रारंभ केला. तेवढ्यांत त्या बाईनें संतापानें ड्रेसिंग टेबलावरील वासाच्या तेलाची बाटली माझ्या अंगावर फेकली—"

खिशांत हात घालून त्यानें ती बाटली माझ्यासमोर ठेवली. वासाचा दर्प दरवळला, त्या बाटलींत त्याचे डोळे शिरले, ओठ शिरले, कपाळावरच्या आठ्या दिसूं लागल्या, सगळा चेहरा त्रासलेला त्यांत शिरला, मी आश्चर्यानें बघत होतों, वातावरण त्या सुवासांतही कुंद होऊन गेलें होतें—त्या तेलाच्या बाटलींतील तो हिरवा बुश कोट बोलूं लागला—

"कांहीं वेळानें मी रस्त्यावर ढकलला गेलों. बसेस जात येत होत्या, मोटारी धांवत होत्या, लाल दिवे माझ्याकडे पाहून डोळे मिचकावीत होते. माझ्या खिशांत एक फुटका पैसाही नव्हता. कोटाच्या आंतल्या खिशांत त्या प्रोडयूसर बाईनें फेकलेली ही वासाची तेलाची बाटली तेवढी होती. या नाटकी, ढोंगी, बदमाश सिनेजगाचा मला अगदीं वीट आला होता. गरीब नटनटींच्या उपाशी पोटाच्या दामटीवरून भरधांव धावणाऱ्या या प्रोडयूसरांच्या मोटारगाड्यांना धांवतांना पाहूं नये, त्यांचीं चाकें 'बर्स्ट' व्हावींत असें वाटलें. माझीं पावलें माझ्या उपाशी पोटाच्या दामटीला पेलीत पेलीत चौपाटीच्या दिशेला वळलीं. त्या वेळींही थोडेंसें निवांत वाटलें. कांहीं थकलेलीं माणसें वाळूंत अंग सैल करून पडलीं होतीं. हातांत बाटली घेतलेले कांहीं 'मालिश' चंपी म्हणून ओरडत होते. समोर सागराच्या लाटा माझ्या नाटकी जीवनाला ओरबाडून काढत होत्या आणि माझ्या हातांत ही—हीच बाटली होती—"

आणि तो एकदांचा थांबला—

◆

दिवस गिधाडासारखे बंद घड्याळांना खात होते—

आतां चौपाटीवर जावयाचें मी हेतुपुरस्सर टाळतों. मला भीति वाटते...

कशाची भीति वाटते ?—

नाहीं, तर मी कधींही मुंबईला गेलों तर चौपाटीवर भेळ आणि पाणीपुरी खावयासाठीं गेल्याशिवाय रहात नसे. परंतु अनेक वर्षांचा हा नियम आतां मी खंडित केला आहे.

तेथें जाऊन भेळ खाणें मी बंद केलें याचें कारण मला भय वाटतें कीं "चंपी ! चंपी ! !" "मालिश ! मालिश ! !" असें ओरडणारा, किंचाळणारा तेलाच्या बाटलींतील तो अवाढव्य माणूस मला पहावा लागेल. आणि मग मला त्या प्रोडयूसर बाईचा खून करावा लागेल. बाटलींत बंद केलेल्या भुताला मांत्रिक समुद्रकाठीं सीलबंद पुरून ठेवतात तसें हिरव्या बुशकोटाच्या महत्वाकांक्षेचें भुत पुरतें गाडलें जाईतोंपर्यंत मला चौपाटीवर जावयाचें नाहीं—जातां येणार नाहीं...

तेलाच्या बाटलींतला हा माणूस ? नव्हे हें भूत. ही भीषणता...ही निराशा...हा खवीस कसा जन्मीला आला ?

...कोणाच्या तरी क्षणिक सुखोपभोगांतून !

......कोणाच्या तरी विकार विवशतेंतून !

........अनिर्बंध जीवनाचा मी पुरस्कर्ता आहे.

मी एक कवि आहे. परंपरा मोडणारा मी एक कवि आहे. परंतु पुष्कळ वेळां मला वाटतें कीं जीवनाला नियम असावेत. माणसाचें मरण जर अनियमित आहे तर जीवन नियमितच असावयास हवें. तें असलें म्हणजे मग तेलाच्या बाटलींत अडकून पडलेलीं माणसें आपणांस चौपाटीवर पहावयास मिळणार नाहींत. जे दिसतील ते दिव्य पुतळेच असतील.

चौपाटीवर..............

...रेतीच्या सफेद कागदावर सागराच्या लाटा काव्याच्या आठ ओळी लिहीत असतात......

...सांकेतिक लिपींत लिहिलें तें काव्य फक्त दिव्य चक्षूंनाच वाचतां येतें...

येते दौलत...जाते दौलत ;
हत्तीचे मग ' हस्तिदंत ' हो
कमल झुले जी ' गजान्त ' लक्ष्मी
आज फणी हो भडभुंजाची !
जीवन आणिक मृत्यूमध्यें
एका श्वासाचें हें अंतर
सरते स्थावर...सरते जंगम
संपे सरणावरती संभ्रम !

चौपाटीवर ! रेतीच्या सफेद पिठावर सागराच्या लाटा सांकेतिक लिपींत चार ' लाइनी ' लिहीत असतात...

दाट ढगांच्या पापुद्र्यांतुनि
" मानव-माथा ' उंच रिघे पण
दूर चंद्रही...दूर सूर्यही
दूर ध्येयही...दूर श्रेयही !

चौपाटीवर रेतीच्या सफेद कागदावर सागराच्या लाटा लिहीत असतात ...आणि...आणि तें महाकाव्य, ती ऋचा...तो मंत्र, बाटलींत बंद होऊन पडलेला एक महामंत्र वाचीत असतो...आणि क्षणभरानें विसरत जातो—



पांड्यानं पहिली घंटा देण्याचं साफ नाकारलें आणि त्यानें दिली एकदम

# तिसरी घंटा!!

पण मराठी रंगभूमीवरच्या त्या पहिल्या पडद्यामागे असें घडलें तरी काय?

[ स्थळ—सूर्योदक नाटक कंपनीचें बिऱ्हाड ]

**सूत्रधार** :

तुम्हा तो शंकर सुखकर हो ॥ हिमधर
स्थित विकट काननिं तप करो प्रिय
करीं शुभकर सुंदरी तिजवरी भुलत निज
कैलास नारीं तो ॥ शंकर सुखकर हो ॥

बस्स, फार झालें हें ईश्वराचें स्तवन. या रंगभूमीचीं सर्व सूत्रें चालविणारा आणि हालविणारा परमेश्वर एकच आहे. तो म्हणजे नाटककंपनीला भरपूर भांडवल पुरविणारा सावकार. तो जोंपर्यंत प्रसन्न होत नाहीं तोंपर्यंत एकट्या शंकरालाच काय पण स्वर्गांतील तेहतीस कोटी देवांना जरी आळविलें तरी नाटक कंपनीच्या पडलेल्या मुक्कामावरचा पहिला 'ड्रॉप' पुन्हा वर जाणें शक्य नाहीं! अरे, पण सकाळपासून आमचे मालक का बरें कुठें दिसत नाहींत! ओऽ हो ते पहा—नांव काढतांच समोरच्या 'राजवाड्या'मागं येऊन उभे आहेत. आमच्याकडे पहात देखील नाहींत. आपल्याच नादांत कांहींतरी गुणगुणताहेत. एवढ्या कसल्या फिकिरींत आहेत पाहूं या तरी ...काय चाललय् मालक?

**मालक** : कोण सूत्रधार! काय म्हटलंत मला? मालक? (हंसतो) मी कसचा मालक? (सुस्कारे)

**सूत्रधार** : अरे, काय हें मालक! झालं काय असं?

**मालक** : झालं काय? ऐका तर—

बसला ज्याचा नाटक धंदा।
होत तयाची तिरपिट त्रेधा ॥ ध्रु ॥
केवि मिळे नटि स्वरूपसुंदर
जिच्या जिवावर करोन धंदा।
जाळित मजला बात ही अंदर
वरुनि हंसुनि जरि करी मी थट्टा ॥

बरें, हें हवें तसें झालें, खटपट लटपट करुन आणली एखादी हवी तशी कुलीन नि स्वरूपसुंदर नटी म्हणजे तरी आमची काळजी संपली असें होतें का? नाहींच—कारण—

मारिल का कधि टांग आम्हांला
करील उलटा वरि बोभाटा ॥
कसला उपचार ॥ध्रु॥

**सूत्रधार** : हें असें झालें आहे खरें. म्हणूनच—

हीच चिंता ती दूर करायाते
घेउनि आलो नटि एक निश्चयानें
काय नखरा अन् काय रंग तांचा
दहा जन्मीं मिळणार नाहिं साचा ॥

**मालक** : काय म्हणता! पण खरोखर पाहून आणि ठरवून आलांत कीं काय तिला? अहाहा! मग आतां कंपनीच्या डोक्यावर कर्जाचा कितीहि बोजा वाढला तरी मला पर्वा नाहीं. पण कायहो नेहमींप्रमाणें एक डुबून दिली नाहींत ना लोकांदी?

**सूत्रधार** : शाबास, शाबास! हींच का आमची परीक्षा केलीत? इतकीं वर्षे सूत्रधाराचें आणि अधूनमधून पडदे ओढण्याचें काम करतों त्यावर जाऊं नका मालक. सांगूनच टाकतों तर.

मी पाहिलेलं तें स्थळ तुमच्या माहितींतलें आहे. अहो, ती–ती ! परवां मंडईच्या नाक्यावर तुम्हाला त्या छाखानेवाल्यानं आडवलं नि साऱ्या बोलाचालीवरून पुढं गुद्दागुद्दीवर मामला गेला, तेव्हां नाहीं का मी तुम्हांला चिमटा काढून खूण केली–अहो ती–'द्वारकाभुवन' हॉटेलांतून बाहेर पडली—

अहो ती द्वारकाभुवनीं। पाहिली
तिला मीं नयनीं ॥

नाहीं आठवत ?

सुवर्णकेतकिपरि जो दिसला रंग
जरीच्या हो साडीचा
सडपातळ नाजुक बांधा जणुं
डाळिंबाच्या डाळीचा ॥

**मालक** : कृपा करून गाऊं नका. काय तें सरळ गद्यांत सांगा पाहूं

जन्म घेत ती कोणत्या कुळीं
भेटलें कुठे कोणत्या स्थळीं
जनकजननी हीं असति का तिला…

सांग सांग, कुठें भेटली, काय करते, कोण कोण आहेत तिला, इथं यायला ती तयार आहे का आणि—

**सूत्रधार** : सबूर ! अशी घाई नका करूं. जरा दमादमानं घ्या. काय म्हणालांत, ती इथं आपल्या कंपनींत यायला तयार आहे का ! आहे–एका पायावर ती तयार आहे. पण तिची एक अट आहे, बोला, आहे कबूल ?

**मालक** : एकदम कबूल. पण काय अट आहे तिची हें तर कळूं दे आधीं.

**सूत्रधार** : करा इकडं कान. तुम्ही देखील 'स्वगत'च ठेवा हें—( कानांत कुजबुजतो )

**मालक** : हं ?

**सूत्रधार** : हं !

**मालक** : पण हें पहा–( पुन्हा कानांत सांगतो )

**सूत्रधार** : वा ! बापूला तर अजीबात समजतां कामा नये ! कारण—( पुन्हा कुजबुज )

**मालक** : हं ?

**सूत्रधार** : हं ! या वेळी.

**मालक** : असं ?

**सूत्रधार** : तर !

**मालक** : ( हंसतो–मनापासून )

**सूत्रधार** : आतां काढा नमस्कार हंसी.

**मालक** : हसी नाहीं बुवा आज. हा नुसती चालेल ?

**सूत्रधार** : चालेल हो. नाकांतनं धूर निघतोय कीं नाहीं ? झालं. चला तुमच्या खोलींत. अख्खा प्लॉटच सांगतों आपल्या या नाटकाचा. म्हणजे पुढं ऐकणाऱ्यांचा गोंधळ नको व्हायला !

[ दार लावल्याचा आवाज. ]
[ नंतर घंटा वाजते. ]

●

**पांडू** : 'चा'ची घंटा झाली वाटतं सख्या.

**सखाराम** : 'चा'चीच दिसते पांड्या.

**पांडू** : पण इथनं जायला कसं मिळेल ? काय रे सख्या, हे शेटजी किती दिवस इथं राहणार आहेत ? तुला सांगतों, ह्यांची पिडा कधी जाईल तवा जाईल पण जाइस्तंवर आपण कांहीं इथं रहात नाहीं.

**सखाराम** : पांड्या, लेका, तुला ओरडायला रे काय झालं ? हा शेटजी गावला आपल्या कंपनीला म्हणून दोन वेळेला चा तरी मिळतोय. पण हें बघ, पांड्या, तुझं हें असलं बोलणं मालकांच्या नाहींतर बापूसायबाच्या कानावर गेलं तर काय हुईल तुझं ध्येनांत ठेव.

**पांडू** : सख्या, दुसऱ्या कुणापुढं कशाला मी बोलायला जातोंय. आतां तूं आन् मी एकाच खात्यांतले म्हणूनच तुझ्याजवळ चार गोष्टी करतोंय.

**सखा०** : अरे, पण चांडाळा, तें शेटजी बिचारे आणखी कांहीं दिवस राहिले तर त्यांत तुझ्या काकाचं काय खर्च होतंय् ?

**पांडू** : काय सांगूं सख्या. हा सुखासुखी मालकांला लौकर पैका देईल असं वाटत नाहीं. रात्रंदीस बापूसाहेबास्नी घेऊन काय खलबत करीत असतो कांहीं कळत नाहीं. मला तर रातची झोप नाहीं कीं एक इडी ओढायला फुरसत नाहीं.

**सखा०** : अरे बाबा, नोकरी ती नोकरी. तिथं कंटाळून कसं भागेल ? आतां जरा येळ तोंड आवरून रहा. बापूसाहेब इकडंच येत्यात जणु.

( बापूराव धोतराचा लिफाफा काढीत प्रवेश करतात आणि मान वेळून नाजुक आवाजांत–)

**बापू०** : अरे तुम्ही इथंच का उभे आहांत ? धन्य तुमची बाबांनो. सखारामा, तूंहि या पांडूच्या नादीं लागून बिघडत चाललास हो.

**सखा०** : बापूसाहेब, अजून शेटजी कांहीं उठलेले दिसत नाहींत तवा दारावर धक्के देऊन त्यांना कुणी उगीच त्रास देऊं नये म्हणून मी पहारा करीत होतों.

**बापू०** : बरं हो, मी आहे इथं. जा तूं. न्हाणीची सर्व तयारी ठेव. ते उठले कीं मी निरोप धाडीन.

**सखा०** : ठीक आहे. आपल्याला काय ? जातों.

**मालक** : ( प्रवेशून ) बापूसाहेब, तुला तर आतांशा अगदीं फुरसत नाहींशी झाली आहे पहा. एकलास का, तुझी गांठ घेऊन एकदां निवांतपणें बोलायचं होतं मला

**बापू०** : होका ? पण बाप्पा, तुम्ही पहातच आहांत. मी कुठेशी क्षणभर शेटजींच्याजवळ नसलों की त्यांची अश्शी आरडाओरड सुरू होते म्हणता ?

**मालक** : हं हं ! इतके अगदीं तुझ्यावर भुलून गेले आहेत ना शेटजी ? पण बापू, सांभाळ हो–नाहीं तर अर्जुनाच्या ऐवजीं हे शेटजीच आमच्या सुभद्रेचं हरण करायचे !

**बापू०** : छी ! काय हें तुमचें बोलणें बाप्पा ! चला, तुम्हांला एवढी कुठं चूक दिसली कीं त्याची पहार करायला लागता. बाप्पा, शेटजींची देखील चेष्टा करायला मागेंपुढं पहात नाहीं ?

**मालक** : छान. ठीक. पसंत. एकदम पसंत आहे हें आपल्याला. ईश्वर करो आणि शेटजींच्याकडूनच का होईना, हा कंपनीचा गाडा पुन्हा रुळाला लागो म्हणजे झालें.

**बापू** : बरं पण बाप्पा, तुम्ही मला जें प्रॉमीज केलं होतंत त्याचं काय केलंत तें सांगा.

**मालक** : त्या धोतराविषयींच ना ? हें पहा बापू, आज चार दिवस एकसारखा फिरतों आहे पण एक कापडदुकानदार दारांत आम्हाला उभं करायला तयार नाहीं ! नाटक कंपनीचं नांव निघतांच कांहींतरी वेडंवाकडं बोलतात लेकाचे ! आणि मग तें सारं शुभासारखं ऐकून घ्यावं लागतं. तोंवर कपडेपटांतली सुभद्रेची पांढरी साडीच धोतरासारखी गुंडाळ झालं. उद्यां पुन्हा खेळ सुरू झाले म्हणजे पाहूं–पण एक सांगतों बापू, हे आपले शेटजी एकदां का खूष झाले म्हणजे मग बेच तुझ्या मनाची सर्व हौस पूर्ण करतील !

**बापू०** : करतील ते बाप्पा. तुम्हांला सांगून

ठेवतों, पडली तर शेटजींची-माझी सेवाच नाटक कंपनीच्या उपयोगीं पडेल !

**मालक** : पण हे पहा वापू, तो दाणेवाला आतां थांबायला तर नाहीं. एक वेळेला भात-पिठलं नाहीं मिळालं तरी चालेल पण दोन वेळेला चहाचं कढत पाणी तर नरड्यांत ओतायला हवं ! तेव्हां शेटजी जरा लाडांत आले कीं नाहीं कीं त्यांच्याकडून हळूच आजच्या आज एकावर दोन पूज्यं घे मागून ! तूं हा असा, नाहींतर ते म्हणतील दोन पूज्यावरचं एक घ्या आज !

**वापू०** : वाप्पा, तुमच्या किनई जिभेला हाडच नाहीं. चला, जा. समजलं. आतां तुमच्याशीं भाषणाचा प्रसंग नको.

**मालक** : अरे, अरे ! रागावूं नकोस. माझं बोलणं पुरतं ऐकून घे. झालं, गेलाच हा. याला माझं बोलणं असं जरा कडू लागलं पण पुढं तेंच गोड लागेल त्याला. पण हा गेला कुठं रागावून शेटजी विचारे त्याची मार्ग प्रतीक्षा करीत असतील ! (जातात.)

**शेटजी** : काय एकेक विलक्षण गोष्टी घडताहेत ! नाटक कंपनीचा हा सारा कारभार पाहिला कीं मी मी म्हणणारा सावकार देखील कसा पाहतां पाहतां सपाट आडवा होतो याची मला पूर्ण कल्पना आली. आतां कंपनीच्या बिऱ्हाडांत माझं धाडसी पाऊल पडलं आहे खरं परंतु शेटजीच्या अशा पुरुषवेशांत काम करतांना माझे काय हाल होत आहेत हें एक रंगदेवताच जाणे ! पण माझी लाडकी सुभद्रा ऊर्फ माझा अलबेला बापूराव कसा अजून येत नाहीं ? कुणाचीं तरी पावलं बाहेर वाजताहेत तेव्हां हिशेबाचे हे कागद घेऊन बसावं झालं ! श्रीहरी श्रीहरी !

**पांडू** : ( प्रवेशून ) शेटजींना काय हवंय ? चा शेवगाळ्या आणूं का ?

**शेटजी** : आलास का तूंच पुन्हा ! अरे काय आम्हांला निवांतपणें हिशोबठिशोब करूं द्याल कीं नाहीं ? जा नीघ. म्हणे चा शेवगाळ्या आणूं का ?

**सखा** : ( स्वगत ) हा शेटजी आपल्यास पाहतांच असा कां उसळतो समजत नाहीं !

**पांडू** : भोग आपला.

**सखा०** : हें बघ, तूं काय इचारलंस त्याला ?

**पांडू** : म्हणालों, शेटजी शेवगाळ्या आणूं का, तर ससकन् धावलं अंगावर.

**सखा०** : धावायचाच ! शेवगाळ्यानं भागत नाहीं तेची भूक-त्येला पायजे आतां बासुंदी !

**पांडू** : बासुंदी ! अरं इच्चा ! कॅनवर्टाची गाट सोडायला तयार नाहीं नि मागतोय बासुंदी !

**सखा०** : तेच्यां काकानं ठेवली आहे बासुंदी ! म्हणावं, आधीं दूध पिळून दे हतं म्होरं. पुढं तें आटंल तवा होईल तेची बासुंदी ! ( हंसतो. )

**पांडू** : चांडाळा, हसतुयास किती मोठ्यानं.

**शेटजी** : ( आंतून ) श्रीहरी श्रीहरी !

**सखा०** : ( वेडावून ) इस्त्री हरी—इस्त्री हरी ! पांड्या, बघ इचारून—आन् दे आणून-शान एक फक्कड अस्तुरी ! बाबा, तेवढ्यासाठींच आदळलाय हतं ! इस्त्री हरी—

**पांडू** : अरं हळू की.

**शेटजी** : ( आंतून ) श्रीहरी श्रीहरी !

**पांडू** : शेटजी, आम्ही गरीब गडीमाणसं—तुमास्नी काय होवं काय नगं कसं कळावं आमाला—

**सखा०** : तवा कृपा करून—

**शेटजी** : तुम्ही दोघेहि इथून निघून जा. मला कांहीं नको आहे. काय कटकट आहे मेल्यांची—

**सखा०** : मग बापूसायबालाच देतों धाडून हतं. कसं ?

**शेटजी** : ( हंसून ) श्रीहरी श्रीहरी !

**पांडू** : ( स्वगत ) आहे का नाव. बापूसाहेबाना धाडून देतों म्हणतांच बघ कशी कळी खुलली बवाची !

**शेटजी** : हं. श्रीहरी श्रीहरी—

**सखा०** : पांड्या, शेटजी श्रीहरी म्हणल्यात आपल्याला ! चल जाऊं या.

**शेटजी** : हं: ! श्रीहरी श्रीहरी ! ( सखाराम आणि पांडू गेल्यावर ) या निरोपासरशी तरी बापूराव येवोत म्हणजे झालं !

**बापुराव** : ( बाहेरून ) बरं बरं. शेटजी-कडेच चाललों आहे मी.

**शेटजी** : आले वाटतं बापूराव ! कांहीं वेळ

रांगाळल्यासारखं करून या हिशेबाची वही तपा-शीत बसलें पाहिजे. दहा दोन बारा नि आठ वीस हच्याला पूज्य. खाली पूज्य. वर घेतले दोन—

**बापुराव** : काय, जनतंत्र का म्हटलं?

**शेटजी** : हा तुमच्यासाठीं हिशोब करतोय मी बापूराव! उद्यां तुम्ही मांडवल घालणार नींत.

**बापूराव** : का हिणवतां गरीबाला असं शेटजी. मांडवल असत आमच्याजवळ तर—

**शेटजी** : आम्ही कशाला तुमच्या नादीं लागलों असतों असंच ना सुभद्राताई!

**बापुराव** : इश्श तसं नव्हे, बप्पा! आतां कीं नाहीं सुभद्रेचं काम देखील झेपत नाहीं आम्हांला! सिनेमांतल्या नाचणाऱ्या फटाकड्या पोरींना पाहणारे डोळे आमचं सुभद्रेचं काम पाहायला राजी नाहींत! पण काय करावं बप्पा! आम्हांला कळतं. रंगभूमीवर आमचा खेळ पाहतांच पिटांतले वात्रट लोक फिदी फिदी हसतात—शिव्या देतात—पण पोटासाठीं सोंग करावं लागतं तें! आतां या वयांत हीं कामं शोभत नाहींत नि नरड्यांतून पण पहिल्यासारखं गाणं निघत नाहीं बप्पा!

**शेटजी** : खरं आहे तें. या बसा जवळ—अरे लाजतां किती—श्री हरी श्री हरी!

**बापू** : आज आम्ही तुमच्याजवळ कांहीं मागणार आहोंत बरं का?

**शेटजी** : असं? मागा, खुशाल मागा हवं तें—आम्ही द्यायला तयार आहोंत! मागून मागून काय मागणार—हें आमचं नेसलेलं तर नाहीं मागणार—

**बापू** : समजा, आम्ही तेंच मागितलं तर?

**शेटजी** : छान. आम्ही एका धोतरानं आलों म्हणून टिंगल करतां कीं काय आमची!

**बापू** : खरंच आम्हांला एक धोतर हवं आहे

> वद जाउं कुणाला शरण
> करिल जो हरण धोतराचें।
> मी धरिन चरण त्याचे प्रभु राया॥

**शेटजी** : धोतराचं हरण?

**बापू** : होय, बघा हें. पाहिलंत, किती ठिकाणीं विरलंय तें?

> किति काल हाल काढिले
> विनवितों तुम्हां दुखल मनिचें॥
> करूं नका विफल हेतु माझे सखया रे॥

त्या खाकी हाफ पँटचा कंटाळा आला! मघाशीं मालक म्हणाले कीं काय मागायचं तें इथं इकडं मागा.

**शेटजी** : वाहवा! चांगलेच धूर्त आहेत तर मालक तुमचे! ठीक. आपण आज भलंकर खूष आहोंत तुमच्यावर बापूराव! चला, आधीं आपण थेटरावर जाऊं. तुमच्या सौभद्र नाटकाचा बोर्ड कसा काय लागलाय पाहूं आणि मग तिथून कापडबाजारांत—

**बापू** : खरं? अगदीं खरं? या गळ्याशपथ खरं? अहाहा!

> पुष्पपराग सुगंधित शीतल
> आतिमंद चरे—



**शेटजी :** हें गाणं आतां तुम्हीं नाहीं म्हणायचं—आम्हीं म्हणायला हवं—

**बापू :** मग बप्पा, म्हणा नं.

**शेटजी :** छान्! आज हा पुष्प—पराग गाळला लागलें कीं उद्यां म्हणाल, गडे खरंच त्यांचं नेलन् सुभद्रेचं काम देखील करा स्टेजवर!

( हसतात दोघेहि. )

●

[ स्टेजेची घंटा वाजते ]

**मालक :** काय, वाजते आहे ना पांड्य पहिल्यासारखीच ?

**पांडू :** वाजतीया तर. पण कांहीं म्हणा मालक, बापूरावाचं नि शेटजीचं तें मेतकूट पाहून संशाव येतोय—तो सादासुदा शेटजी नाहीं दिसत. काय तरी कपट नाटक करायला आलाय हा बाबा कंपनींत! बापूरावांसाठीं तो जीव इतका टाकतुया रात दीस तवा ग्या इचारतों, उद्यां बापूरावास्नी फूस लावून पळवून नेयाचं तर नाटक नाहीं तेचं ?

**मालक :** वेडा रे वेडा! शाहण्याच्या कांद्या, बापूरावला पळवून नेऊन काय लोणचं करील त्याचं !

**पांडू :** लोणचं करील, वाटलं तर साखरअंबावी करील! तेचा डाव मी कालच्या धरून हेरतुया, पन डोस्क्यांत शिरत नाहीं काय वी फील सख्या म्हणत हुता, शेटजी म्हणे सीनीमा काढणार आहे एक—

**मालक :** ( चमकून ) काय सिनेमाकंपनी! तरीच. हरामखोर! बदमाश! आमच्या रंगभूमीला असा मागून सुरुंग लावू पहातो आहे काय हा डॅंबीस-शेटजी ?—आतांच्या आतां जातों नि धरतों त्याचं नरडं आणि ओकायाला लावतों दहा हजार —विश्वासघाताची फिर्याद ठोकून! त्या बाप्याला पळवतो आहे! आमच्या सुभद्रेला—किडनॅप करतोय काय? ब्रीच ऑफ ट्रस्ट, विश्वासघात. फौजदारींत केस देतों. कुठंय तो सूत्रधार? त्याचाहि त्यांत हात असला पाहिजे.

**सूत्रधार :** ( घाईनं प्रवेश करून ) बरं झालं भेटलांत. बहुतेक आजचं सौभद्र खूप दिवसींनी रंगणारसं लक्षण दिसतंय. पहा प्लॅन बहुतेक भरत आला आहे. बाक गेलेत. या खुर्च्याहि जवळ जवळ गेल्या आहेत.

**मालक :** ( गरम ) फेकून द्या तो प्लॅन ! कुठे आहे तो तुझा शेटजी—

**सूत्रधार :** अरे, उखडायला काय झालं इतकं !

**मालक :** उखडूं नको मी ? कंपनी उखडून उठायची वेळ आली तरी उखडूं नको ?

**सखा० :** लई तापल्यात मालक—बापूरावावर नि त्या तुमच्या शेटजींवर ! या पांडूनं कागाळी केली—

( दूरवरून गाणें )—

बहुत छळियलें नाथा व्यर्थ
शिणविलें ॥ ध्रु० ॥

**सूत्रधार :** आं ! ही कोण ?

**मालक :** ( बापूराव प्रवेश करतांच त्याच्या अंगावर धावून ) कुठंय तो तुझा शेटजी ?

**बापूराव :** इश्श. हे नव्हेत का आपले शेटजी ?

**मालक :** ही मुलगी ?

**शेटजी :** माफ करा मालक ! कांहीं अपरिहार्य कारणानं मला हें शेटजीचं नाटक करावं लागलं—

**सूत्रधार :** कांहीं अपरिहार्य कारणानं—?

**शेटजी :** सूत्रधार, मालक. मी सर्वांसीं नमची क्षमा मागतों—तुम्हांला भांडवल देईन असं प्रॉमीज करून तुमच्या कंपनींत प्रवेश करून घेतला खरा मी पण माझ्याजवळ तसं भांडवल नाहीं हें या बापूरावांना आतां समजलं आहे.

[ ऑडिटोरियममध्यें गोंगाट, आरडाओरड, टाळ्या, शिट्या आणि शिव्या ]

**सूत्रधार :** अरे बापरे ! दहा वाजले वाटतं ! लोक ओरडताहेत बाहेर! आज चांगलीच तुफान गर्दी दिसत आहे नाटकाला !

**बापू :** तें यांच्यामुळं नि यांच्यासाठीं !

**शेटजी :** इश्श

**बापू :** बरं का मालक, आजपासून सुभद्रेचं काम या करतील.

**शेटजी :** आणि अर्जुनाचं काम—

**बापू :** इश्श !

**सूत्रधार :** देईन थोतरींत आतां इश्श म्हणशील तर !

**मालक :** बापूराव, आतां तुम्ही यानंतर अर्जुनाचं काम करणार आहात. झेपेल ना ? (हंसून) शेवटीं सुभद्रेनंच अर्जुनाचं हरण केलं तर !

**सूत्रधार :** पांड्या, पाहतोस काय येड्या.

**पांडू :** अगदीं येड लागायची वेळ आलीय खरी. सख्या, दे घंटा पहिली—

**सखा० :** पहिलीनं नाहीं भागायचं. बाहेर हाउस फुल आहे. पांड्या, तिसरीच घंटा देतो.



आंधळेपणामुळें ज्यास समोरच्या माणसाची क्रोधचर्या दिसत नाहीं अशानें याचना केली असतां एक वेळ चालेल पण ज्याला डोळे आहेत अशानें दैन्य भाकणें हें केवळ दुःखास्पद आहे !



**अच्युत बर्वे**



त्याला केवळ बोभाटा
हवा होता
आणि ती तर
त्या बोभाट्यालाच
भीत होती. कारण ?
तिचें नांव होतें

# सीता-

आणि नांवाप्रमाणेंच
ती वागली !

इतके दिवस वाटे, कीं कांहीं विशिष्ट थरांतले लोकच नांवलौकिकाची कदर करतात–प्रतिष्ठेला जपतात. नुसते जपतात एवढेंच नव्हे तर प्रतिष्ठेचा बाऊ करतात. लोकापवादाला भितात. जें कांहीं करावयाचें तें गुपचूप करून सवरून वर संभावितपणा मिरवतात. ही वृत्ति केवळ सुज्ञांची, शहाण्यासुरत्यांची असावी. किंबहुना, अशा वृत्तीचे जनकच ते असावेत.

माझी ही समजूत कालपरवांपर्यंत दृढ होती. पण गेल्या दोनचार दिवसांत कांहीं गोष्टी कानांनीं ऐकल्या आणि डोळ्यांनीं पाहिल्या तेव्हांपासून मात्र वाटूं लागलें..

गोष्ट आमच्या गांवांतली आहे. प्रसंग घराजवळ घडला आहे.

मी राहतों त्या घरापासून दोनतीन घरें पलीकडे एक मोठें बंगलीवजा दुमजली घर आहे. आजुबाजला असलेलीं आमचीं सर्वांचीं घरकुलें बैठीं आहेत. इतर बैठ्या घरांत हें दुमदार घर मोठ्या डौलदारपणें उभें आहे. जशी या घराची मान उंच आहे तशीच त्याच्या मालकाची, भैय्यासाहेबांची मान ताठ आहे.

भैय्यासाहेब हें आमच्या गांवांतलें एक बडें प्रस्थ आहे. गृहस्थ चांगला सज्जन आहे. गांवांत स्वतःच्या मालकीचीं दहाबारा घरें आहेत. गांवांतला छापखाना, पिठाची चक्की आणि किराणा मालाची वखार हीं सर्व त्याच्याच मालकीचीं आहेत. दोन्हीतिन्ही ठिकाणीं मिळून पांचपंचवीस नोकरचाकर आहेत. नोकर माणसांकरितां, दुमजली घराच्या शेजारींच एक बैठी चाळ आहे.

गांवकरी असें सांगतात कीं भय्यासाहेबांचा हा सारा पसारा अलीकडचा आहे. दहा बारा वर्षांपूर्वीं प्रथमच ते इकडे आले. कुठून आले, कुणाला ठाऊक ! पण आले ते येतांना बरोबर एक शेलाटी अंगकाठीची छबेल बाई

आणि एक घरच्याच मुनीम, दोघांनाच घेऊन आली. थोड्याच दिव-सांत आई आली तशी निघून गेली आणि पुन्हा केव्हांच ह्या बाजूला फिर-कली नाहीं. त्या दिवसापासून महिन्याकाठीं एखाददोनदां भय्यासाहेब निय-मितपणें मुम्बई–पुण्याकडे खेप टाकतात. दोन चार दिवस बाहेर राहतात आणि पुन्हां परत येतात. कांहीं कामामुळें मुम्बई–पुण्याकडे जाणें जमलें नाहीं तर मग हरकामी मुनीम, बाळकृष्णा, गांवांत एक चक्कर टाकतो. त्या दिवशीं भय्यासाहेबांच्या अंतरंगांतल्या चारपांच शिष्टांना मोठ्या आग्रहानें बंगल्यावर बोलावण्यांत येतें आणि मग त्या रात्रीं पहांटेपर्यंत बंगल्यांतून गाण्या–बजा-वण्याचे सूर आणि हास्यविनोद ऐकूं येतो. पण हें क्वचित्! महिन्याकाठीं मुम्बई–पुण्याकडची खेप हें आपलें ठरलेलें.

भय्यासाहेबांच्या गैरहजेरींत व्यापारधंद्याची सारी व्यवस्था बाळकृष्णा मोठ्या दक्षतेनें पाहतो. खरें पाहिलें असतां, बाळकृष्णा हुषार आहे असें नाहीं. पण चलाख नसला तरी सांगितलें काम ऐकण्याचा मोठा गुण त्याच्या-पाशीं आहे. तसा विश्वासू आहे. नाहीं म्हटलें तरी गेलीं दहाबारा वर्षें तो भय्यासाहेबांचा दिवाणजी आहे. गांवांतल्या घरांचें भाडें वसूल करणें, चक्की-वरचा व्यवहार पाहणें आणि जमाखर्च सांभाळणें हीं त्याचीं कामें. उरला सुरला वेळ मालकाच्या तैनातीला रहावें. इतक्या वर्षांच्या अनुभवावरून वाटतें कीं हीं नेमून दिलेलीं कामें तो चोख बजावीत असावा. तशी भय्या-साहेबांचीहि त्याच्यावर फार मर्जी आहे.

नुसती मर्जी आहे एवढेंच नव्हे तर भय्यासाहेबांचा त्याच्यावर जीव आहे. मला आपलें पहिल्यापासूनच वाटे कीं, ही मर्जी आणि हा लोभ... दारीं बाळगलेलें कुत्रें फार प्रामाणिक आणि लाडकी असलें तर आपला नाहीं का त्याच्यावर साहजिकच जीव जडत? निर्माण झालेल्या आपुलकींतून आपण नाहीं का कुत्र्याला वेळोवेळीं आंजारूनगोंजारून खूष ठेवीत? त्याच्यासाठीं कांहीं चांगल्या गोष्टी करीत?

वाटे कीं तसेंच बाळकृष्णाच्याहि बाबतींत असावें...

गेल्याच महिन्यांत, भय्यासाहेबांनीं बाळकृष्णाचें लग्न लावून दिलें. साध्या मुनीमाचें लग्न! पण मोठ्या हौशीनें थाटामाटांत झालें. त्यालाहि भय्या-साहेबांशिवाय कुणी नाहीं. तेव्हां मुलगी पसंत करण्यापासून तों देण्याघेण्याच्या व्यवहारापर्यंत सारें कांहीं भय्यासाहेबांनींच उरकलें.



बाळकृष्णाहि नशीबाचा! अशी फक्कड बायको मिळाली कीं, साऱ्यांनीं म्हणावें, "नाहीं बुवा, असा वाण कांहीं गांवात नाहीं."

अंगकाठी ठेंगणी दुसकी. रुपानें नीटनेटकी. रंगानें काळीसांवळी. तुक-तुकीत. चेहरा हंसरा गोल. आकर्षक. एकंदर सुरत अशी कीं वर वर पाहिलें तर वाटावें हें सौंदर्य सौम्य आहे. सुखदायी आहे. नजरेला नजर भिडवून, रोखून पहावें तर जाणीव व्हावी कीं, हें लावण्य उन्मादक आहे, बेचैनी आहे....

हल्लीं हल्लींच भय्यासाहेबांची आणि माझी थोडीफार ओळखपाळख झाली आहे. फार नसली तरी एखादेवेळ बैठकीला बसण्याइतपत!

लग्नानंतर, एका बैठकीच्या रात्रीं भय्यासाहेबांच्या मर्जीतले आम्ही कांहीं लोक इकडच्या तिकडच्या गप्पा छाटीत बसलों होतों. इतक्यांत, आमच्या अंगावरून बाळकृष्णाची बायको–सीता–आंघोळीला खालीं निघून गेली. तिच्या पाठमोऱ्या आकृतीकडे पाहून आमच्यापैकीं कुणीतरी म्हटलें, "तुम्ही कांहीं म्हणा भय्यासाहेब, पण नाकापेक्षां मोती जड आहे..." आम्ही सर्वजण हंसूं लागलों. आमच्या हास्यांत सामील होऊन, हलकेंच शेजाऱ्याला डोळा घालून भय्यासाहेब म्हणाले, "पण ह्या नाकाला तर मोती झेपेल ना?" झालें. आम्ही समजलों. माझ्या आपलें मनांत आलें कीं बिचारा बाळकृष्णा! पण एवढ्यांत कुणीतरी म्हटलें, "भय्यासाहेब तुम्हां-लाहि जड जाईल." आतां भय्यासाहेबहि जिद्दीला पेटले. आपल्या मिस्किल डोळ्यांची एकदोनदां उघडझांप करून ते म्हणाले, "पहा बरं, आजपासून महिन्याच्या आंत आमचा बोभाटा तुमच्या कानीं येईल. आतां मी तसा माणूस नाहीं. पण तुम्ही म्हणतां म्हणून सांगतों कीं पहाच तुम्ही–बाई कशीहि असो या भय्यासाहेबांपुढें..."

"पण भय्यासाहेब, ही सीता आहे–" माझ्या ह्या बोलण्यावर भय्या-साहेब खो खो करून हंसूं लागले. हंसताहंसतांच म्हणाले, "अहो, ही सीता असली तरी बाळकृष्णाची! रामाची नव्हे." भय्यासाहेबांनीं मोठ्या आनं-दानें, आव्हानाचा स्वीकार केला. आम्ही उठलों आणि उठतांउठतां बरो-बर महिन्यानें भेटावयाचें असें ठरविलें.

बाळकृष्णाच्या बायकोचें मी बारकाईनें निरीक्षण करूं लागलों. दिवसा-काठीं एकदोनदां ती बैठ्या चाळींतून बाहेर पडे. पण बंगल्याकडे फिरकत नसे. ती बाहेर पडे तेव्हां सारे लोक अधाशीपणें तिला पाहून घेत. तिला नुसतें पाहून जेवढें सुख होतें त्यापेक्षां तिला चालतांना, बोलतांना आणि हंसतांना पाहण्यांत जास्त बरें वाटतें असें रसिक एकमेकांना सांगत. तिच्या चालण्याची, बोलण्याची आणि हंसण्याची एक विशिष्ट ढब होती. चालत्या बोलत्या तिच्याकडे पाहून मलाहि वाटे कीं, या सौंदर्यांत एक तऱ्हेची अपू-र्वाई आहे. विशिष्ट गोडी आहे. आपल्याकडे इतर पाहतात, एवढेंच नव्हे तर आपल्या सौंदर्याचें कौतुक करतात या गोष्टीची जाणीव तिला असावी असें वाटतें. अशी जाणीव असलेली, त्याचा अभिमान बाळगणारी पण लोकांपासून अलिप्त राहूं इच्छिणारी स्त्री नजरेला नजर केव्हांच भिडवीत नाहीं. नाकासमोर पाहून चालते. सीतेचीहि हीच रीत. तसेंच कुणी ओळखीचें भेटलें तर थोडें हंसावयाचें, कुणी बाईमाणसानें फारच सलगीनें अडविलें तर थोडा वेळ थांबावयाचें! बस्स. एवढेंच. ह्याच्यापलीकडे कांहीं नाहीं. बाईची ही रीत पाहून मला वाटे कीं, बाई चांगली गरती आहे. माझ्याच-प्रमाणे कांहीं म्हणत कीं ती कुलशीलाची आहे. तिला रीतरिवाज टाऊक आहे. पण कांहींचें म्हणणें असें कीं दाम खोटा आहे. फसवा आहे. उगाच सभ्यतेच्या पांघरुणाखालीं गुरफटलेला आहे.

पाहतां पाहतां महिना निघून गेला. पण कांहीं झालें मात्र नाहीं. विशेष असा कांहीं बोभाटा कानीं आला नाहीं. वाटलें कीं, भय्यासाहेब विसरले असावेत. नाहींतर त्यांचें कांहीं चालत तरी नसावें. पण नाहीं. ज्या दिवशीं बरोबर महिना झाला त्याच दिवशीं त्यांनीं आम्हाला बंगल्यावर बोलावून घेतलें आणि म्हटलें,

"आज महिना झाला. मुदत संपली. कबूल. पण एक चार दिवस आणखी हवेत." झालें. चार दिवस आणखी देण्यांत आले.

दुसऱ्या का तिसऱ्याच दिवशीं, भय्यासाहेबांनीं, म्हणे, तांतडीनें बाळकृष्णाला बंगल्यावर बोलावून घेतलें. त्यांना एवढें संतापलेले त्यानें पूर्वी केव्हांच पाहिलें नव्हतें. थरथर कांपत तो समोर उभा होता. भय्यासाहेबांनीं त्याच्यापुढें जमाखर्चाच्या चोपड्या फेकल्या आणि म्हटलें, "इतकीं वर्षें तुझ्यावर विश्वास टाकला आणि तूं मात्र साफ गळा कापलास." बाळकृष्णाला कळेना कीं आपल्या हातून असा गुन्हा झाला तरी कोणता ? तरी पण भय्यासाहेबांच्या एकंदर आविर्भावावरुन त्याला वाटलें कीं, आपलें कांहींतरी खास चुकले असावें. अक्षम्य असें कांहींतरी गफलतीनें घडलें असावें. त्यानें हात जुळवले आणि डोळ्यांत पाणी आणून म्हटलें,—पण त्याला जें म्हणायचें होतें तें नीटसें म्हणतां आलें नाहीं.

रागावलेले भय्यासाहेब एकदम शांत झाले. बाळकृष्णाला त्यांनीं जवळ बोलावलें आणि आवाज पाडून म्हटलें, "मोठा भयंकर माणूस आहेस तूं ! तुझ्या गफलतीनें माझें केवढें नुकसान झालें कांहीं कल्पना ? आतां तूंच आहेस म्हणून, नाहींतर दुसरा कुणी असता तर सरळ चावडीवर खेचला असता. कमीतकमी वर्ष सहा महिने—"

बाळकृष्णाच्या डोळ्यांसमोर काजवे चमकले. थरथर कांपत तो म्हणाला, "नको—नको. तेवढंच नको. इतकीं वर्षें चाकरी केली. आतां हा धक्का नको. अब्रूनें जगूं दे. उजळ माथ्यानें वावरूं दे." भय्यासाहेबांनीं पुन्हां अवसान आणलें. बोलले, "आतां तूंच सांगतो आहेस म्हणून... पण आतां या गुन्ह्यांतून सुटायला एकच वाट आहे..."

"सांगा धनी, काय लागेल तें सांगा. सांगाल तें ऐकेन. पण वांचवा."

"प्रकरण कोर्टदरबारी गेलं नाहीं पाहिजे..."

"नको नको. तेवढंच बोलूं नका."

"मग असं कर. हें पहा, तुझं नुकतंच लग्न झालं आहे. बायको तरुण आहे. सुंदर आहे. बाई उफाड्याची आणि त्यांतून गांवांतले लोक टवाळ. तूं हा असा !" भिजा आणि लाचार बाळकृष्ण भैय्यासाहेब काय सांगतात तें कान टवकारून ऐकूं लागला. भैय्यासाहेबांनीं त्याच्याकडे रोखून पाहिलें आणि म्हटलं, "मी सांगेन त्याचा नीट विचार केलास तर तुझें तुलाच समजेल. मी सांगणार आहे त्यांत विशेष असें कांहींच नाहीं. मला आपलं वाटतं, तूं सीतेला घेऊन बंगल्यांतच रहायला ये. घरांत बाई-माणसाचा हात फार दिवसांत फिरलेला नाहीं; म्हणून सर्व भकास वाटतें. उदास दिसतें. ओसाडासारखें होतें. आपण तिघे एकत्र राहूं."

"पण हें लोकांत ठीक दिसणार नाहीं—"

"पण आपल्याला लोकांशीं काय करायचं आहे ? विचार कर. सीतेचा सल्ला घे. काय तें ठरव आणि उद्यांपासून इकडेच रहायला या—"

बाळकृष्ण जागच्या जागीं उभा राहिला. सुन्न. काय करावें कांहीं कळेना. रागारागांत घरीं आला आणि सीतेला बोलला. "हें गांव सोडून जायचं.

पळून जायचं. आजच्या आज. चल आटप. पाहतेस काय अशी?" सीता आश्चर्यानें पहातच राहिली. तिला कळेना कीं एकदम असें झालें तरी काय? तिनें धीर करून विचारलें, "पण असें झालें तरी काय?" बाळकृष्णानें घडला प्रसंग तिच्या कानीं घातला आणि म्हटलें, "काय वाटेल तें झालें तरी चालेल. पण मी हें सहन करणार नाहीं. लोक काय म्हणतील? दिसायला किती वाईट दिसेल...पण आतां ह्यांतून सुटायचं कसं—" आणि बाळकृष्णा ओक्साबोक्शीं रडूं लागला.

सीतेनें कांहींतरी निश्चय केला. आपली स्थिति आणि आपल्या नवऱ्याचा वैकुत्र ध्यानीं घेतला आणि म्हटलें, "थांबा, मीच भेटतें त्यांना."

"नको नको. तूं भेटूं नकोस—"

"नाहीं, मीच भेटतें. तुमच्यानें जमणार नाहीं. जातें नि विचारतें त्यांना. त्यांच्या प्रश्नाला मीच देतें उत्तर."

"असं सांगणार तरी काय तूं?—"

"तुम्हांला कळायचं नाहीं. वेळ आली तर दोन थोबाडींत मारीन आणि सांगेन...."

"नको—नको तुझ्या पाया पडतो—"

"मग होऊं दे तर नाचक्की! आतां तोंड उघडलं नाहीं तर उद्यां तोंड नको काढायला गांवांत—"

"मला कांहीं कळत नाहीं. तूं भेट. भेट तूं आणि सांग...पण—"

"पण काय? आम्हीं तिकडे रहायला येतों असं म्हणेन असं वाटलं कीं काय तुम्हांला? तुमची बायको आहे मी. हाडापेरानें दणकट आहें. तशीच मनानंहि आहे. माझं नांव सीता आहे—"

सीतेनें विचार केला. मनाशीं खूणगांठ बांधली आणि भय्यासाहेबांची भेट घेण्यासाठीं ती आली. तिला पाहून भय्यासाहेब चमकले. तेव्हां ती हंसली आणि बोलली, "मी आलें आहे...."

"बाळकृष्णानें सांगितलं वाटतं तुम्हांला—"

"हो—"

"मग? नीट सांगितलें ना त्यानें? तसं माझ्या मनांत अजीबात पाप नाहीं."

"हो—मला माहीत आहे तें. म्हणूनच मी आल्यें."

सीता त्यांच्या नजरेंत नजर घालून बोलूं लागली, "त्यांना ह्यांतलें कांहीं कळत नाहीं म्हणून मीच आलें, त्यांना न पाठवतां मीच आलें. ह्यांतच तुम्हीं काय तें समजा." क्षणभर ती थांबली. पुढें सरकली आणि पुन्हा एकदां हंसून बोलली, "समजलें ना! पण माझीहि एक अट आहे. ही गोष्ट लोकांना आणि विशेषतः माझ्या नवऱ्यालासुद्धां कळतां नये. आतां या तुमच्या बंगल्यांत रहायला यायचा त्यांना आग्रह नका करूं."

आणि भय्यासाहेबांनीं दुसरे दिवशींच दोस्त लोकांपुढें जाहीर केलें, "आपण हरलों. सीता मोठी जबरदस्त बाई आहे. कुलशीलाची दिसते. नांवाप्रमाणें आहे ही सीता."

पण आश्चर्य असें कीं, मला मात्र भय्यासाहेब हल्लीं टाळतात. कधीं भेटलेच तर नुसते हंसतात.



## डोळे तुझे शराबी

इष्कांत धुंदलेले
डोळे तुझे शराबी
अन् मस्त रंगली ही
प्रीती तुझी गुलाबी

मी मद्यपी जगीं या
सौंदर्य प्राशणार!
जाईन टाकुनी कां
ओठांतली कुसुम्बी?

रंगेल प्रीत माझी
सांधेल दोन जीवां,
उन्मत्त यौवनाच्या
कां चुम्बनास बंदी?

तूं सुस्त जाहलेली
बेभान मुग्ध बाला
मी मस्त हिंडणारा
विश्रांत भोग भोगी.

मदिरा तुझ्या अपांगीं
—ही केवढी बिदागी!
तुज साज तो कशाला,
प्रीतींत तूं मुरब्बी!

— भालचंद्र खांडेकर

सौ. मृणालिनी देसाई



काळ स्वतःच्या गतीनें
एकेक पाऊल टाकीत होता
आणि विरहानें
व्याकुळ झालेले मीरेचे

# अमर अश्रू

गिरिधर गोपाळाची
वाट पहात होते !

कै. बालकवींनीं कवींचे वर्णन करण्यासाठीं गीतेंतील 'क्षीणे पुण्ये' ह्या श्लोकावरून "बाळें तीं खेळत होतीं" ही करुणरम्य कविता लिहिली आहे. "देवाचीं लाडकी बाळें खेळत असतां गोफाच्या सोनेरी तारा तुटल्या आणि बाळें खालीं कोसळलीं. जगाच्या खाईत होरपळून पूर्वस्मृतीच्या स्मरणानें त्यांचीं जड अंतःकरणें निःश्वास सोडतात—तींच जगाचीं सर्वोत्तम काव्यें ठरतात."

बालकवींनीं स्वतःच्या काव्यमय भाषेंत उत्तम कवीचे गुणहि सूचित केले आहेत. कवीचें निष्पाप मन, जगाच्या वरच्या थातळींत गुंगण्याची त्याची वृत्ति, यातनांच्या भोगानें येणारी त्याची उत्कटता आणि ह्या कविमनाचं व्यवहारी जगाशीं अविरत चालणारं द्वंद्व. देवाच्या लाडक्या बाळांना फुलासारखं फुलून जातां येत नाहीं. त्यांच्या जीवनपुष्पांचा सुगंध त्यांच्या रक्तसिंचनानें शांत झालेल्या मातींतून दरवळतो !

सूर्याच्या प्रखर किरणांनीं तप्त झालेल्या—रुक्ष मरुभूमींत परमेश्वराच्या लाडक्या कन्येचीं, मीरेचीं, नाजुक पावलें उमटलीं आहेत. गुजरातची संपन्न शेतें मीरेच्या काव्यांनीं पुलकित होत आहेत. गिरिनारच्या गर्द झाडींत अजूनही "मीरेचा गिरधर नागर" गुंजत आहे. वृंदावनच्या कुंजगलींतील मनमोहनाच्या मुरलीच्या स्मृतींतच मीरेच्या काव्यांतील करुण उत्कटता सामावून राहिली आहे. आणि चितोडच्या कर्तव्य-कठोर तेजस्वी इतिहासाची मान या साध्वीच्या स्मृतींस किंचित् लवून मान देत आहे!

मीरेचा जन्मकाल निश्चित सांगतां येणार नाहीं. अकबर आणि तानसेन ह्यांनीं तिची भेट घेतली होती ही दंतकथा प्रचलित आहे. त्यावरून १७ व्या शतकाच्या आरंभीं तिचा जन्म गृहीत धरावा लागेल. तिनें तुलसीदासांना लिहिलेल्या पत्रावरून—त्याचा उल्लेख सत्य असेल तर—१६३१ च्या आसपासचें साल ग्राह्य धरावें लागेल. काल-निर्णयावरून तिचा जन्म १५५० च्या सुमारास असावा असें वाटतें. नर्मदाशंकर १४७५ व विपिन बिहारी १५५७ असे सन देतात. राणा कुंभ व भोजराज अशीं तिच्या पतीचीं पृथक नांवेंहि आहेत. तसेंच तिचें जीवनहि अनेक दंतकथांनीं भरलेलें आहे.

मीरा लहान असतांना तिनें एक वरात जातांना पाहिली. नवरदेवाला घोड्यावर पाहून तिच्या बालमनाला कुतूहल वाटलें व तिनें आपल्या आईला

विचारलें "हें काय?" आईनें सांगितलें, "शेजारच्या रंभेचं लग्न झालं. तिची वरात." मीरेची समजूत होईना.

रंभा परणी, राधा परणी,
हुं केम रही कुंवारी ?
कई समझण ना पडती.
आँखो टगमग टगमगती !

रंभेचं लग्न झालं. राधेचंहि झालं होतं. मग माझेंच कां लग्न होत नाहीं ? अज्ञानानें भरलेले–गोंधळलेले ते छोटेसे डोळे भिरीभिरी पहात होते. "

ह्या पोरीला काय सांगावें, आईला कळेना. तेव्हां सुख आणि दुःख ह्यांनीं भरलेल्या स्त्रीजीवनाचा अर्थ तिनें मोठ्या मार्मिकपणें छोट्या मीरेला समजावून सांगितला.

"बाळ तूं मोठी होशील, पाण्याची घागर भरून आणायची जेव्हां तुला संवय होईल, श्रममय स्त्रीजीवनाशीं तुझा परिचय होईल तेव्हां तुझा विवाहही होईल."

तरीही मीरेची समजूत होईना. आई कंटाळली. तिनें देवाच्या मूर्तीकडे बोट दाखवून सांगितलें, "हा बघ तुझा पती, तुझंही लग्न झालं आहे. झालं समाधान ?" मातेच्या मुखानें जणूं भवितव्यताच बोलली. आणि लहानपणापासून मीरेचें जीवित त्या मूर्तीबरोबर गुंफलें गेलें.

पुढें जनरीतीप्रमाणें मीरेचें लग्न झालें. त्या वेळीं आईला ती म्हणते, "माझं लग्न करूं नका, माझें मन संसारांत नाहीं. गिरिधर कृष्णाबरोबर माझें खरें लग्न झालें आहे.

मै वरीयां गिरिधर गोपाल,
नहीं जाऊं सासरिये.
संसार म्हारूं हो सासरनां ने वैकुंठ म्हारो वास.
सासु हमारी सुषुम्णा रे ससरो प्रेम संतोष."

"सारं विश्व हें माझं सासर. वैकुंठ माझा महाल आहे. माझें मन मीं कृष्णाला वाहून टाकलें आहे." पण आई–बाप थोडेंच ऐकणार ? ह्या 'पोरकटपणा' कडे कोणी लक्ष दिलें नाहीं. मीरा चितोडची युवराणी झाली !

सासरीं मीरेनें गृहिणीचीं कर्तव्यें चोख बजावलीं पण मन भगवंतापाशीं ठेवून ती वावरत होती.

तेने खूणे बेसीनें मे तो झीणुं कात्युं
ते नथी कांई राख्युं काचुं रे

"तुमच्या घराच्या एका कोपऱ्यांत बसून मीं बारीक, सारखें सूत कांतलें आहे. धागा कोठेंहि कच्चा नाहीं– सारं काम व्यवस्थित आहे– सुंदर आहे– पण मन त्यांत नाहीं ! ह्या स्वप्नाळू मनाचें आणि जगाचें– व्यवहारी जगाचें–द्वंद्व अटळ होतें."

सजनियाँ दुसमण थई बेठ्या,
सबने लगूं कडी

"स्वजनच माझे वैरी झाले– साऱ्यांना मी वाईट, नकोशी वाटूं लागलें."

भोंवतालचा रूढीप्रिय समाज आणि अनादिकालापासून स्त्रीपुढें पडलेल्या मर्यादा–

कोस कोस पर पहरा बैठ्या,
पैडं पैडं बटव्यार.

"ठाईं ठाईं रुष्ट स्वजनांचे पहारे आहेत– रूढीप्रिय समाज ठिकठिकाणीं वाटमाऱ्याप्रमाणें सतावण्यास सज्ज आहे."

शंकित आणि क्रुद्ध दृष्टिक्षेपांनीं विद्ध झालेली मीरा थकली. तिनें तुळशीदासांना कळविलें-

घरके स्वजन हमारे जेते,
सबन उपाधी बढाओी
साधुसंग अरु भजन करन मोही
देत कलेस अपाओी
बालपनसे मीरा किनी, गिरिधरलाल मिताओी,
सो तो अब छुटे नहीं, लगी लगन बरिआओी.

"माझ्या स्वजनांचा त्रास मला असह्य झाला आहे. साधुसंतांच्या मेळाव्यांत भजन करण्यानें कुलाला कलंक लागतो– पण मी काय करूं ? लहानपणापासून जीवाचे बंध गिरिधराबरोबर बांधले गेले ते आतां जन्मोजन्मीं तुटणें शक्य नाहींत."

तुलसीदासांचा धीरगंभीर जबाब मिळाला–

"राम-सीतेला जे पूज्य मानीत नाहींत ते कितीहि जवळचे संबंधी असोत, सदैव त्याज्यच आहेत. प्रल्हादानें पिता, बिभीषणानें बंधु, भरतानें माता, बलीनें गुरु आणि गोपींनीं साक्षात् पती ह्या साऱ्यांचा त्याग केला. त्यांच्या त्यागाचा परिणाम विश्वकल्याणी झाला. डोळ्यांना अंध करणारें अंजन कधींच ग्राह्य नसतें. तुझें प्रीतिस्थान सर्वोत्तम आहे आणि तूं त्याचें प्राणापलिकडे जतन कर. त्याहून शिव आणि भव्य दुसरें कांहींच नाहीं."

ह्या उत्तरानें मीरा शांत झाली. निश्चयाचें बळ वाढलें. एकटेपणा सहन करण्याची शक्ति आली.

मेरे तो गिरिधर गोपाल दूसरा न कोओी ।
जाके सीर मोर-मुकूट, मेरो पती सोही ।
तात, मात, बंधु, भ्रात, आपनो न कोओी ।

"माझें गिरिधर गोपाळाखेरीज दुसरें कोणी नाहीं." इहलोकीचीं सारीं नातीं तुटलीं. भक्तिमार्गावर मुक्त झालेली मीरा एकटी चालूं लागली. थोर निर्दोष हृदयांना ह्या पृथ्वीवर अजोडच जगावें लागतें का ? रवींद्रांनीं–"एकला चलो रे" ह्या करुण-गंभीर शब्दांनीं स्वतःच्या मनाला धीर दिला. नौखालीच्या यातनामय प्रदेशांत थोर पाऊलें ही एकलेपणानेंच पुढें गेलीं. ह्याच एकलेपणांत गुंग होऊन मीरा पुढें चालली होती.

, मगन होई मीरा चली।
म्हारो कोई नही रोकणहार।

"प्रेममग्न, ध्यानमग्न मीरा पुढें चालली. तिला अडवायला कोणी समर्थ नाहीं." मीरेनें चितोडची कर्तव्यकठोर भूमि सोडून कृष्णाची द्वारका पाहिली, मथुरा-वृन्दावनचें दर्शन घेतलें-प्रभुप्रेम दृढ झालें. परंतु त्यांत शंका होती, व्याकुळता होती. प्रेम अजून अपूर्णावस्थेंत होतें. ही तळमळ थांबवून प्रेमाला सखोल, पूर्ण आणि फलदायी बनविण्यासाठीं तिला सद्गुरुची जरूर होती.

"मोहे लागी लटक गुरु-चरनकी"

तिच्या आर्त हांकेला साद मिळाली. संत रैदासासारख्या गुरूची तिला प्राप्ती झाली.

खडी खडी मैं पंथ निहारूं,
मरम न कोई जाना।
सतगुरु औषध ऐसी दिनी
रोम रोम भयो चैना।
सतगुरु जैसा वैद न कोई
पूछो वेद पूराना।
मीराके प्रभू गिरिधर नागर
अमरलोक मे रहेना।

जीवनांतील आशेची वेल फुलून निघाली. गुरूनें तिचें मन शांत केलें. वेदवेदांतही गुरूची महती गाइलेली सांपडेल. गुरु आणि गोविंद दोन्हेहि भेटल्यावर कशाची कमतरता आहे?

नहीं मैं पिता सासरेरे, नहीं पियाजीरे पास।
मीराने गोविंद मिलीया, गुरु मिलिया रैदास।

"पिता, श्वशुर, अगर पति-माझ्यापाशीं कोणीच नाहीं. गुरु रैदास आणि गोविंद दोघे मात्र मला मिळाले."

●

लहानपणींच मीरेला "हें तुझें सर्वस्व" म्हणून परमेश्वर दाखविला गेला. त्या बाळाला तें दिव्य खेळणें आवडलें. निष्पाप हृदयांत अल्लड प्रेमाचा अंकुर फुटला, त्या खेळण्याला घेऊन मीरा नाचली.

मने राम मकडुं जडियुं रे
राणाजी मने रमें रमकडुं जडियुं.

"मला राम मिळाला, पति मिळाला-सुंदरसें खेळणें मिळालें." हळूं कुतूहल निर्माण झालें. हें खेळणें कोठून आलें, कोणी घडविलें-आपल्याला कोणी दिलें? ज्ञानचक्षु हळू हळू उघडूं लागला व त्यायोगें तिला कळून आलें.

रमझुम करतुं मारे मंदिरे पधारयुं
नहीं कोईने हाते घडियुं.

"ते स्वतःच आपल्या पायांचा मंजुळ झंकार करीत माझ्या मंदिरांत अवतरले. त्याचा घडविणारा ह्या दुनियेंत कोणी नाहीं.

मोटा मोटा मुनिजन मथि मथि थाक्या
कोक विरलाने हाथे चढयुं.

"हा दुर्मिळ आहे-मोठे मोठे मुनिवर ह्याला शोधशोधून थकले पण क्वचितच कोणाला त्याची प्राप्ती झाली..." आणि ह्याचा अंतिम परिणाम—

बाई मीराके प्रभु गिरिधर नागर।
नाचे मन शामळियाने जडियुं.

मीरेचें मानस-पुष्प श्यामल प्रभूच्या चरणाला वाहिलें गेलें. प्रभुचरणीं सारे नीरस झालें. निर्लेप बनले.

चांदा सूरजतेज तजीने
आलिया संगाथ प्रीत जोड्सा।



"चंद्र-सूर्याचें दिव्य भव्य तेज निरखल्यावर काजव्यांच्या तेजाची काय तमा?"

नाचूँगी, नाँऽचूंगी
प्रेम-प्रीतीके बांधी घुंगुरु
सुतकी कछनी काछूंगी.

प्रेम आणि प्रीतीचे चाळ पायांत बांधून मीरा भक्तीनें बेभान होऊन नाचूं लागली. तिनें आपला सारा भार त्यांच्यावर टाकला.

ज्यो पहिरावे सोई पहिरुं
जो देई सोई खाऊँ.
मेरी उनकी प्रीत पूरानी,
उन बिन पल न रहाऊं,
जहाँ बेठावे तितही बैठू
बेचै तो बिक जाऊं.
मीरा के प्रभू गिरिधर नागर
बार बार बली जाऊँ.

माझ्या प्रियतमाला जें आवडेल तेंच वस्त्र मी धारण करीन. तो देईल तेच खाईन,—जिवा-शिवाची जन्मोजन्मीची खूण—गांठ पटली, प्रेमाच्या यज्ञांत मीरेनें स्वतःच्या व्यक्तित्वाचा हवी देण्यास सुरुवात केली, आत्मत्यागाच्या धारेनें प्रेम तेजोमय होत गेलें.

"त्यानें माझा विक्रा केला, तर बेशक विकली जाईन. हे मीरेच्या प्रभो, तुझ्यासाठीं वारंवार आनंदानें बळी जाईन."

सारा अहंकार वितळून गेला—सेवामय प्रेमाची मंद ज्योती प्रकटली.

म्हने चाकर राखोजी
हरे हरे नित बाग लगाऊं,
बिच बिच राखूं क्यारी.

"तुझ्या पायांशीं मला चाकर म्हणून राहूं दे, तुझ्यासाठीं मी हिरवेंगार मळे करीन, बाग शिंपीन.

जोगी आये जोग करने
तप करने संन्यासी
हरिभजन को साधु आये
वृन्दावनके वासी.

"योगी योगसाधना करीत आहेत, संन्यासी तप करीत आहेत. साधु—संत भजनाची धून लावून बसले आहेत. ह्या विशुद्ध वातावरणांतून सेवावृत्तीनें लीन, नम्र झालेल्या मीरेच्या प्रेमाचा खोल प्रवाह संथ वहात आहे!

मीरा कहे प्रभु गहिर गभीरा,
हृदे रहोजी धीरा,
आधिरात प्रभु दरसन पाजो,
प्रेमनदी के तीरा.

"हे गंभीर आणि धैर्यशाली अशा मीरेच्या प्रभो, माझ्या हृदयांतच आपला निवास असो, आणि प्रेमनदीच्या तीरीं कोणत्याही क्षणीं मला दर्शनाचा लाभ मिळो."

मीरा दासी जनम जनम की
पडी तुम्हारे पाय.

मीरा सगुण उपासनेंत रंगून गेली.

मने मुखडानी माया लागीरे मोहन तारा.
मुखडूं मे जोयुं त्हारुं, जग थयुं खारूं खारूं
मन मारूँ रहयुँ न्यारूं.

"तुझ्या मुखकमलाच्या प्रेमानें मी वेडी झालें. तुझें दर्शन होताच सारें जग मिठाच्या खड्या-प्रमाणें वाटूं लागलें.— माझें मन (तुझ्यापाशीं राहिल्यामुळें) जगापासून अलिप्त राहिलें."

दर्शनाची उत्कंठा तिनें मोठ्या चातुर्यानें व्यक्त केली आहे. ती कावळ्याला म्हणते—

कागा, सब तन खाइयो
चुन चुन खैयो मांस,
दो नयन मत खाइयो
पिया देखन की आस.

"माझ्या शरीराचे लचके तोडून तूं खुशाल खा, पण फक्त डोळे राहूं दे— कारण—त्यांत प्रभु-दर्शनाची आशा राहिलेली आहे."

कागा, नैन निकारके ले जा पिया के द्वार
पहिले दरस दिखाओ के पीछे ली जो खाय.

"हे डोळे काढून प्रभूंच्या दाराशीं घेऊन जा, आणि दर्शनानें सार्थक पावलेले डोळे सेवन करून तूं तृप्त हो."

हें भावनामय हृदय मातृत्वासाठींही तहानेलें होतें. तिचा बाळही देवच होता.

प्रभू आवो आवो आवो
मन मंदिरमें आपनामनीं
प्रेममूर्ति प्रकटावी.
नहानकडा थई लाडकडा थई
एकवार रमी जावो.
हैयाने हिंचोळे हांचो, बाल स्वरुपमे आवो.

"हे प्रभो, माझ्या ह्या मानसमंदिरांत तूं प्रेमस्वरूपानें प्रकट हो. लहानसें बालक होऊन रांगत रांगत माझ्याकडे ये. माझ्या हृदयाच्या हिंदोळ्या-वर झोके घेत सुखानें झोप."

पोपट मैना, मोर रमकडे रमी जावो.

"सारीं खेळणीं मी तुला देईन."

बैनी जशोदा जमुना तटपर
कृष्ण कृष्ण हू शोधू.

"यमुनेच्या वाळवंटांत यशोदा होऊन मी माझ्या बाळकृष्णाला शोधीन."

गायो चारी वेर आवजो
दूध जरा पी जावो

"गायी चारून तूं थकून भागून घरीं येशील त्या वेळीं मी तुला प्रेमानें बसवून थोडें दूध पाजीन."

कालांतरानें प्रेमाला विश्वासाचें अधिष्ठान लाभलें, संशयजाल विरूं लागलें. विरहोन्मादानें उफाळणाऱ्या ऊर्मी शांत झाल्या.

चंदा जायगा सूरज जायगा
जायगी धरण आकासीं
पवन पाणी दोनूं ही जावेगे
अटळ रहे अविनासी.

"चंद्र सूर्य लोप पावतील, धरती आकाशाला मिळून जाईल, वारा आणि पाणी दोन्ही नाहींशीं



अनुक्रमणिका

होतील. साऱ्या अशक्य गोष्टी कदाचित् शक्य होतील, पण माझ्या हृदयांतील प्रभु अविनाशी राहील."

माई मैं गोविंद लिनो मोल.
कोई कहे छाने, कोई कहे चवडे.
लियो है बजता ढोल.

"मीं प्रभूला घेतलें, कोणी म्हणतात गुपचुप घेतलें, कोणी म्हणतात चोरून घेतलें—पण मी डांगोरा पिटून सांगतें कीं, मी प्रभूला घेतलें."

मनाचें एकही द्वार बंद राहिलें नाहीं—सारें जीवन खुलें झालें. राजाच्या रागलोभाची पर्वा नव्हती

राजा रुठे नगरी रखे अपनी
मैं हर रुठ्या कहाँ जाना ?

"राजा कोपला तर नगरवासी जनांपैकीं कोणी तरी मला आसरा देईल. पण चराचरांत भरून राहिलेला जो सर्वेश्वर, त्याचा कोप झाला तर मी कुठें जाऊं ?"

राणानें पाठविलेल्या विषाचा प्याला निर्विकार मनानें पिऊन टाकण्याची शक्ति ह्या प्रेमांत होती, कारण तिची खात्री होती कीं, जगणें, मरणें ह्या गोष्टींवर फक्त प्रभूचेंच नियंत्रण आहे. त्याच्यापुढें कोणतेंही मानवी सामर्थ्य क्षुद्र आहे.

थारे मार्यें नही मरूं,
मारो राखणवालो और

"बाबारे, तुझ्या इच्छेनें कांहीं मला मृत्यु येणार नाहीं, माझा रक्षणकर्ता वेगळाच आहे."

कबीरांनीं म्हटल्याप्रमाणें प्रेमाचा पंथ कांट्यांनीं भरलेला असतो आणि प्रेमस्वरूप मीरा ही वस्तुस्थिति जाणून होती.

यह तो घर हैं प्रेमका खालका घर नही,
सीस उतारे भुई धरे तब बैठे घरमांही.
चलो चलो सब कोई कहे पहूँचा बिरला कोय.

"हें प्रेममंदिर म्हणजे खाण्याचे खेळ नव्हत, शिरकमल उतरून भूमीवर सांडावें तेव्हांच तेथें प्रवेश मिळतो. ह्या रस्त्यावर चालायला कित्येक सुरुवात करतात पण शेवटपर्यंत एखादाच जातो."

स्वतःच्या पावित्र्यासाठीं अग्निशिखेला हंसतमुखानें भेटणाऱ्या युवतींनीं ज्यांचा इतिहास ज्वलंत ठेवला आहे त्या चितोडच्या राजवधूला हा प्रेमाचा मार्ग चोखाळायचा होता. चिंदीवरच्या पदराखालून डोळ्यांवरच्या पापण्या वर होऊन तेजस्वी. सुंदर नेत्रकमलांचें दर्शन क्वचितच कोणाला व्हावयाचें. जिचें मन तलवारीच्या पात्यासारखें धारदार, कठोर असावयाचें, आधिभौतिक सुखाच्या, संपत्तीच्या मदनुरानें, गजगर्तानें धरणीला वाकवीत जिनें चालवयाचें, त्या मीरेला साधुसंतांच्या मेळाव्यांत मिसळावयाचें होतें. तिचें मन प्रेमामुळें जाईजुईच्या फुलांहूनहि कोमल झालें होतें. भक्तिरसांत डुंबून, जगाला विसरून, पायांत घुंगुरे बांधून ती नाचत होती. स्वतःच्या मनाशीं, स्वजनांशीं आणि समाजाशीं तिनें निर्भय टाग मांडलें होतें,—मांडण्याची तिची तयारी चालली होती, तिचे डोळे वारंवार आसवांनीं भरून येत होते, त्यामुळें कित्येकदां पुढील मार्ग स्पष्ट दिसत नव्हता.

जब जब सुरत लगी वा घरकी,
पल पल नैना पाणी.

"अंतरांत ज्ञानज्योती प्रकटली, तिनें मीरेला तिचें खरें धाम दाखविलें, त्या घराची तिला ओढ लागली, पण तें घर किती दूर होतें ? वाट चुकून घराच्या शोधांत सैरावैरा भटकणाऱ्या बाळासारखी ती बावरली होती, सारे रस्ते बंद झाले होते.

गली तो चारो बंद हुई
मैं पियाकें मिलूं कैसे जाय.
ऊंचा नीचा महल पिया का
म्हांसूं चढ्यो नै जाय.

"चारहि रस्ते बंद झाले. घर, प्रियकराचें घर, उंच आहे—मी हा मार्ग कसा चढूं ?"

पिया दूर पंथ म्हारो झीणो,
सुरत झकोला खाय.

"प्रियकर दूर आहे. रस्ता अरुंद आहे आणि अवघड आहे. दुबळें शरीर वाकून झोकांड्या खात आहे."

ऊँची नीची राह लपिटिली.
पांव नहीं नही ठहराय.
सोच सोच पग धरुं जननूंसे.
बार बार डिग जाय.

"वाटेवर जागोजाग खांचखळगे आहेत. त्यांवर पाऊल ठरत नाहीं. प्रयत्नपूर्वक काळजी घेऊन एकेक पाऊल टाकावें, तरीहि वारंवार ठेंचाळून कोमल पाय रक्तबंबाळ झाले आहेत."

आणि अर्ध्या वाटेवरून मीरेची करुण हाक अंतःकरणाला भेदून जाते.

जुगन जुगन से बिछडी मीरा,
घरमे लीनी जाय-

"युगानुयुगें अनिकेत होऊन रखडणाऱ्या मीरेला, हे प्रभो, आतां आसरा दे."

पट न खोल्या, मुखाँ न बोल्या,
सांझ भई परभात,
अबोलणा जुग बितण लागे
तो काहेकी कुसलात.

"डोळे वर उचलले नाहींत, तोंडांतून अक्षर काढलें नाहीं. अशा कित्येक संध्या पालटल्या आणि प्रभातींचे वारे वाहून गेले. युगानुयुगें हा कोंडमारा चालू आहे."

जणूं भारतीय स्त्रीच्या गालावर ओघळून स्थिर झालेले उपेक्षित अश्रूच मीरेनें अमर करून ठेवले !

अंतरींच्या वेदना जाणणाऱ्या सुहृदांचें सान्निध्य वेदनांना सुसह्य करतें—नव्हे कित्येकदां त्या सौहार्दासाठीं अनंत दुःखांचीहि मागणी करीत असतात !

परंतु ह्याही बाबतींत मीरा वंचिता होती. सौजन्याचा ओलावा नव्हता, सहानुभूतीचा हात नव्हता.

घायलसी घूमत फिरूँ रे
मेरा दरद न जाणे कोय.

"घायाळ झालेल्या पक्ष्यासारखी तडफडत मी भटकतें आहे, माझें दुःख कोणी जाणत नाहीं."

दरद की मारी बन बन डोलूँ,
बैद मिल्या नही कोय.

"माझ्या दुःखानें विव्हल होऊन मी रानेंवनें पायाखालीं घातलीं—पण माझी वेदना जाणणारे मला कोणी भेटलें नाहीं."

तिचें दुःख जाणण्यास तितकेंच दुःख सहन करणारें कोण मिळणार ?

घायल की गति घायल जाणे
की जिन लागी होय,
जौहरी की गति जौहरी जाणे,
की जिन जौहरी होय.

"घायाळाची स्थिति एक घायाळ आणि दुसरा शिकारी जाणे, जवाहिऱ्याची स्थिति एक जवाहिऱ्या जाणे आणि जवाहीर जाणे."

त्याप्रमाणें मीरेची वेदना एक मीरा जाणे आणि वेदनेचें कारण असा एक हरी जाणे.

सूली उपर सेज हमारी,
किस बिध सोना होय,
गगन मंडलपर सेज पियाकी
किस बिध मिलना होय,

"सहानुभूतिशून्य जग शूलाप्रमाणें तापदायक होत आहे आणि प्रियतम तर उंच आकाशांत पहुडला आहे. तो हाताला लागण्याची आशा दिसत नाहीं—विरहानें जीव तडफडत आहे, विधात्याच्या विशाल हृदयावर श्रांत मस्तक विसांवण्यासाठीं आंसावलें आहे—पण घट्ट करूं म्हटलें तरी हट्टी डोळे ऐकत नाहींत.

ए दोउ नैन कहूँ नहीं माने,
नदियाँ बहे जैसी साँवनकी.

"श्रावणाच्या झडीनंतर बेफाम वहाणाऱ्या जलप्रवाहासारखे हे डोळे अविरत वहात आहेत. संयमाचा बांध घडीघडी कोसळून पडत आहे—पंख असते तर—माझें मन उडून तुझ्या चरणापाशीं आलें असतें—एवढ्याशा पंखांनीं अनंत आकाश भरून टाकण्याची अतर्क्य ओढ जिवाला लागली आहे.

कहाँ करूँ बस कछु नही मेरा
पाँख नही उड जावनकी.

वेदनांचा भार असह्य झाला, ग्लानीच्या मारानें भारावलेल्या डोळ्यांच्या पापण्या जड होऊन किंचित् मिटल्या, स्वप्नांत हरीच्या हृदयावर तिनें क्षणभरच विसांवा घेतला ! पण तेवढ्यांत डोळे उघडले, जागृति आली—आणि ती बरोबर दुःखाही परत घेऊन आली ! पश्चात्तापानें मन अधिकच जळूं लागलें—

सुपन मे हरि दरसन दिन्हो
मै न जाण्युं हरि जात,
नैन म्हारा उघड आया
रही मन पछतात.

असह्य मीरेनें हृदय पिळवटून उद्‌गार काढले—

लयी कटारी कंठ चिरूँगी
करूँगी अपघात,
मीरा व्याकुल बिरहिणी रे
बाल ज्यूं बिललात.

"जीव नकोसा झाला. अविचार मनांत थैमान घालूं लागला. शरीराचा नाश करावासें वाटूं लागलें."

काळ स्वतःच्या गतीनें एकेक पाऊल टाकीत होता आणि विरहानें व्याकुळ झालेले (जीव) प्राण आशेनें वाट पहात होते—तीं पावलें मोजण्याचा प्रयत्न करीत होते.

बिरहीणी बैठी रंगमहल मे,
मोतियन की लड पोवे,
एक बिरहीणी हम ऐसी देखी
आँसूअन की माला पोवे.
तारा गिन्गिन नैन बिहाती
सुख की घडी कब आवे.

"कोणी एक एक मोती ओवून दिवस मोजीत होती, तर एक विरहिणी अश्रूंच्या माला गुंफून रात्री व्यतीत करीत होती. आणि आकाशांतले असंख्य तारे मोजीत मीरा आपल्या अथांग दुःखाचा ठाव घेत होती.

शेवटीं दुःखाला अंत जवळ आला.

खोजत फिरूँ भेद वा घरको,
कोई ना करत बखानी,
रैदास संत मिले मोहे सद्गुरु,
दीनी सुख सहदानी.

सहानुभूति आणि घर ह्यांच्यासाठीं सैरावैरा भटकणाऱ्या मीरेला सद्गुरु रैदास भेटले. त्यांनीं शांतीचा जवळचा मार्ग दाखविला आणि तो म्हणजे त्याग. पूर्तीच्या मंदिराची शेवटची पायरी !

प्रेमाची तपश्चर्या पूर्ण झाली. प्रेममयी मीरा विरागी, अचल, निर्भय आणि निःशंक होऊन कृष्णमयी झाली.

"कृष्ण कृष्ण मै करती थी
तो मै ही कृष्ण हो गयी !"

मीरेचें अवतारकार्य संपत आलें, हृदयाचा कुंभ भक्तिप्रेमानें काठोकाठ भरला. प्रभूचा नैवेद्य तयार झाला.

शुभ्र प्राण-पक्षी क्षीण बंधनांतून सुटून अनंत आकाशांत उडाला आणि अनंताशीं एकरूप झाला—त्याला बांधून ठेवणारा पिंजरा तसाच रिकामा होऊन पडून राहिला.

मीरा कृष्णरूप झाली.

शामराम ओक



इतकी कटवलीन् त्यानें
तरीसुद्धां रंगी झ्लेना !
केशवचा तिच्यापुढें आतां

# निकाल

लागणार नाहीं हें ओळखूनच
कीं काय सद्या पाटील
ओरडला--

थोडक्यांत चुकलें, नाहीं तर बारा वर्षं वयाचा केशव काकडे प्रेमांत पडणार होता !

त्या प्रकरणाला सुरुवात अशी झाली कीं, त्यानें मागें एकदां रामशास्त्री बोलपट पाहिला, त्यांत साधारण दुसरी–तिसरींतल्या रामाला परकर–चोळी नेसणारी बायको होती. तसेंच एकदां सीतेच्या स्वयंवराचें चित्र पाहिलें. तेव्हांही लहानसा राम नि त्याची लहानशी सीता, पुन्हा परवां घटोत्कचाचा सिनेमा पाहिला–त्यांतही नवरा–नवरी शाळेंतल्या मुलांच्याएवढीं !

प्रेम म्हणून सिनेमांत जो खेळ दाखवतात तो फक्त मोठ्या माणसांसाठीं असें सगळे सांगतात. पण हे चित्रपट पाहिल्यापासून केशवला शंका वाटूं लागली. त्याच वेळीं इतिहासाच्या पुस्तकांत त्याच्या वाचनांत आलें कीं, पुष्कळ मोठमोठ्या पुरुषांचीं लग्नं त्यांच्या अगदीं लहानपणीं झालीं होतीं; आणि मग कळलें कीं स्वतः त्याच्या आजोबांचें लग्न अकराव्या वर्षी त्याच्या सात वर्षांच्या आजीशीं लागलें होतें. तेव्हां त्याच्या मनांत एक विचार डोकावूं लागला कीं समजा—पण तो बोलून दाखवायची सोय नव्हती.

खरोखर केशवाच्या मनाला जी रुखरुख लागली होती ती त्याच्या सोबत्यांना सांगण्यासारखी नव्हती. ' लहान मुलांनीं प्रेम कां करूं नये ? ' असा सवाल बाकी कोणाला विचारायची छाती नव्हती म्हणून तो आपल्या त्याच विचारांत होता. अशी कांहीं गोष्ट त्यानें काढली असती तर त्याच्या वर्गातल्या पोरांनीं त्याची भंवेरी न उडविली असती.

आतांच मुलें त्याला ' भ्रमिष्ट ' म्हणायला लागलीं होतीं. कारण कित्येकदां तो आपल्याच विचारांत असतांना त्यांच्यांत चाललेल्या बोलण्याकडे त्याचें लक्ष राहायचें नाहीं. ' पोरी ' या विषयाबद्दल तिसरी–चौथींतल्या मुलांना तुच्छतेखेरीज कुठलीच भावना नव्हती. त्यांच्याबरोबरीच्या पोरी म्हणजे त्यांच्या मूर्ख, शिष्ट, बावळट आणि लक्ष देखील न देण्याच्या लायकीच्या

आणि त्याच्याहून लहान मुली तर काय, नुसत्या पया ..., हिरोभांत देखील न घेण्याच्या किंमतीच्या! असें बहुतेक सर्वांचें मत अगदीं ठरलेलें होतें.

मनांत नवीन आलेल्यां प्रेमाच्या, लग्नाच्या, अशा विचारांत राहिल्या मुळें अलीकडे तो मुलांमधून बाजूला पडत होता आणि एकटाच फिरत होता; कधीं दादाला नकळत त्याची सायकल घेऊन चकरा मारीत, तर कधीं तारेच्या खांबाला खडे मारीत. त्याच दिवसांत दादाच्या कॉलेजच्या पुस्तकांतलं प्रेमाच्या कवितेचं एक पान फाडून त्यानं खिशांत ठेवलें होतें; त्या कवितेंत काय होतें तें आतां आठवत नाहीं त्याला, पण कांहीं तरी फारच मस्त होतें.

एक दिवस असाच एकटा विचार करीत घराच्या बाजूला तो हातांतलें एक फळकुट आपटीत बसला होता. शेजारच्या घरांतल्यांची एक मुलगी पलीकडे कांहीं तरी करीत होती, पण नेहमींप्रमाणें तो तिच्याकडे दुर्लक्ष करीत होता. ती राण्यांची रंगी म्हणजे एक पान होतें. श्रीमंताची लाडकी लेक, भडक कपड्यांनीं मढवलेली आणि दागिन्यांनी जखडलेली. मराठी चौथींतली पोरटी पण या इंग्रजी दुसरींतल्या मुलाशीं बोलायचा प्रयत्न करायची! एकदोनदां केशवनें अशी ज्यामली होती तिला!

पण आज त्याची स्वारी जरा बेसावध होती, त्यामुळेंच तिची त्याच्याशीं बोलायची हिंमत झाली.

"ई SSSSSSSS!" म्हणून ती कर्कश किंचाळली, नि "आई गSSS!" म्हणून कांगावा करून त्याच्याकडे पाहूं लागली.

"ए! चूप!" त्यानें तिला दरडावलें.

"हा कांटा बोचला कीं डाळिंबाच्या झाडाचा–" ती विव्हळली.

"थापा देतेस काय? अन् गेलीस कशाला धडपडायला तिथें? चल जा घरीं!" तो असं सांगतो आहे तरी ती त्याच्याकडे येत म्हणाली,—

"ए केश्या, मला तूं कांहींतरी सांगशील का, अगदीं गुपीत?"

"ए रंगटे, केश्या कुणाला म्हणतेस?"

"बरं केशव, सांगशील?"

"हूं! कांहीं सांगत नाहीं ज्जा."

"अगं कायरे?"

"हं! लाडांत येऊं नको अं रंगे, मी खरंच एक सांगतें. ऐक. तूं आपल्या त्या कानफोड्या आवाजांत त्या किंकाळ्या फोडतेस ना,–माऊगीतें कीं काय तें? त्या घरांत बसून फोड समजलीस? मोठी आली गाणारी. ऊंः!"

इतकी कचकलीन् त्यानें तरीसुद्धां ती हलेना, जास्तच लोचटपणा करायला लागली. आणखी जवळ येऊन, चमत्कारिक डोळे करून वेडीवांकडी मान करून हात फिरवीत ती बोलूं लागली, "केशव, तुला ऐकूं जावींत म्हणूनच मी तीं गाणीं म्हणतें—'सख्या लौकरी या'–'राया मला भेटा' नि 'साजणा घेऊनी जा' हीं गीतं मुद्दाम म्हणतें तुझ्यासाठीं–आमच्याकडे प्रेटी आहेत त्याच्या–आमच्या घरीं रेडिओ पण आहे–आम्हीं दर शनिवारीं सिनेमाला जातों–आमच्याकडे रोज कुलफी घेतात–आमचे बाबा आतां मोटर घेणार आहेत–केशव आत्तां मी नरगिससारखी उभी राहून तुला बोलावीत होतें–आणि कामिनी कौशलसारखी तुझ्याकडे पहात होतें—पण तूं मात्र करण दिवाणसारखा माझ्याकडे पाठ फिरवतोस. अशोककुमारसारखा बंदूक घेऊन मला न्यायला ये, मेरे प्रीतम, जिवलगा—"

"चल हट! मुस्कटांत खाशील बरं का आतां रंगे! किती आगाऊपणा करतेस?"

"हें काय गडे केशव, मी तुला आवडत नाही? माझं तर तुझ्यावर प्यार बसणार आहे; चल करूं ये प्रीती शेताच्या बांधावरी–तुम मेरे बालम–प्रेम करूं आपण—"

"प्रेम?" त्याच्या डोक्यांत एकदम दिवा लागला. त्यानें बारकाईनें तिच्याकडे पाहिलें. ती मेंढीसारखे डोळे करून त्याच्याकडे पहात होती. यानं घोगऱ्या आवाजांत पुन्हा विचारलं,—

"प्रेम?...लग्न?"

रंगी त्याच्या अगदीं जवळ येऊं लागली. इतक्यांत बाहेरून सख्या पाटील ओरडला,—

"ए केश्या, साडेतीनला ट्रिप निघते आहे लेका चौथीची अर्नाळ्याला. लौकर तयारी कर–एक रुपया वर्गणी घेऊन धांवत ये शाळेंत."

केशवनें घरांत धूम ठोकली.

शेजारच्या रंगीचें पुढें काय झालें तें पहायला त्याला पुन्हा कधीं वेळच झाला नाहीं.

चकाकी कायम टिकविणारे रोल्डगोल्डचे दागिने मिळण्याचें
जुनें व विश्वासू ठिकाण म्हणजेच



# मॅजेस्टिक
## ज्य वे ल री
## हा उ स

| डिझाइन नं. | किंमत रु. आ. | |
|---|---|---|
| M 101 | [illegible] | जोडी |
| M 102 | ९-१२-० | |
| M 103 | १४-१२-० | ,, |
| M 104 | १३-८-० | |
| M 105 | [illegible]-८-० | |
| M 106 | १६-४-० | |
| M 107 | ३-४-० | जोडी |
| M 108 | ३-०-० | सेट |
| M 109 | ३-०-० | ,, |
| M 110 | ४-८-० | |
| M 111 | ५-१२-० | जोडी |
| M 112 | ६-०-० | ,, |
| M 113 | ३-१२-० | ,, |
| M 114 | ४-[illegible]-० | |
| M 115 | ८-८-० | |
| M 116 | २-०-० | जोडी |
| M 117 | ६-[illegible]-० | |
| M 118 | ६-[illegible]-० | |
| M 119 | ८-८-० | |
| M 120 | [illegible] | |

याशिवाय इतर अनेक प्रकारचे आधुनिक फॅशनचे दागिने मिळतील.

मॅजेस्टिक सिनेमासमोर, गिरगांव, मुंबई नं. ४.


Consult
G.S. MOGHE & SONS
for
QUALITY BLOCKS,
ARTISTIC DESIGNS,
&
SLIDES
JOGESHWARI NAKA, POONA 2

सोपानदेव चौधरी



प्रियदर्शनच्या डोक्यांत
लख्ख उजेड पडला!
कारण योगीराजानें दिलेले

# तीन कटोरे

कटोरे नव्हते ते! घडलेल्या
या चमत्काराचा संकेत
त्याच्या लक्षांत यायला
वेळ लागला नाहीं आणि मग—

विछायतीवर पाय ठेवतांना देखील त्या विछायतीला इजा होईल की काय? इतका तो हळवा होता. फुलझाडांवरील फुल तोडून घेणें त्याच्या जिवावर येई. झाडावरील फुलांचा वास घेऊन त्यांकडे बघत राहण्यांत तो धन्यता मानीत असे. प्रियदर्शन त्याचें नांव.

पशुपक्ष्यांवर त्याचें निरतिशय प्रेम! इतकेंच काय जगांतील चराचरांवर त्याची ममता! या ममतेंतून समता निर्माण करावी, असा त्यानें निर्धार केला होता. आणि तें बरोबरच आहे. ज्याच्या अंगीं ममता बाणलेली असेल त्यानेंच समतेच्या गोष्टी बोलाव्यात, कराव्यात!

मानवानें मानवांत विषमता निर्माण केली एवढेंच नव्हेतर पशुपक्ष्यांवरही ती लादली. याबद्दल त्याला मनापासून वाईट वाटे. गायीचीच तेवढी पूजा करायची आणि गाढवाला तुच्छ लेखायचें; गाय हीच तेवढी पशू आणि गाढव कां पशू नव्हे? राजहंस मोत्याचा चारा खावो वा न खावो, सोन्याचीं अंडीं देवो वा न देवो, त्याला पवित्र समजून कावळ्याला हीन मानायचें? राजहंस तेवढा पक्षी, आणि कावळा हा कां पक्षी नव्हे? चंदन हेंच तेवढें झाड आणि बाभूळ हें कां कोणत्या झाडाचा पाला? कोणत्या थराला ही विषमता गेली! प्रियदर्शनच्या जिवाची लाही लाही होत असे.

तो म्हणे,—मानवाला देवानें बुद्धी दिली ती सद्बुद्धीच दिली असती तर किती बरें झालें असतें? आणि मग "दुर्बुद्धी ते मना कदा नुपजो नारायणा," असें म्हणण्याचा प्रसंग संतयोग्यांवर आला नसता. या दुर्बुद्धीनें काय झालें? मानव हा मानवतेला मुकला. पशूंत पशुत्व आहे, पक्ष्यांत पक्षीपण आहे, श्रुतींत श्राव्यता आहे, गाण्यांत गेयता आहे, पाण्यात द्रवता आहे, परंतु मानवांत मात्र मानवता आहेच असें सांगतां येत नाहीं. युगेंच्या युगें लोटलीं परंतु अजून मानवाला मानवता शिकवावी लागत आहे. 'मानवास परि मानवतेचें वेड सदा वावडें रे' हें कोडें कसें सुटावें? त्याचें डोकें सुन्न होई.

देशांतील जातीयता, आपआपसांतील दुही पाहून त्याला अत्यंत चीड येई. हिंदु-मुसलमानांतील वैमनस्य, भगदीं पिढीजात वैमनस्य, पाहून तर तो फार दुःखी होत असे. या एका विचारानें तो वेडापिसा झाला.





अनुक्रमणिका

होता. एक संस्कृति त्यागावर उभारलेली तर दुसरी भोगावर आधारलेली! मेळ जमावा कसा? संत–महात्म्यांनीं संदेश दिला, "मुसलमान बंधूंचें हृदयपालट करा!" अगोदर हृदयपालट का शुद्धि-पालट? संत–महात्म्यांच्या वचनांवर तो पूर्णपणें विश्वास ठेवणारा होता. तें कांहीं नाहीं. आपल्या मुसलमानबंधूंचा हृदयपालट करायचा हीच एक गोष्ट त्यानें मनावर घेतली. मुसलमानांचा हिंदूंवर अत्याचार होत होता, त्यांच्या आयाबहिणींच्या, लेकीबाळींच्या अब्रूचे धिंडवडे निघत होते, त्या प्रांतांत तो आपलें स्वीकृत कार्य करण्यासाठीं—स्वतःचें बलिदान करण्यासाठीं निघून गेला.

'भय काय तया प्रभु ज्याचा रे'—सर्वांशीं समरस होऊन तो वागत असे. निर्भयतेनें तो वावरत असे. त्याच्या सहजकृतींत त्याची स्वाभाविकता दिसून यायची! त्याचा प्रचार जोरांत सुरू झाला. मूर्तिपूजकानें मूर्तिभंजकाचा हृदयपालट करायचा! खरोखरच भयंकर दिव्य!

रस्त्यानें जातांना एक मौलवी त्याला भेटला. तो म्हणाला, "चीजको खुदा मत कहो, चीज ये खुदा नहीं."

प्रियदर्शननें तावडतोब उत्तर दिले,—"मगर जिस चीजमें खुदा नहीं, वह चीज भी चीज नहीं!"

"देखा जायगा, काफीर कहीं का!" मोठ्या कुत्सितपणें उत्तर देऊन मौलवी निघून गेल्यावर प्रियदर्शनला अतिशय वाईट वाटलें.

रस्त्याच्या बाजूला एक कोंकरूं नाचत बागडत होतें. आनंदाच्या भरांत एका मुलाचा हात धरून त्यानें तें दृश्य त्याला दाखविलें. "पहा किती सुंदर, गोंडस आणि निष्पाप आहे तें कोकरूं!" त्यावर तो मुलगा आपल्या टोपीचा गोंडा उडवीत अन् जिभल्या चाटीत म्हणाला,—"क्या मजा, उसका मटन कितना अच्छा लगेगा." प्रियदर्शननें कपाळावर हात मारला आणि तो पुढें चालूं लागला.

असे किती प्रसंग सांगायचे? एक ग्रंथच तयार होईल! हृदयपालट करण्याचे प्रियदर्शननें आटोकाट प्रयत्न केले. पण त्यांतून काय निर्माण झालें? ज्यांचा हृदयपालट करण्यासाठीं प्रियदर्शन गेला त्यांच्याच हातचा बेदम मार खाऊन तो घरीं परत आला. हृदयपालट बाजूलाच राहिला त्याचाच कायापालट झाला.

दोन महिने तो अंथरुणाला खिळून होता. हिंदु-मुसलमानांचा एकी व्हावी म्हणून ज्यांनीं आपले प्राण पणाला लावले त्या संतमहात्म्यांचीं चरित्रें त्याच्या डोळ्यांसमोर उभीं राहिलीं. आपलें चालू कार्य पुन्हा हातीं घ्यायचा तो विचार करूं लागला. याच विचारांत कित्येक रात्री त्यानें जागून काढल्या. डोळ्याला डोळा लागेना. असाच विचार करतां करतां तो झोंपी गेला आणि स्वप्नसमाधींत तो विहार करूं लागला.

—दूर अरण्यांत प्रियदर्शन एकटाच हिंडत होता. मानवेतर सृष्टीचें वैभव पहात पहात आपण किती किती दऱ्याखोऱ्यांतून आलों तें त्याला कळलें नाहीं. देवधर्मांचा विधिनिषेध नसलेली ती मानवेतर सृष्टी पाहून प्रियदर्शन आपलें 'ध्येय–गीत' गाणार तोंच त्याला दुसरें गीत ऐकूं आलें.—

'ब्रह्मांड प्रभूचें भुवन, पढतां रे कलमा, वेदां
मशीद, मंदिरें इत्यादि, घातल्या देवासी मर्यादा
अहो धर्मसंस्थापकांनो! काय भास तें झालें तरी!'

भारदस्त आवाजांतील तें गीत ऐकून प्रियदर्शन चपापला. आवाजाचा माग काढीत काढीत तो एका झोंपडीजवळ आला. एक योगी तेथें ध्यानस्थ बसला होता. त्या योगीराजाला पाहून हिमालयाची मूर्तिमंत भव्यता, दिव्यता त्याच्यासमोर उभी राहिली. आणि खरोखर तसेंच होतें तें दृश्य! योगीराजाच्या शुभ्र जटा, शुभ्र दाढीमिशा, शुभ्र भुवया—त्यांचा चेहरा जणूं काय हिमालयाचें प्रतीकच! त्यांचे नेत्र म्हणजे मानस सरोवर! योगीराजाच्या नेत्रांतून अश्रूंच्या धारा चालल्या होत्या. जणूं काय हिमालयांतून उगम पावलेल्या गंगा–यमुनाच! प्रियदर्शन मुग्ध होऊन तिथेंच बसला. बराच वेळ लोटल्यानंतर योगीराजांची नजर प्रियदर्शनकडे गेली.

"काय पाहिजे वेडा तुला ? " भुंवया उंचावून प्रेमानें प्रश्न केला.

"आपलें दर्शन घेऊन मी धन्य झालों. इतर दुसरें कांहीं नको मला ! " हात जोडीत प्रियदर्शन बोलला.

"कांहीं नको कसें ? तुला कांहींतरी पाहिजे खास ! मी जाणतां. तुझें मनोगत ! राम–रहीमचें द्वंद्व तुझ्या अंतःकरणांत चालू आहे ना ? मग नाहीं कसें ? " योगीराज हंसून बोलले.

"योगीराज, आपण सब कांहीं जाणतां. माझ्या मनाचें समाधान करा. " प्रियदर्शननें विनंति केली.

योगीराज आपल्या झोंपडींत गेले. कांपऱ्यांतील एका रांजणांत त्यांनीं हात घातला व तो पुन्हां बाहेर काढून कांहींसा विचार करीत ते उभे राहिले. त्यांनीं प्रियदर्शनकडे एकवार पाहिलें आणि पुन्हा रांजणांत हात घालून दोन कटोरे बाहेर काढले. ते कटोरे घेऊन योगीराज प्रियदर्शनजवळ आले.

"हं. हे घे, तुझ्या मनांतलें कोडें हे दोन कटोरे खात्रीनें उकलूं शकतील ! " आशीर्वाद देत योगीराज बोलले.

"हे दोन ओबडधोबड कटोरे घेऊन काय करायचें ?" हा प्रश्न विचारण्याचें प्रियदर्शनला धैर्य झालें नाहीं. मुकाट्यानें आपल्याजवळ त्यानें ते घेतले.

"तूं आस्तिक आहेस. या कटोऱ्यांची मनोभावें पूजा कर."

योगीराजांची आज्ञा घेऊन प्रियदर्शन आपल्या घरीं आला. बाहेरच्या बैठकींतील टेबलावर त्यानें ते कटोरे अगदीं जवळ जवळ ठेवले. दोन्ही कटोऱ्यांत तुळशीपत्रे व गुलाल उधळून त्यांची मनोभावें पूजा केली. आठदहा दिवस हा त्याचा नित्यक्रम चालला होता. एकदां सहज त्याच्या मनांत आलें, योगीराजाचा कृपाप्रसाद म्हणून मला हे कटोरे त्यांनीं दिले. ते मी बाहेरच्या टेबलावर म्हणून कां ठेवायचे ? त्यानें ते दोन्ही कटोरे उचलले व आपल्या देवघरांतील देव्हाऱ्यांत मुख्य जागीं ठेवले. नित्याप्रमाणें त्यांची तो पूजा करूं लागला. दोन्हीं कटोऱ्यांत तुळशी–पत्र टाकलें, गुलाल उधळला. पूजा संपल्यावर पाहतो तों काय चमत्कार ! एका कटोऱ्यांत तुळशीपत्र, गुलाल ! अन् दुसऱ्या कटोऱ्यांत सबजा अन् अबीर ! दुसऱ्या, तिसऱ्या दिवशीं तेंच ! हा चमत्कार कीं भुताटकी ? त्याला कांहींच उकल पडेना. आठवडा लोटला तरी तेंच ! 'बाहेर बैठकींत या कटोऱ्यांची पूजा केली तेव्हां असें कांहींच घडलें नाहीं. मग या देव्हाऱ्यांतच असें कां व्हावें ?' पूजा करतांना हाच एक प्रश्न त्याचेसमोर येई. पूजेंत त्याचें लक्ष लागेना. त्याचें डोकें सुन्न झालें. त्यानें ते दोन्ही कटोरे घेतले, देव्हाऱ्याशीं पूजा करायला बसला. एका शुभ्र वस्त्रामधें त्यानें एक कटोरा बांधला व दुसऱ्या शुभ्र वस्त्रांत दुसरा कटोरा बांधला, पूजा करण्याऐवजीं अशा प्रकारें पूजा बांधली आणि ते दोन्ही कटोरे देव्हाऱ्याजवळील एका अडगळीच्या कपाटांत ठेवून दिले व कुलूप बंद केलें.

असले 'हे भुताटकीचे कटोरे आपल्याकडे नकोत !' त्या योगीराजाकडे जाऊन त्याचे त्याला ते परत करावे असा तो विचार करीत होता. तितक्यांत बाहेर चाहूल आली. प्रियदर्शन तसाच धांवत बाहेर ओटीवर आला. अरण्यांत भेटलेले ते योगीराज अकस्मात् प्रियदर्शनाच्या घरीं आले. आणि आपले कटोरे मागूं लागले. प्रियदर्शनें मनांतल्या मनांत नमस्कार केला. योगीराजांना त्यानें चांगल्या आसनावर बसविलें व आपण कटोरे आणण्यासाठीं आंत देवघरांत आला. त्यानें कपाट उघडलें दोन्ही कटोरे प्रियदर्शननें बाहेर काढले. आश्चर्याचा धक्का बसला ! कारण त्यानें स्वतः आपल्या हातानें ते कटोरे शुभ्र वस्त्रांत बांधून ठेवले होते. परंतु आतां पाहतो तों एक कटोरा भगव्या वस्त्रांत बांधलेला व दुसरा हिरव्या वस्त्रांत बांधलेला होता ! प्रियदर्शननें ते कटोरे सोडले आणि योगीराजांच्या हातांत दिले.

"काय वेडा, मिळालें तुला तुझें उत्तर ?" योगीराजानें भुंवया उंचावून प्रश्न केला.

उत्तर काय मिळणार ? घडलेला सर्व प्रकार आणि चमत्कार प्रियदर्शननें योगीराजाला निवेदन केलें.

"बरोबर, अगदीं बरोबर ! तुझें उत्तर तुला मिळालें. " योगीराज हंसून बोलले.

"हे निर्जीव कटोरे मला काय उत्तर देणार ? ते माझ्याशीं एकही अक्षर बोलले नाहींत." प्रियदर्शन निराशेनें बोलला.

"घडलेल्या चमत्काराचा संकेत लक्षांत घे. हे पहा दोन्ही कटोरे ! यावरचें लुकण खरडून पहा. हे कटोरे नव्हेत, डोक्याच्या कवट्या आहेत कवट्या ! एक कटोरा हिंदूच्या कवटीचा अन् दुसरा मुसलमानाच्या कवटीचा बनविलेला आहे. बघ जरा डोळे उघडून !"

प्रियदर्शनच्या डोळ्यांत लख्ख उजेड पडला व त्यानंतर तो झोंपेतून जागा झाला.

...OM & BAY LTD. POONA

## मला क्षमा कर !

[४६ वरून]

—बाहेर कोंबड्याची परवल हवेंत उठली.

—दिवस चांगला कासराभर वर आला असेल.

मुक्ता पाणी उपसून अंग धुण्याला बसणार तोंच काकी तिला हांका मारीत मागच्या बाजूला आल्या.

"सगळे मेले मोजोरी झालेत. ऐकलंस का मुली ?"

"काय झालं ?"

"अग तो मेला मारुती चाक्या ग ! मेला एक साल कधीं सरळ वागला असेल तर विचार मला ! काशीनाथ काल गेला नं त्याच्या खळ्या-वर [illegible] म्हणतो कसा, 'मी तुम्हांला ओळखत नाहीं. काकी आल्या तरच अर्धोळी घालीन.' भिवा लहानू निरोप घेऊन आलाय. आतां कसं करायचं ? गेलं तर पाहिजे मला. पण तुला एकटीला सोडून कशी जाऊं ?" काकी काळजीच्या सुरांत म्हणाल्या.

मुक्ताला त्यांच्या बोलण्याची मोठी गमत वाटली. कोणाची ना कोणाची तरी काळजी वहाण्यांतच या अश्राप जीवाची सारी हयात उडून गेली. यांना स्वतःची काळजी वहायला कुणी शिकवलंच नाहीं का ?

"पण आतां [illegible]च्या तुम्ही कशा जाणार ?" मुक्ता म्हणाली.

"जाईन ग. भिवा तट्ट्याची गाडी घेऊन बाहेर उभा आहे. पण संध्या-काळच्या आंत कसं मला परत येतां येईल ? जाऊनयेऊन सहा कोस. त्यांतून तुलाहि बरोबर न्यायचं म्हटलं तर काशीनाथाला आवडायचं नाहीं. अन् जनावरांचं कोण पाहील ?"

मुक्ता झटक्यानं कसला तरी विचार करून म्हणाली, "मी इथंच राहातें. तुम्ही निवांत जा. रात्रीचं परत यायचं मनांतसुद्धां आणं नका."

"पण तूं इथं एकटी—"

"कांहीं रानांत पडलें नाहीं. वाघ का त्यायला येणार आहे मला इथं ?"

—अखेरीस एकदांच्या काकी गेल्या. मुक्ता घरांत एकटी राहिली.

दुपारीं मुक्तानं चार घांस तोंड्या कष्टानं गिळले. [illegible] आज तशीच कोपऱ्यांत ढकलून दिलीं आणि घाईघाईनं ती नाचघरांत [illegible] सतरा ठिकाणीं फाटलेलं गल्हाळ जाजम जमिनीवर पसरून त्यावर ती लवंडली. मेघासारखा एकांत मिळालेला होता. त्याचा भरपूर उपयोग करून तिला निश्चित निर्णय घ्यायचा होता.

अशी संधि पुन्हा मिळणं शक्य नव्हतं. उद्यां सकाळपर्यंत तिचें पलायन कुणाच्याहि लक्षांत आलं नसतं. सकाळीं काकी आल्यावर चौकशी सुरु होईल.—तोंपर्यंत आपण मुंबईला सदानंदाच्या बाहुपाशांत [illegible] असणार ! एकदां त्या हाताच्या विळख्यांत आपण लपून बसलों म्हणजे जगांतली कोणतीहि शक्ति आपल्याला हुसकून काढूं शकणार नाहीं—

विचारासरशीं मुक्ता चमकून उठली. सदानंदानं पत्ता दिला होता तें कार्ड कुठं आहे ? लगबगीनं ती पुढच्या बाजूस गेली—काल रात्रीं सदानंदाला तात्पुरत्या दिलेल्या खोलीचं कुलूप काढून तिनं [illegible] मुद्दाम आंत डोकावून पाहिलं.—

भिंतीच्या आधारानं काल ती उभी होती, सदानंदानं तिला घट्ट आवळून तिच्या ओठांवर ओठ टेकवले. त्या गडबडींत तिच्या हातून

गळून पेडलेलं कार्ड तिथंच खालीं पडलेलं तिला दिसलं. आणखी एक वस्तू तिथं त्या कार्डाशेजारीं पडलेली आतां प्रथमच दिसली.

कोरं पाकीट होतं तें ! मुक्तानं आश्चर्यानं तें उघडून पाहिलं. निश्चित, सदानंदाचंच असलं पाहिजे. आंत दहा-दहाच्या वीस नोटा तिला आढळून आल्या !

सहेतुकपणानं-? का चुकून गडबडींत-?

—आणि याच क्षणीं मुक्ताचा निर्णय ठरला !

—पुण्याला जाणारी सेवटची मोटार संध्याकाळीं सात वाजतां निघणारी होता.

पहांटे, दिवस उजाडण्याच्या आंतच, मुक्ता बोरीबंदरच्या स्टेशनावर उतरली. तिला प्रथम खरंच वाटेना.

केव्हांतरी कोंबड्याची साद कानावर येईल आणि आपण त्या परिचित आपल्याशीं जाग्या होऊं याच संभ्रमांत ती गाडींत झोंपली होती. आपण गाडींत आहोंत ही कल्पनाच मुळीं तिला खुळेपणाची वाटली. शक्य नाहीं. हें स्वप्नच आहे.

पण बोरीबंदरच्या धक्क्यावर ती उतरली तेव्हां तिची खात्री झाली.

खरंच ती घर सोडून आली होती.

समोरच्या घड्याळांत तिनं पाहिलं. पांच वाजून दहा मिनिटं झालीं होतीं. तशी मुंबईत ती परकी नव्हती. पण अशा अवेळीं एकटंदुकटं हिंडण्याची तिला भीति वाटूं लागली. गिरगांवांत तिची एक दूरची आत्या राहात होती तिच्याकडे जाणं निराळं आणि—दिव्याच्या उजेडांत तिनं पर्समधील सदानंदाच्या नावाचं कार्ड बाहेर काढलं. त्यावरील पत्ता फोर्ट विभागांतील एका हॉटेलचा होता. हॉटेलचं नांव आणि रस्ता तिनं दोनतीन वेळां स्वतःशींच घोकला.

—आणि आत्मविश्वासानं ती स्टेशनच्या बाहेर पडली. समोर उभ्या असलेल्या एका टॅक्सींत अर्धवट पेंगलेल्या ड्रायव्हरला तिनं हांक मारून जागं केलं—आणि पाठ केलेला पत्ता एखाद्या मंत्राप्रमाणं न चाचरतां तोंडानं पुटपुटत ती गाडींत चढली.

प्रवासाच्या शिणानं आणि अर्धवट झालेल्या झोंपेनं थकून गेल्यामुळं तिनं मागच्या गादीवर डोकं टेकलं. खिडकीवाटे येणाऱ्या गार वाऱ्याच्या झोतांनीं तिला जरा हुशारी वाटली. चुरचुरणाऱ्या डोळ्यांवर हाताचे कढत तळवे हलकेच दाबून ती उल्हसित मनानं स्वतःशींच पुटपुटली, "सुटलें, आणखी थोड्या वेळानं—"

गाडी एका भव्य इमारतीसमोर उभी राहिली. ब्रेकच्या कर्कश आवाजानं भानावर येऊन मुक्तानं बाहेर डोकावून पाहिलं. तिसऱ्या माळ्यावर हॉटेलच्या नांवाची भव्य पाटी होती. आपलं इच्छित स्थळ हेंच ! ड्रायव्हरनं दार उघडून दिलं त्यासरशीं ती झटपट खालीं उतरली आणि लगबगीनं जिन्याच्या रोखानं चालूं लागली. एकदोन पावलं टाकल्यावर ड्रायव्हरची आठवण होऊन ती थबकली. ड्रायव्हरच्या हातावर पांच रुपयाची नोट ठेवून त्यानें लवून केलेल्या सलामाची पुसटशी दखलही न घेतां ती पुढें सटकली.

मनाला ती वरचेवर मधूनमधून बजावीत होती— बावळटपणा, भोंगळपणा, खेडवळपणा नखभर देखील दिसतां कामा नाहीं. बाई मुंबईची नाहीं, असा संशय देखील कुणाला येतां नाहीं. अवसान तर खूप आणलं होतं मुक्तानं !

परीटघडीचा पांढरा पोशाख आणि गळ्यांत तांबडा पट्टा अडकविलेला एक मनुष्य ट्रेमध्यें चहाचं साहित्य घेऊन जातांना तिला दिसला. त्याला खुणावून तिनं हातांतलं सदानंदाच्या नांवाचं कार्ड दाखवलं.

मुंबईचं हें वैशिष्ट्य आहे. इथं नसत्या चौकशा करण्याचा शिरस्ता नाहीं. कोण, कुणाकडे, कशाला ह्या शंका आल्या तरी मनांत ठेवायच्या बोलून दाखवायच्या नाहींत.

त्यामुळं मुक्ताला एक अक्षर बोलावं लागलं नाहीं खुलासा करावा लागला नाहीं. कांहीं नाहीं. आणि एक मिनिटाच्या अवधींत मुक्ता सदानंदाच्या खोलीवरील घंटेवर बोट ठेवून उभी राहिली !

सगळा जीव कानांत आणून ती आंतल्या हालचालीचा अंदाज घेऊं लागली !

ऐसा दुष्ट दंकेसरशीं तिचं अंग शहारल्यासारखं झालं. वेडी कल्पना ! सदानंदानं आपली ही निद्य चेष्टा तर केली नसेल ?

दुसऱ्या घंटेचे निनाद हवेवर विरून जाण्याच्या आंतच 'Yes' म्हणून आंतून आवाज आला. तो चिरपरिचित आवाज म्हणजे मुक्तेच्या भुकेल्या कानांना नाद-ब्रह्माचा साक्षात्कार होता. दार उघडलं जाण्यास आतां कितीसा उशीर? पण तेवढाहि वेळ तिला युगाप्रमाणं दीर्घ वाटूं लागला.

बोल्ट सरकल्याचा आवाज—खट्ट! आणि दाराची फळी सरकली—आंतल्या बाजूस डोळे भरून सदानंद उभा होता.

कोण, कशाला, काय हें समजून येण्याच्या आंत मुक्ता आवेगानं सदानंदाच्या अंगावर कोसळली ! सदानंदानं तिला दोन्ही हातांनीं घट्ट धरली नसती तर मुक्ता सपशेल तोंडावर पडली असती. सकाळच्या रामप्रहरीं आपल्यावर असा नाजुक हल्ला करणारी व्यक्ति दुसरीतिसरी कोणी नसून मुक्ताच आहे हें समजताच सदानंद एकाएकी गंभीर झाला आणि सहज बोलून गेला, "मला वाटलं होतं तूं यायची नाहींस—"

छातींत सुरी खुपसल्याच्या वेदनेनं मुक्तानं घाबरून त्याच्या तोंडाकडे पाहिलं ! हें स्वागत तिनं अपेक्षिलं नव्हतं !

सदानंदाच्या आवाजांतील तो किंचित् परकेपणाचा वास तिला भयंकर वाटला. तिनं सदानंदापासून स्वतःला सोडवून घेतलं आणि ती म्हणाली, "मी यायची नाहीं असं कां म्हणालांत ? म्हणजे मी येऊं नये अशी तुमची इच्छा होती—"

आपल्या खांद्यावर तिचे हात ओढून घेत सदानंद म्हणाला, "वेडी कुठली !"

आणि यानंतर मात्र मुक्ताचं मानसचित्र उठावदार रंगानं रंगूं लागलं. शंकाकुशंका हवेंत विरून गेल्या. बोलायला तिला मोकळीक राहिली नाहीं. विचाराला अवसर राहिला नाहीं. सदानंदानं तिला सर्वस्वी आपली म्हटली !

हाच सदानंद तिला प्यार होता. ह्याच त्याच्या अधीऱ्या वृत्तीवर ती बेहाय खूष होती. ह्याच उतावीळपणाचा अमर्याद आनंद तिचं हृदय चुमळून काढणार होता. त्याच्या गोड हास्यलकेरींची मादक नशा तिला कितीही चाखली तरी सदा अपुरीच वाटायची. तापलेली धरा जशी मृगाच्या पावसाचे टपोरे मोती अधाशीपणानं पिऊन टाकते, त्याप्रमाणं सदानंदानं कितीहि चुंबनं घेतलीं, तरी तिची तृप्ति होईना.

थोड्या वेळानं सदानंदानं तिला सोफ्यावर खेळकरपणानं ढकलून म्हटलं,—

"किती दिवस उपाशी आहेस—?"

"वाटतं का कांहीं बोलायला? म्हणे, मला वाटलं तूं यायची नाहींस. पुन्हा म्हणाल का असं ?"

"चुकलं आपलं बुवा! वेड्यासारखं कांहीं तरी बोलून गेलों—"

"अन् मी आपली वेडी, वेड्या आशेनं धांवत आले !"

•

—त्या दुपारी... एक सिगारेट शिलगावीत सदानंद कोचावर बसला. एक क्षणभरहि तो दूर न जावा या वेड्या कल्पनेनं भारलेली मुक्ता त्याच्या शेजारीं त्याला रेलून बसली.

"बोल आतां! पुढें काय?" धुराकडे पहात सदानंद म्हणाला.

"म्हणजे काय? मी नाहीं समजले!"

तिला हातानं लपेटून घेत तो म्हणाला, "नाहीं म्हटलं ओजचा कार्यक्रम काय? गाडी बोलवून घेतल्यावर जायचं कुठें कुठें—?"

"आधी एखाद्या कापड दुकानांत जायला हवं. अंग धुतल्यावर नेसायला मला दुसरं पातळ देखील नाहीं."

"छान!" तो खट्याळपणानं हंसून म्हणाला! त्याच्या त्या एकुलत्या एक शब्दाचा अर्थ पुरता ध्यानांत आल्यावर मुक्ता लाजून खालीं पाहूं लागली. तिच्या गालावर पसरलेल्या आरक्त वर्णानं मोहित होऊन सदानंद म्हणाला,—

"मुक्ता, अलिकडे आरशांत स्वतःचा चेहरा कधीं पाहिला आहेस का—?"

ठिकऱ्या करून टाकलेल्या त्या दिव्य आरशाची आठवण होऊन ती म्हणाली,—

"आरशांत बायकांनीं चेहरा पाहण्याचा त्या घरांत शिरस्ता नाहीं—"

एकवार मोठ्यानं हंसून सदानंद म्हणाला, "तुझ्या आईनं इतकी घाई करायला नको होती. जरा तिनं वाट पाहिली असती तर—"




"पण दहा वर्षांनं कां होईना, तुमच्या मनासारखं झालं नं?"

मुक्ता त्याला अधिकच बिलगून बसली. त्याचं गोड भाषण ऐकण्यासाठीं तिनं आपला श्वास देखील आंवरून धरला. सदानंद बोलत होता,—

"बायका वडाची पूजा करतात नं? तशी पुरुषांना जर एखादी 'प्रिय वस्तु' मागून घेण्याची सवलत असती तर जन्मोजन्मीं तुझा सहवास मिळावा ही प्रार्थना मी जगाला ऐकूं जाईल एवढ्या मोठ्या आवाजानं केली असती. अग, हें काय—? मांजरीसारखी पोटांत काय शिरतेस माझ्या? अन् वर दात काढून हंसतेस काय?"

"हंसूं ओलं मला म्हणून हंसलें. खरं सांगूं? मला कीं नाहीं आठवण झाली. तुम्ही कॉलेजांत होता, आठवतंय? आईला थाप मारून मी तुमच्याबरोबर सिनेमाला कधीं कधीं यायची. एकदां, तुमचा रुमाल मला तोंड पुसायला हवा होता म्हणूनच अंधारांत मी हलकेच तुमच्या खिशांत हात घातला! अन् तुम्हांला वाटलं, कुणी तरी खिशांतल्या पाकिटाला हात घातला. अन् मग तुम्ही ओरडून माझा हात घट्ट धरलात! अन् मग आजूबाजूचे लोक 'काय झालं?' म्हणून विचारूं लागले—"

"अन् तूं लबाडे, मला एकट्याला तिथं सोडून बाहेर पळालीस!"

बोलतां बोलतां सदानंदनं सिगारेटचं थोटूक ॲशट्रेमधें टाकून दिलं, आणि...

●

—दुपारीं बारा वाजण्याच्या सुमारास तीं बाजार करून परत हॉटेलांत आलीं. मध्यंतरीं त्यांच्या गैरहजेरींत फोन आल्याचं सदानंदला समजलं.

सदानंद फोनवर बोलून थोड्याच वेळांत आपल्या खोलींत शिरला तेव्हां मुक्ता पांचसहा पातळांच्या घड्या हातावर घेऊन कोणती नेसावी या विचारांत चूर झालेली त्यानं पाहिली. तिच्या गोंधळलेल्या मुद्रेकडे कौतुकानं पाहून तो म्हणाला, "सगळ्या एकदम गुंडाळून घे. म्हणजे रोज बदलण्याची पंचाईत पडायची नाहीं. बाईसाहेब, कोणती तरी एक उचला आणि आधीं बाथरूमनचें पळा पाहूं."

"नाहीं जाणार. तुमची कां उगीच घाई माझ्यामागें?"

"जेवायचं नाहीं आपल्याला? घड्याळ घेतलंस त्यांत पहा कीं जरा."

"बारा वाजून पांच मिनिटं! अन् अजून मला भूक लागली नाहीं—"

"हें बघ. मला आतां जेवण करून गेलंच पाहिजे. ऐकून घे. हेडक्वॉर्टर्सहून तांतडीचं बोलावणं आलं आहे."

"आत्तां तुम्हीं जाणार?" मुक्ता हातांतल्या पातळांच्या घड्या खालीं टाकून खिन्न मुद्रेनं म्हणाली.

"हो. लवकर परत येण्याकरितां. वेडाबाई अग रडायला काय झालं? [illegible] पुरुषानं बाहेर जरा देखील जाऊं नाहीं म्हटलं म्हणजे आटपलाच कारभार! चल, आटप. अंगनपंगत करून जेवायची घाई पाहिजे नं तुला?"

"मग तुम्ही परत केव्हां येणार?" मुक्ता उदासपणानं म्हणाली.

"बहुतेक तासाभरानं. काम आटोपण्यावर अवलंबून आहे. झालं कीं आलोंच. दासानुदास सेवेसाठीं धांवत येईल. संध्याकाळीं जुहूला जाऊं. नंतर एखादा 'शो' टाकूं 'शो'च्या वेळीं कुठली साडी?"

"तुम्हाला आवडेल ती." मुक्ता पुन्हा गोडींत येऊन म्हणाली.

"नाहीं. तुला आवडेल ती." लहान पोरागत गाल फुगवून सदानंद म्हणाला.

"तुम्हीं कोणता सूट चढवायचा म्हणून मी हट्ट धरतें आहें वाटतं?"

"अग, पण तुझ्या वस्त्रांच्या बाबतींत माझी आवड मीं सांगितली तर तूं मला मारायला धांवलीस मघाशीं दुकानांत—"

"तुमच्या जिभेला हाड नाहा—" म्हणून म्हणत मुक्ता हाताला आली ती साडी उचलून बाथरूमकडे पळाली.

●

—मध्यरात्रीच्या सुमारास दोघं उत्सुकतेनं परत आलीं. ठरल्याप्रमाणं त्यांचा हिंडण्याचा कार्यक्रम पार पडला. सिनेमाचा 'शो' हि झाला. दुपारीं उशीर करून आल्याबद्दल त्याच्यावर रागावण्याचा मुक्ताचा पहिला बेत त्याला पहातांक्षणींच विरघळून गेला होता. सदानंदानं आपल्या उशीरां परतण्याचं कारण तिला सांगितलं नाहीं. आणि तिनेंहि तें समजून घेण्याची जरूरी भासली नाहीं.





अनुक्रमणिका

मोलीचं दार लोटून घेतल्याबरोबर सदानंदानं तिला जवळ ओढली आणि चुंबनांच्या माऱ्यानं अगदी कासावीस करून सोडली.

मुक्तानं त्याला यत्किंचित् प्रतिकार केला नाहीं. त्याला चेष्टेनं प्रतिकार करायला देखील तिच्या अंगांत अवसान राहिलं नाहीं. ज्या सौख्यासाठीं ती हपापलेली होती तें सौख्य स्वतः तिच्यापुढं उभं राहून तिला खुणावीत होतं. तें मिळावं म्हणून तिनं केवढं भयंकर दिव्य केलं होतं ! दोन मुलांची आई, लग्न होऊन दहा वर्षं लोटलेलीं, एका दिवसांत त्या सगळ्याला लाथ मारून एकटीदुकटी रातवेगत प्रवास करून येते ही काय साधीसुधी गोष्ट आहे ?

[illegible] केवढी वादळ उठेल याची तिला कांहीं कल्पना नव्हती ? आई, काकी — असल्या भोळ्या देवतांना काय वाटेल हें काय तिला माहीत नव्हतं ? धर्मनीति, कायदा यांची भीति तिनं झुगारून दिली. सामान्य बायका कितीहि धाडसी असल्या तरी [illegible] धाडस त्यांच्या हातून इतक्या सहजीं घडेल ?

पण मुक्तानं डोळे झांकून घेतले. जाणून बुजून तिनं ही उडी घेतली. आपल्या भवितव्याची तिनं फिकिर केली नाहीं. उद्यां काय होईल याचा विचारहि तिनं मनाला शिवूं दिला नाहीं.

कारण तिला सदानंदाचा सहवास पाहिजे होता. अत्यंत निष्ठुरपणानं तो तिच्या ओटांजवळून हिसकावून घेतला गेला होता. आपल्या प्राणाची ओंजळ ज्याच्या चरणीं तिनं मनोभावानं वाहिली होती तो तिचा देव तिच्यापासून दुरावला होता. त्याच्या दर्शनाची तिला तळमळ लागली होती. त्याच्या सहवासासाठीं तिचं मन तडफडत होतं. त्याच्याशीं एकरूप होऊन जाण्यासाठीं तिच्या देहाचा कणन्कण आसुसला होता !

तिच्या मनाची आंतरिक तळमळ प्रचंड होती म्हणूनच ती हें असामान्य धैर्य दाखवूं शकली. बेफिकीर, बेदरकार मनानं ती प्रियकरासमोर उभी राहिली ! मधेंच तिनं डोळे उघडून पाहिलं.

तिच्या कानाशीं तोंड लावून अत्यंत आपुलकीनं सदानंद तिला म्हणत होता, " झोंप आली ? "

" ऊं हूं. "

" मग काय अशीच रात्र जागून काढायची ? "

" हं— "

" वेडी आहेस ! "

" तुम्ही देखील— "

" चल ! पडल्यापडल्या गप्पा मारतां येतात. "

त्याच्या डोळ्यांतील आतुरता, याचना जाणून तिनं आवेगानं त्याच्या छातीवर आपलं मस्तक घुसळलं.

—आणि त्या मोच आनंदाच्या क्षणाला स्वतःचीच दृष्ट लागूं नये म्हणून तिनं आपले डोळे मिटून घेतले.

—सकाळीं सदानंदानं मुक्ताला हलवून जागी केली. मुक्तानं ' ऊंऽ ' असा नाजूक आवाज काढून तोंडावर पांघरूण ओढलं.

" ए आळशी, उठ ! "

" मी नाहीं जा ! "

" अग, पण घड्याळाकडे पाहिलंस का ? "

" ऊं हूं—ऽऽ "

" आठ वाजून गेले— "

" बरं— "

" बरं काय ? मुक्ता, जागी झालीस का ? मला बाहेर जायचं आहे— "

आतां मात्र मुक्तानं तोंडावरचं पांघरूण झुगारून दिलं. आश्चर्यानं ती त्याच्याकडे पाहून म्हणाली, " हें काय ? तुम्ही बाहेर निघालात—? "

" हं ! अधिकाऱ्यांचं बोलावणं आलं आहे ! जाऊन यायला पाहिजे. "

मुक्ता उठून बसली. ती तक्रारीच्या सुरांत म्हणाली, " मी नाहीं सोडणार— "

" भले ! अग नोकरीचं बंधन कडक असतं— "

" प्रेमाचं त्यापेक्षां जास्त कडक असतं. "

" अशी बायकांची समजूत असते. "

मुक्ता त्याच्या खांद्याला स्पर्श करून म्हणाली, " समजलें ! जा तुम्ही. "

मुक्ताच्या रागावण्याची त्याला गंमत वाटली. बाथरूमच्या दिशेनं तरातरा निघालेल्या त्या मानिनीला दोन्ही हात पुढें पसरून आडवीत तो म्हणाला, " रागावलीस ?

" छेः ! छेः ! रागवायला मी कोण तुमची ? " तिच्या दोन्ही खांद्यांवर हात ठेवून तिला जवळ ओढीत तो म्हणाला, " मुक्ता, तुझ्या गळ्याची शपथ. तुझं स्नान उरकायच्या आंत आलों नाहीं तर मला बोल ! "

फार ताणण्यांत शहाणपणा नसतो. त्याच्या टायशीं लाडिकपणानं खेळत ती म्हणाली, " बरं तर—एकदां सोडतें—पुन्हा मी ऐकायची नाहीं. "

" कबूल ! "

—बोलल्याप्रमाणें सदानंद लवकर परत आला. बेल वाजल्यावर ती दार उघडायला गेली. तिच्याकडे पाहिल्या न पाहिल्यासारखं करून तो आंत आला. कोठ्यानं त्यानं कपडे काढले, आणि टेबलावर ठेवलेल्या डब्यांतली एक सिगरेट काढून तो शिलगावूं लागला. एकदोन झुरके मारल्यावर त्याला आठवण झाली असावी. गाल फुगवून समोरच्या खुर्चीवर बसलेल्या मुक्तेकडे तो पाहूं लागला. त्याच्या डोळ्यांत डोळे भिडवून मुक्ता म्हणाली, "मीं आज निश्चय केला आहे. तुमच्यावर रागवायचं नाहीं म्हणून!"

"होय?" सदानंद हंसून म्हणाला!

"खरंच, खोटं नाहीं. आत्तांच पहा नं! अस्सा खंडीभर राग आला होता तुमचा! इतकी रुसून बसलें होतें! म्हटलं, पाहिलीत मला कीं खांद्यावर घेऊन नाचत सुटाल. पण कौतुकाचा एक शब्द तरी—'

"साऱ्या जणी प्रथम असंच म्हणतात!"

मुक्तानं चमकून त्याच्या तोंडाकडे पाहिलं. मत्सराच्या करवतीचा दांता तिच्या हृदयावर टेकल्याचा तिला भास झाला. त्या दिवशीं सिंहगडाला बरोबर नेलेल्या त्या नटीची तिला एकदम आठवण झाली. महाराष्ट्रांत सिंहगडासारखे अनेक सोयिस्कर किल्ले आहेत. आणि बरोबर यायला बायकांचीहि पण वाण नाहीं. विचारावं का?

पण मुक्तानं स्वतःला आंवरून धरलं. यापूर्वीच्या त्याच्या खाजगी जीवनांत डोकावणं तिला न्याय्य वाटलं नाहीं. सदानंद तिच्याकडे बारीक नजरेनं न्याहाळून पहात होता. एका तपापूर्वी या बाईवर आपण कां फिदा होतों हें त्याला आत्तां कळलं. मुक्तेच्या, विचारांत गढून गेलेल्या चर्येकडे तो टक लावून पाहूं लागला—

तें सरळ नाक, तें भव्य कपाळ, तो पिअर्स साबणासारखा तुकतुकीत केशसंभार, ब्रँडीच्या रंगासारखे ओंठ, जाईजुई या फुलांना लाजवील असा शुभ्र आणि नाजुक गळा आणि बोलतांना मधूनच बेफिकीरपणाचं आव्हान म्हणून मानेला नाजुक झटका द्यायची ती गोड लकब—!

पण सांगावं का हिला?

नको. इतक्यांतच नको! वेळ येईल तेव्हां पहातां येईल.

- ती वेळ त्या दिवशीं रात्रीं आली नाहीं.

-परंतु दुसऱ्या दिवशीं सकाळीं तिच्या मस्तकावर वज्राघात झाला! बेटर चहाचा रिकामा ट्रे घेऊन गेल्यावर सदानंदानं शांतपणीं डब्यांतील सिगारेट काढून पेटवली आणि प्राय लांब करीत तो म्हणाला, "मुक्ता, तुला कसं सांगावं हेंच मला कळेनासं झालंय!"

"कांहीं सांगूं नका. रात्रभर बाहेर मुसळधार पाऊस पडत होता. झोंप आली नाहीं मला. आणि आपण मात्र डाराडूर—"

सदानंदानं अर्धवट ओढलेली सिगारेट ॲश-ट्रेमध्यें टाकून दिली. विमनस्क मनानं तो जागचा उठला आणि खिडकीशीं उभा राहिला.

"तुला वाईट वाटेल. तूं रागावशील—पण मला आज संध्याकाळीं चार वाजतां मुंबई सोडून जावं लागणार आहे—"

मुक्ता अवखळपणानं म्हणाली, "आली पुन्हा चेष्टेची लहर?"

"चेष्टा नाहीं. लष्करी हुकूम म्हणजे चेष्टा नसते."

सदानंदाची गंभीर मुद्रा. त्याचा अर्धस्फुट आवाज आणि त्याच्या हातांचा कांपरेपणा पाहून मात्र मुक्ताचं हंसणं थांबलं.

"काय म्हणालांत?"

"गुरुवारीं सकाळीं सिंहगडाहून परत आलों तेव्हांच हुकूम माझ्या हातांत पडला होता. पण तूं येशील म्हणून मी इथल्या अधिकाऱ्यांना भेटून चार दिवस मागून घेतले—"

मुक्ता बोलत नाहीं असं पाहून तो पुढें म्हणाला, "गुरुवारीं गाडीनं जायच्याऐवजीं विमानानं आज जावं असं मीं ठरवलं. आज संध्याकाळीं चार वाजतां विमानानं मला गेलंच पाहिजे—"

मुक्ताच्या तोंडून केविलवाणा आवाज बाहेर पडला, "पण कां?"

"काश्मीरला जाण्यासाठीं उद्यां सकाळीं दिल्लीहून निघायचा हुकूम आला आहे. यापेक्षा जास्त माहिती मला नाहीं."

"पण तुम्ही त्यांना अं—हें—हें—ही अशी चार साकिन्तीत का?" चाबकाचा फटकारा बसावा, त्या वेदनेनं व्याकुळ झाल्यागत मुक्ता कळवळून म्हणाली.

"त्यांना पटवून देण्यासाठींच मी तुला एकटीला सोडून त्यांच्या भेटीसाठीं दोन दिवस जातयेत होतों. मुक्ता, माझा नाइलाज आहे. मला क्षमा कर—"

हतबुद्ध होऊन मनांतल्या मनांत मुक्ता म्हणाली, 'मुक्ता, माझा नाइलाज आहे. मला क्षमा कर!'

तुम्हाला क्षमा करणं भाग आहे मला! पण मला आतां कुणी क्षमा करील का? दोन मुलांची आई मी! नवऱ्याच्या घरांतून चोरासारखी पळून आलें! पुन्हा त्या माणसाचं तोंड पाहणं नाहीं या उमेदीनं घराबाहेर पडलें! तुमच्या आशेवर हें भयंकर दिव्य मी केलं. लाख बायकांत अपवाद झालें. मंगळसूत्र देखील वाटेंत तोडून, फेंकून दिलं—आणि तुम्ही आतां मला म्हणतां, 'मला क्षमा कर!'

विचारांच्या गंभीरपणामुळं तिची छाती जोर-

जोरानं उद्वं लागली श्वास जोगानं येऊं लागला. कपाळावर कुणीतरी घणानं टोले मारावे असं तिला वाटूं लागलं. आपल्या हृदयाचीहि तिला क्षणभरं शंका आली. इतक्या बेफाम वेगानं धडधडण्यामुळं त्याचं स्फुरण न होऊन मधेंच तें बंद तर पडाचं नाहीं ना?

तिला वाटलं, सदानंदाला एकदां धरून चांगला गदगदां हलवावा आणि ओरडून त्याला विचारावं कीं, निर्दया, नेग माझा कां असा छळ कापलास? कां मला मोहांत पाडलंस? भयंकर विचारांनी तिच्या डोक्यांत थैमान मांडलं.

ज्या खुर्चीचा आधार तिनं घेतला होता ती खुर्ची त्याच्यावर फेकून मारावी; नाहीं, त्या खुर्चीचा आपटून आपटून चक्काचूर करावा. कांहीं तरी हातांत घ्यावं अन् कुणाला तरी फेकून मारावं, रक्त निघेपर्यंत बोचकारे काढावेत, चावावं, आरडावं, ओरडावं; साऱ्या मुंबईला ऐकूं जाईल अशा मोठ्या आवाजानं रडावं, उंचावरून खालीं फरशीवर उडी टाकावी. कांहींतरी विलक्षण करावं असं तिला होऊन गेलं.

—पण तिनं कांहीं केलं नाहीं.

—आपली असहायता स्पष्ट दिसून येतांच ती गुडघ्यांत मान घालून स्फुंदून स्फुंदून रडूं लागली.

'क्षमा कर?'—रडता रडतां ती मनाशींच कडवटपणानं विचार करूं लागली—क्षमा कर काय? करतें. अगदीं आनंदानं क्षमा करतें. तुला क्षमा करूं नको तर काय करूं?

दातांनीं खालचा ओठ करकचून आवळल्या-मुळें तिच्या ओठांतून लाल रक्त बाहेर आलं. गालांवरून गळलेले कढत अश्रू त्या रक्तांत मिसळले.

मुक्ता रडण्याची थांबली. डोळ्यांतला ओलावा आटला तरी तिचं दुःख थोडेंच पुसलं जाणार होतं?

तिनं वर मान करून पाहिलं. सदानंद हातां-तली काड्यांची पेटी कोपऱ्यांत भिरकावून देऊन तिच्या दिशेनं दोन पावलं पुढं सरकला.

"मुक्ता, मुक्ता" विद्ध कंठानं तो म्हणाला.

मुक्तानं शून्य दृष्टीनं त्याच्या तोंडाकडे पाहिलं. आणि लगेच तोंड गुडघ्यांत लपवलं. सदानंदानं हलकेच तिच्या पाठीवर हात ठेवला—

या क्षणापर्यंत तो स्पर्श तिला सुखाचं परम-निधान वाटला होता. पण आतां सर्पाच्या अंगा-सारखा गार आणि विषारी भासला! पण तिनं हात झिडकारला नाहीं किंवा अंग चोरूनहि घेतलं नाहीं. तिची सारी संवेदनशक्ति बधिर झाली होती.

क्षणभरानं ती खुर्चीवरून उठली, बाथ-रूमच्या दिशेनं पुढें सरकली.

"कुठं चाललीस?" घाबरून तो म्हणाला.

त्याच्याकडे वळून देखील न पाहतां, 'आलें' म्हणून ती म्हणाली आणि दृष्टिआड झाली. सदानंद बाथरूमच्या दाराकडे पहात उभा राहिला.

फार वेळ त्याला वाट पहावी लागली नाहीं. सुमारें दहा मिनिटांनीं मुक्ता बाहेर आली. पण आंत गेलेली मुक्ता आणि बाहेर आलेली मुक्ता यांच्यांत जमीनअस्मानाचं अंतर होतं. मुक्तानं तोंड स्वच्छ केलं होतं. कपाळाचं कुंकू नीट केलं होतं. तिचे डोळे रडवे नव्हते. तिच्या मुखावर हास्याचं चांदणं उतास आलेलं दिसत होतं. यावेळीं बाहेर आलेली मुक्ता दुसरी कुणी बाई असावी!

ती सरळ सदानंदाच्याजवळ, अगदीं जवळ आली. तिला खेटून उभी राहिली—आणि लडिवाळपणानं त्याच्या हाताला झोंका देऊन म्हणाली, "किती वाजतां तुम्हांला निघायचं आहे?"

पण सदानंदानं तिच्या प्रश्नाचं उत्तर न देतां आपला हात सोडवून घेत म्हटलं,—

"माझ्या तोंडावर थुंकावंसं वाटत नाहीं तुला?"

"जेवलेल्या ताटांत खरकटे हात धुण्याइतकं तें सोपं नाहीं. पण आतां बोलत बसून वेळ नाहीं का जायचा?"

सदानंदाचे ... आनंदानं लुकाकल्याचा तिला भास झाला. हृदयाच्या खोल खोल कपारींतून वर उसळी मारूं पाहणारा दुःखाचा कढ तिनं प्रयासानं गिळून टाकला. आणि फुलपाखराच्या आनंदानं ती म्हणाली, "आतां संध्याकाळपर्यंत ... एक क्षणसुद्धां तुम्हांला सोडणार नाहीं. तुमच्या बॅगा मी भरून देईन. मधेंमधें लुडबुडलांत तर मी रागवेन हं! मी सगळी आंवराआंवर करीन. तुम्ही इथं बसून राह्यचं. नुसतं पाह्यचं माझ्याकडे! हंसतां काय?"

आणि ती स्वतःच हंसूं लागली!

मुक्ताच्या मनांत तरी काय होतं?

आला क्षण थांबत नाहीं. गेला क्षण परत येत नाहीं! पुढं पुढं सरकणं हा काळाचा धर्म आहे.

मुक्तानं हें अचूक ओळखलं. आपण कितीहि आकस्ताळीपणा केला, कितीहि रडलों, आरडलों ओरडलों तरी सदानंदाला आपण मागें ओढूं शकत नाहीं हें तिला स्पष्टपणें कळून चुकलं. त्याला ओढू पहाणं मूर्खपणाचं आहे. कापराची वडी उडून जाणारच! मग शेवटच्या क्षणाला त्याच्या सुवासाला तरी कां मुकावं? शेवटची गोड स्मृति गढूळ करण्यांत काय हाशील आहे?

...गाडी अंधारांत रस्ता कापीत चालली होती. वाहकांच्या तिसऱ्या वर्गाच्या डब्यांत मुक्ता खिडकीशीं बसून बाहेरच्या अंधाराकडे डोळे फाडफाडून पहात होती.

मुक्तानं दिव्याच्या उजेडांत मनगटाखालच्या घड्याळांत पाहिलं. साडेबारा वाजून पांचसात मिनिटं झालीं होतीं.

आपण कुठं आलों आहोंत याची तिला कल्पना नव्हती. कल्पना करून घेण्याचीहि पण तिला इच्छा झाली नाहीं. आपण कुठं निघालों आहों याचीहि तिला पर्वा वाटली नाहीं.

गार वारा झोंबूं लागला म्हणून तिनं खिडकीची कांच लावून घेतली. त्या कांचेवर मस्तक ठेवलं, डोळे मिटले, आणि—

आणि मघांशीं संध्याकाळीं विमानतळावर उभा असलेला सदानंद तिला समोर दिसला.

विमानाचे पंखे प्रचंड वेगानं फिरूं लागले. मोठ्यानं ओरडून बोलल्याशिवाय ऐकूं जाण्याची शक्यता नव्हती. कानठळ्या बसतील इतका मोठा आवाज आसंमताच्या हवेवर आदळूं लागला—

सदानंदाच्याबरोबर सात आठ लष्करी अधिकारी जाणार होते. सर्वजण आंत जाऊन बसले. विमानाचा जिना काढून घेण्याची वेळ झाली. सदानंदानं नजरेनंच मुक्ताचा निरोप घेतला, जिना काढून घेण्यासाठीं नोकर पुढें झाले—इतक्यांत मुक्ता एका नोकराला बाजूला ढकलून त्या जिन्यावर चढून गेली. सदानंद अजून दारांतच उभा होता. त्याच्याजवळ ती आली—आणि सदानंदाला तिनं तोंड वांकविण्याविषयीं खूण केली.

सर्वांच्या देखत तिनं बेदरकारपणानं त्याच्या गळ्यांत मिठी मारली आणि त्याच्या ओठांचं दीर्घ चुंबन घेतलं—कुणालाहि ... दिसलं नाहीं.

ड्रायव्हर नवरा मिळाला म्हणजे त्याच्या बायकोची किती कठीण अवस्था होते हें ... त्या सर्वांना संवय होती

ती जड पावलांनीं उतरून गेली. विमानाचं दार बंद झालं—विमान हळूहळू पुढें सरकूं लागलं आणि थोड्या अंतरावर जाऊन त्यानं हवेंत झेप घेतली. त्या वेळेसरशीं आपले प्राणहि

गेले असते तर ? असला चमत्कारिक विचार तिच्या डोक्यांत चमकून गेला.

तिला हॉटेलकडे परत नेणारी मोटार नेरीबंदरवर स्टेशनजवळ आली तेव्हां साडेसहा वाजून गेले होते.

मुक्ताच्या डोक्यांत एक विचार येऊन तिनं ड्रायव्हरला तिथंच तिला सोडून द्यायला सांगितलं ! हॉटेलांत परत जायला तिचं मन घेईना. पण कपड्यांची बॅग ? त्या कपड्यांची तिला मातब्बरी वाटली नाहीं. कुणांहि ते घेतले, कुणालाहि ते वापरायला मिळाले तरी तिला चिंता नव्हती. तिच्या हातात तिची पर्स होती. तिच्यांत पैसे होते.

चालत चालतां ती तिकिटाच्या खिडकीशीं थबकली.

" पुणें, " म्हणून ती सहज बोलून गेली. दहाच्या नोटेंतून उरलेले पैसे तिनं उचलून घेतले नाहीं. ती तशीच धक्के खात प्लॅटफॉर्मवर आली.

आसपास कुठं तरी इंजिन केकाटलं, त्यासरशीं दचकून ती भानावर आली. हातातलं तिकीट पाहून तिला आश्चर्य वाटलं. हें कुणी दिलं ? अन् कां दिलं ? हें घेऊन मी करूं काय ? डोळ्यांसमोरच बायकांचा डबा होता. ती आंत जाऊन बसली. आपण काय करतों आहों, कुठं चाललों आहों, याचा विचार करणं तिच्या शक्तीबाहेरचं काम होतं. आपण कोणत्या गाडींत बसलों याची तिनं चौकशी केली नाहीं. पर्समध्ये टाकलेलं तिकीट कोणत्या गांवाचं आहे याचीहि तिला विस्मृति पडली. तें बाहेर काढून पाहणं तिला नको वाटलं.

—गाडी एका स्टेशनावरून निघाली.

स्टेशनचे दिवे तिनं कांचेंतून पाहिले.

कोणतं का स्टेशन असे ना !

तिनं पुन्हा डोळे मिटून घेतले.

अजून तिच्या मनाचा निश्चय होईना. कुठें जावं ? काय करावं ?

घरीं परत जाण्याचा मार्ग तिनं स्वतःच्या हातानं बंद करून घेतला होता ! आज सकाळीं पंत खळ्यावरून परत येणार ! छेः ! काकी दोन दिवसांपूर्वींच परतल्या असतील. घाबरून त्यांनीं खळ्यावर निरोप पाठवला असेल. पंत मुलांना घेऊन यापूर्वींच परत आले असतील.

घरांत, गांवांत ज्याच्यात्याच्या तोंडीं झालं असेल. गांवांतलं कुत्रंदेखील मला पाहतांच त्वेषानं भुंकायला लागेल !

कुठं गेलें होतें मी त्यांना काय सांगूं ? लोकांच्या जिभांना कसा आंवर घालूं ?

बिचाऱ्या आंधळ्या काकी ! माझं रूप पाहण्यासाठीं देवाकडे दृष्टीची याचना करीत होत्या. माझं हें थोबाड पाहण्यापेक्षां दृष्टीच्या खांचा आहेत त्याच चांगल्या असं त्यांना वाटल्यावांचून राहील काय ?

मुलं आज लहान आहेत. उद्यां मोठीं होतील. त्यांच्यापुढं त्यांची आई म्हणून उभं राहण्याची मला लाज वाटल्याशिवाय राहील ?

आईलाहि कळलं असेल ? शंकाच नको. सुप्रसिद्धीच्या दसपट वेगानं दुष्कीर्ति पसरते. कस्तुरीचा वास मर्यादित जागेंत दरवळतो. पण कुजट दर्प मैलावरून देखील डोकं उठवून सोडतो आईच्या घरीं तरी मी कशी जाऊं ?

मला राहयला घर नाहीं. मी कुणाची कुणी लागत नाहीं. मग मी जगूं तरी कशाला ? या भयंकर विचारासरशीं तिनं भयभीत होऊन डोळे उघडले. मरणाचा विचार भयानक वाटला तिला !

पण मग जगण्यांत तरी आतां काय अर्थ उरला होता ? मिळायचं तें मिळालं, गमवायचं तें गमावलं !

मुक्ताच्या मनांत कडवट विचार चमकून गेला. पुरुषांचा भरंवसा नाहीं. हजारों वर्षां-पूर्वींचा पुरुष, आजचा पुरुष आणि यानंतर हजार वर्षांनीं जन्माला येणारा पुरुष, तिन्ही त्रिकाळीं पुरुष एकाच रंगाचा, एकाच गुणाचा ! जी स्त्री त्याच्यावर विसंबून राहील ती उघड्या-वर पडेल !

—रुळावरून आपटतांना होणारा चाकांचा लयबद्ध आवाज तिला ऐकूं येत होता. त्या तंद्रींत ती गुंग झाली, त्या आवाजाची तिला मौज वाटूं लागली, आणि एकाएकीं त्या आवाजांतून शब्द उमटले,

'मुक्ता, तूं कुठं जाणार ? मुक्ता, तूं कुठं जाणार ? मुक्ता—'

सांध्यावरून गाडी खडखडाट करीत धांवत होती.

मुक्तानं दोन्ही हातांनीं डोकं घट्ट दाबून धरलं.

चाकांतून उमटणारा प्रश्न तिनं हजार वेळां स्वतःला विचारला ! पण तिला त्याचं उत्तर सांपडेना ! उत्तर सोपं नव्हतं !

———



—ही एका अतृप्त हृदयाची कहाणी आहे. ही एका अजाण पण हळव्या मनाची जीवन-कथा आहे. रूढी, परंपरा, कर्तव्य आणि नीति यांविरुद्ध निसर्गानं पुकारलेलं हें एक बंड आहे. अनादिकालापासून अनंत काळापासून पडून राहिलेली नाजूक समस्या सोडविणारें, हें एक गुलाबी कोडें आहे! थोडक्यांत ही एका भोळ्या भावड्या अभिसारिकेची गोष्ट आहे!

—पौर्णिमेची रात्र आहे आज. आणि माथ्यावरून चंद्र ढळण्याआंत तिला त्या संकेत-स्थळीं जाऊन पोंहचायचें आहे. आपल्यासाठीं प्राणाची कुरवंडी करणाऱ्या प्रियकराची गांठ घ्यावयाची आहे. त्याच्या कानांत एका अतृप्त सुखाचें स्वप्न सांगावयासाठीं तिला जावयाचें आहे. म्हणूनच ती अशा अवेळीं अधीर मनानें, आतुर हृदयानें आणि धुंद नजरेनें सुवर्णाचा एक उंबरठा ओलांडून दुसऱ्या चंदनाच्या उंबरठ्यांत पाऊल टाकायला ती निघाली आहे!

—पायाखालची वाट तिच्या परिचयाची नाहीं. कुठें जायचें हें तिला माहीत आहे. पण कसें जायचें हें तिला ठाऊक नाहीं.

—प्रेमळ वाटसरा, तिला तूं ती वाट दाखवशील का? [illegible] पूर्वी एक वाट होती पण तिथं आज वणवा धडधडतो आहे; किंवा तो एक पूल ओलांडला कीं तिथं पोहचतां येईल पण तो महापुरानं ढासळला आहे. पलिकडे नदींतून जायला वाट होती पण तिथं आतां भोंवरा पडला आहे. नदीच्या उजव्या अंगानें थोडेसे आडवळण घेऊन जावें म्हटलें तर तो कडा वाट अडवतो आहे.

—रसिक पांथस्था, त्या संकेतस्थळीं जाण्यासाठीं आतां एकच वाट राहिली आहे—या अभिसारिकेवर कृपा कर आणि तिला ती एकुलती एक वाट दाखव!—आणि मगच हा खालचा लेख वाच.

# याला म्हणतात प्रेम!—

—गणेश वि. नांबे
Stud. B.I.C.T. (London)

"तुझ्या प्रीतीची रीत लई न्यारी" असले कुठल्याशा भावगीताचे चरण रामराव पवार आमच्या शेजारच्या खोलींत मोठ्यानेंच पण स्वगत गुणगुणत होते. त्याच्या अर्थाकडे त्याचें लक्ष होतें कीं नाही कोण जाणें? पण माझ्या मनांत मात्र अनंत विचार लहरी उमळल्या. कारण हेच रामराव अगदीं परवांपर्यंत, म्हणजे मुंबईंत दारूबंदी होईपर्यंत, आठवड्यांतून बहुधा तीन चार दिवस तरी गांवठी सोमरसाचें आकंठ पान करून रात्रीं घरीं येत नी आपल्या "आवडत्या" घरधनीणीस तिच्या मातापितरांची ग्राम्य शब्दांत आठवण करून देऊन तिच्या पाठीचें धिरडें करीत असत हें मी पाहिलें होतें. तीहि बिचारी गरीब गाय, पतिदेवाची ही प्रणयाराधना त्यांच्या इतर वेळच्या "गोड" शब्दावर भाळून मुकाट्यानें सहन करीत असे. ही त्यांच्या प्रीतीची न्यारी रीत मी प्रत्यक्ष पाहिलेली होती. आणि म्हणूनच आज माझें लक्ष सहजच रामराव पवार गुणगुणत असलेल्या गाण्याकडे वेधलें.

प्रीती म्हणजे काय नी तिची रीत कोणची? माझ्यापुढें मोठीं प्रश्नचिन्हें उभीं राहिलीं. प्रेमाच्या व्याख्या आजवर अनेक शास्त्रज्ञां-तत्वज्ञान्यांपासून तो शरीरशास्त्र व मानसशास्त्र जाणणाऱ्यांपर्यंत सर्वांनींच आपापल्या परीनें बिनचूक म्हणून केलेल्या आहेत. निरनिराळ्या कवींनीं तर त्यावर अमर काव्यें रचिलीं आहेत. कुणी प्रेमाला परमेश्वर मानतो तर कुणी त्याला मायावी चेटकी ठरवितो. भौतिकवादी शरीरशास्त्रज्ञ, हाताला स्पर्शता येईल नी चर्मचक्षूंना दिसेल त्याचेंच अस्तित्व मानणारे असल्यानें, पार्थीव शरीराची चिरफाड अत्यंत बारकाईनें करूनहि त्यांना त्यांतील मनाचा पत्ता लागला नाहीं. पण त्याच बरोबर त्यांना त्याचें अस्तित्व अमान्यहि करतां आलें नाहीं. प्रेमाचें बीजस्थान तर मन. मनाचें आणि प्रेमाचें स्वरूप समजत नाहीं पण परिणाम मात्र सांगता येतात असें हें विलक्षण कोडें आहे.

प्रीतीचा सामान्य व्यवहारांतील अर्थ, स्त्री-पुरुषांतील परस्परांबद्दल वाटणारें लैंगिक आकर्षण हाच आहे. कोणत्याहि भाषेंत कसल्याहि बऱ्या वाईट शब्दांत तिची अभिव्यक्ति केली तरी तिचें अभिप्रेत एकच आणि तें म्हणजे लैंगिक मीलन व त्यापासून होणारी सुखप्राप्ति.

मानवी जीवनांत भूक आणि प्रेम यांचेंच वर्चस्व सर्वांत अधिक असतें असें शिलरचें म्हणणें आहे. सध्यां सर्वत्र अणुशक्तीच्या गोष्टी बोलल्या जात आहेत. परंतु ते अणु देखील प्रेम

किंवा द्वेष ... भावनांनीं परस्परांकडे आकृष्ट होतात किंवा दूर जातात असें बुक्नेर या कट्टया भौतिकवाद्यानें म्हटलें आहे. ऑक्सिजन वायू हैड्रोजन वायूमध्यें मिसळून त्यापासून पाण्याची उत्पत्ति होते; त्यांच्या मीलनास एका जर्मन तत्त्वज्ञान्यानें स्त्रीपुरुष संयोगाचीच उपमा दिली आहे. द्वेषाचें स्वरूप पहावयाचें असल्यास पोटॅशियम व फॉस्फरस या द्रव्यांकडे पहावें. या दोन द्रव्यांचें ऑक्सिजन वायूशीं इतकें वाकडें आहे कीं तीं पाण्यांतहि एकत्र आलीं असतां जळूं लागतात. अशा प्रकारच्या आकर्षणावरच साऱ्या विश्वाची उभारणी झालेली आहे.

**एक गैरसमज**

स्त्री पुरुष किंवा नर-मादी यांच्या मधील आकर्षणाचें आपण अनेक मृदु व गोड विशेषणें लावून वर्णन करतों. प्रेम आणि मृदु भावना यांचें साहचर्य अविभाज्य आहे असे मानण्यांत येतें पण तें तसें आहे काय?

पशुसृष्टींतील ... मधील लैंगिक प्रेरणांचा संबंध प्रणय भावनेशींच असतो असें नाहीं. उलट क्रौर्य, कठोरता आणि परपीडादर्शनाशींच त्याचें अधिक साहचर्य आहे कीं काय असें वाटूं लागतें. प्रेम किंवा द्वेष, दया किंवा क्रौर्य यांचा सृष्टींतील सजीव प्राण्यांशीं संबंध एकाद्या रासायनिक क्रियेप्रतिक्रियेसारखा आहे. मूलतः अन्य व्यक्तीला होणाऱ्या यातनां पाहून मनुष्यप्राण्याला दुःख किंवा सुख कसलीच अनभूति होत नसते. त्यांत तो एक प्रकारच्या तटस्थतेचें सुख अनुभवीत असतो इतकेंच.

समागमासारख्या अत्युत्कट सुखाची अनुभूति देणाऱ्या मादीशीं कांहीं कारणावरून भांडण झाल्यास सिंहासारखा हिंस्र प्राणी तिला नुस्ते ठारच करीत नाहीं तर तिचा अक्षरशः चट्टामट्टाहि उडवितो असें तज्ञांचें म्हणणें आहे. जखमी झालेल्या एका छोट्या चिचुन्द्रीच्या वाघिणीचा मागील अर्धा भाग तिच्या "प्रियकरा"नें खरोखरीच खाऊन टाकलेला पाहण्यांत आला आहे. न्यूयॉर्कच्या प्राणिसंग्रहालयांतील एक सत्यकथा उपर्युक्त सिद्धांतावर प्रकाश पाडणारी आहे. परस्पराशेजारी पण भिन्नभिन्न पिंजऱ्यांत ठेवलेली एक मोठ्या रानमांजराची जोडी होती त्यापैकीं नरानें मादीबद्दल विलक्षण प्रेमाविर्भाव दाखविण्यास सुरवात केली. गजांतून बाहेर येणारे मादीचे पंजे नर मोठ्या प्रेमानें चाटी. हे सर्व प्रकार पाहून रक्षकांस त्यांना एकत्र येऊं देण्याची इच्छा झाली. पण काय आश्चर्य, नर मादीच्या पिंजऱ्यांत गेल्यावर त्याची पूर्वीची तथाकथित "प्रीति" एकाएकीं क्षणार्धांत नष्ट झाली व लांडग्यानें कोंकरावर झडप मारावी तशी झडप मारून त्यानें तिच्या नरडीचा घोंट घेतला आणि तिला यमसदनास पाठविलें. त्या प्रीतिकथेचा शेवट असा झाला.

**दुसरी भूक**

लैंगिक आकर्षणाला दुसरी "भूक" अशी संज्ञा देण्यांत आलेली आहे. त्यांत खऱ्या प्रीतीच्या मार्दवापेक्षां हिंस्रताच अधिक आहे असें म्हणणें भाग आहे. जीवसृष्टीच्या तुडाशीं शोध करीत गेलें असतां नराच्या शरीरांतील पेशी मादीच्या पेशीवर जगण्यासाठीं धडपडत असतांत असें दिसून येतें. स्वतःचें स्वास्थ सुधारणें ही त्याची मूलभूत भावना असावी. प्राचीन मानवी जीवनांतहि मादीला खरोखरीच नराची सदैव



## मध्यान्हवेळीं—

[illegible]वेळीं
असाच एकदां
कामासाठीं कांहीं
घाईघाईनेंच
होतों मी जात;
समोरच्या त्यों
लालट वाटेनें
भपकन् आला
तांडा गुरांचा…
रस्ताहि व्यापून
खाटीकखान्याची
वाट चालणारा—
धुंद लगबगीनें
पुढें सरणारा
गुरांचा ओघ !

शिंगेंच सारीं…
कांहीं उंच रुंद,
कांहीं [illegible]खूडशीं
कांहीं टोकदार !
कांहीं सुने गळे
दोरखंडानेंच
जखडलेले
कोठें एकत्र !—

अजून संथ
रवंथणारीं
कांहीं ओलीं तोंडें—
अजून हकूच
कडेचें गवत
न्याहाळणारे
ओढाळ डोळे—
चाललेच होते
सरकत अन्
सरकवीत
सर्वांचे पाय

पायांच्या खुरांनीं
वर उधळली
जात होती वरें
लालशी धूळ—
-ग्राम वेशींतल्या
त्या वाटेंत पाहिला
'सांधुळी' परीच
लालशी धूळ
जेव्हां,
तृणाचा गोडवा
आणीत ओठांशीं
वत्साच्या ओढीनें
धूम धांवणारीं
'परतलीं घरां गुरें'……
-धुळींच्या लोटांच्या
वावटळींत त्या
कोंदाटले डोळे…
स्तब्धावला श्वास…

अन्…

कुठें भिरभिरणारें
ब्लेडचें पातें
मनाला कापीत गेलें
[illegible]दिशीं !

—वि. म. कुलकर्णी

---

संगति आवडत होती असें आढळत नाहीं. परंतु [illegible]त्यासाटीं त्यांचा संयोग आवश्यक असल्यानें गर्भधारणेपुरतेंच एकत्र येऊन माद्या, नरांचा द्वेष करीत, पुन्हां दूर होतात असें पाहावयास मिळतें.

तेव्हां नर काय किंवा मादी काय दोहोंमधील लैंगिक आकर्षण अथवा "प्रेम" याच्या मुळाशीं एक प्रकारची क्रूर वृत्तीच [illegible] करीत असते. दुसऱ्याला पीडा देण्यांत पहिल्याला अंतर्यामीं आनंद होत असतो. मानवी प्राण्यांचें मीलन आपणास सहज पहावयास [illegible]त नाहीं व शास्त्रीय माहितीच्या शोधार्थ कोणी त्याबद्दल चौकशी चालविली तर त्याला सत्यकथनच मिळेल असेंहि नाहीं; त्यामुळें त्यांबाबतींत निश्चित सिद्धांत मांडता आला नाहीं तरी प्राणिसृष्टींतील निरीक्षणावरून आपल्यास योग्य तो बोध घेतां येतो.

समागमापूर्वी कित्येक जनावरांचें चाललेलें प्रणयाराधन व त्यांची परिपूर्ति पहाण्यासारखी असते. नर मादीला पकडून, तिला चावून, ओरबाडून, घायाळ करतो आणि मादीहि त्याचा प्रतिकार करतांना त्याच अस्त्रांचा तितक्याच आवेगानें उपयोग करते. अशा देहविव्हळ धावपळींत त्यांचा समागम होतो. आणि वासनापूर्तीनंतर दोघेहि रणक्षेत्रावरून परतलेल्या जखमी वीराप्रमाणे घायाळ होऊन एकमेकांपासून दूर जाऊन बसतात. [illegible] तंतूचे 'घर' बांधणाऱ्या कोळ्यांची मादी समागमानंतर प्रियकराचा प्राण घेते किंवा त्यास अक्षरशः आत्मसात् करून टाकते. कांहीं प्राणी या प्रणययुद्धांत हातपायहि गमावून बसतात. सस्तन प्राण्यांपैकी बहुतेक, अशा प्रसंगीं एकमेकाला कडकडून चावे घेतात. गर्दभाचें उदाहरण सुप्रसिद्धच आहे. नर मादीला कडकडून डसतो तर मादी, प्रियकराच्या मुखकमलावर [illegible] मारून त्या मुखकमलाचा "कृपाप्रसाद" त्याच्या नाकांतून रक्त वाहीपर्यंत देत असते.

### अत्युत्कट सुखदुःखांचा समन्वय

उंटाच्या बाबतींत समागमपूर्तीनंतर मादी नरास इतक्या वेगानें डसते कीं तो घाबरून तिथून पळूनच जातो. रानमांजरांचा प्रीतिसंगम तर तनरप्रसंगासहि मागें टाकणारा आहे. अत्युत्कट सुखानुभूतीचे प्रसंगीं प्रतिपक्षास कांही तरी इजा करावी अशी भावना मनुष्येतरांत असते पण माणसांत देखील ती [illegible] प्रमाणांत वास करीत असते. या अनुभवांत मनाचे तर अनेकदां रक्तबंबाळ होतात. प्रथम प्रसंग वगळल्यास मानवाचे सामान्यतः तसें होत नाहीं.

समागमानंतर मादी पुष्कळदां अत्यंत क्रोधानें

नुरफ्यासून दूर पळून जातें तेव्हां त्यांत कोणतीहि शालीनता असते किंवा लज्जेची भाग असतो असें नाहीं. तर उलट एकमेकांबद्दल वासनापूर्तीनंतर वाटणारी भीति हेंच कारण असते. प्रेमाचा बहर उतू गेल्यानंतर आपली प्रियकर आपली काय काय विटंबना करील याची मादीला एक प्रकारची धास्ती वाटत असते.

तेव्हां लैंगिक आकर्षणाचें अंतिम उद्दिष्ट जे शरीरसंबंध त्याचें स्वरूप हें असें असून क्रौर्य हा प्रेमाचा निश्चित स्थायीभाव आहे. मानवी मनांतहि त्याची वास अनादि काळापासून चालत आलेला आहे.

उत्क्रांतीच्या तत्त्वानुसार मानवांत अनेकविध सुधारणा झाल्या व बदल होत गेले. मानवाच्या कित्येक संवयी बदलल्या पण या लैंगिक क्षेत्रांत मात्र प्रेम नी क्रौर्य यांचें साहचर्य अद्यापीहि नष्ट झालेलें नाहीं व होईलसें संभवतहि नाहीं.

## चुंबनाची मीमांसा

आधुनिक मानवी समाजांत कांहीं प्रदेश वगळल्यास बहुतेक ठिकाणीं चुंबन हें प्रेमाविष्काराचें साधन मानण्यांत येतें. अर्थात् हें स्त्री-पुरुषांचें प्रेम वैषयिकच असेल असें मात्र नाहीं. मायलेक, बापलेक, बंधुभगिनी, मित्र-मैत्रिणी यापैकीं कोणत्याहि नात्यानें चुंबनें घेतलीं जातात. पौर्वात्य देशांत हा प्रकार कांहींसा मर्यादित आहे इतकेंच. लहान मुलाला बहुधा सर्वत्र मोठीं माणसें आपल्या प्रेमाचा वर्षाव करतांना चुंबनांनीं गुदमरून टाकतात ही नित्य पहाण्यांतील गोष्ट आहे.

चुंबन हें प्रेमाविष्काराचें एक स्वरूप आहे असें कामशास्त्रज्ञांचें म्हणणें आहे. अनेकदां भावनोत्कटतेमुळें मृदु आणि ऊष्ण ओष्ठयुगलांच्या मिलनाऐवजीं दातांचा असह्य दंश मात्र सोसण्याचा प्रसंग येतो. अशा संगमाचें वेळीं.

पाश्चात्यांत एकेकाळीं कित्येक स्त्रिया आपल्या प्रियकराच्या प्रेमाचा पुरावा म्हणून हे दंतव्रण मोठ्या अभिमानानें मिरवीत असत

ट्रान्स कॉकेशियामधील वाङ्निश्चयाची पद्धति मोठी गमतीची सांगतात. संबंधित वरानें वधूच्या स्तनाग्राचा साध्या चुंबनाऐवजीं दंत-दंश केला म्हणजे वाङ्निश्चय झाला असे मानण्यांत येतें. ईजिप्तमध्यें प्राचीन काळीं प्रियकर आपल्या प्रेमाची उत्कटता व्यक्त करण्यासाटीं आपल्या प्रीतिविषयाचें भक्षण करण्याची इच्छा एक काव्य गाऊन व्यक्त करी, असे इतिहासांत उल्लेख आहेत. अर्थात याचा खरा अर्थ प्रेयसीच्या जर डोक्यांत शिरला तर ती त्याच्या वाऱ्यासहि उभी राहणार नाहीं हें सांगणें नकोच




## क्षण एक पुरे

स्त्रीपुरुषांना परस्परांबद्दल वाटणाऱ्या कित्येक मृदु भावनांचें मूळ केवळ लैंगिक संबंधामध्येंच अथवा लैंगिक आकर्षणामुळेंच असतें असें मात्र नाहीं हें नीट लक्षांत घेतलें पाहिजे. कारण त्या दोहोंतील फरक लक्षांत न आल्यानें फारच घोटाळे निर्माण झालेले आहेत. प्रेम आणि लैंगिक इच्छापूर्ति यांची उत्पत्ति भिन्न आहे. लैंगिक इच्छापूर्ति करणाऱ्या व्यक्तीबद्दलचें प्रेम इच्छापूर्ती होतांच संपुष्टांत येतें. म्हणूनच कदाचित् माणसास एकीवर मनःपूर्वक प्रेम करून दुसरीशीं केवळ शरीरापुरतांच संबंध ठेवावासा वाटतो.

"क्षण एक पुरे प्रेमाचा वर्षाव पुढी मरणाचा" हे काव्योद्गार कै. राम गणेश गडकरी यांनी काढले ते प्रेमाचा आणि मरणाचा हा अन्योन्य संबंध लक्षांत घेऊनच कीं काय असें एखादे वेळीं वाटूं लागतें तें यासाठीच.

## दिवाळीची गोड बातमी

रसिकांस खुषखबर ! भाविकांना शुभवार्ता ! तो येत आहे !

भूमिका :
शशि कपूर ★
विजयलक्ष्मी ★
गुलाब, चंद्रा,
निरंजनशर्मा
मा. परशुराम
रमेश सिंह
आणि
दुर्गा खोटे
★
संगीत दिग्दर्शक : सुधीर फडके
छायालेखक : पांडुरंग नाईक



गोकुळचा ... !

त्याच्या नव्या ... आता ...

# मुरलीवाला

दिग्दर्शक : वसंत पेंटर

संवादलेखक : कवीश
पद्यलेखक : भरतव्यास

प्रांतिक वितरण हक्कासाठीं लिहा :
मधुवाणी चित्र, C/o फेमस पिक्चर्स, रट्टू० कॅडेल रोड, मुंबई २८

फेमस पिक्चर्सकडून
रसिकांस दिवाळीनिमित्त
शुभचिंतन व नूतन वर्षाभिनंदन

"मधुवाणी चित्र"
★
'फेमस' निर्मित



★
लौकरच सादर होणार !

---

## दिवाळी आनंदाची जावो—

आणि ती जाणारच, कारण एका— एका उत्कृष्ट नव्या चित्राची वार्ता !

भस्मासुर मोहिनीच्या सुरम्य आख्यानांत—श्रीमहादेव भोळे सर्व भक्तांना दर्शन देणार !

"वैकुण्ठ चित्र"
फेमस' निर्मित
: भूमिका :
★ प्रेमअदीब
★ विजयलक्ष्मी
शीला नाईक
कमलकुमारी
महीपाल, ... अख्तार
प्रकाश
आणि
साधना बोस
आणि—
मारुती भगवान



दिग्दर्शक : विश्राम बेडेकर
संगीत : बी. सोहल
छाया : सुरेंद्र पै
संवाद : कवीश
पद्ये : भरत व्यास

प्रांतिक वितरण हक्कासाठीं लिहा.
वैकुण्ठ चित्र C/o फेमस ... स्टूडिओ कॅडेल रोड, मुंबई २८

अनुक्रमणिका



# ऐन दिवाळींत

आतां दमून भागून
घरीं ठेवितां पाऊल
तुझ्याविांचून कुणाची
सयं झडेल धांदल ?
पेला चहाचा घेऊन
कोण येईल घाईंत
आणि नादतील घरीं
स्वर्णकंकणं सुरांत ?
रोजचीच वाळपूस...
गोड लटकेंच हांसूं
आतां दिसेल कुणाच्या
डोळां काळजाचें आसूं ?
आज पाहतां खोलींत
धूळ दिसे सांचलेली
मेजावरून ढळले
शेले-शायरनि खालीं
उभी बाजूस पलंग,
रिती चुरलेली सेज;
आज आमवानें तुझ्या
उडे नयनींची नीज
आतां रात्रीं-अपरात्रीं
मस्त झिणझिणे वारा
आणि दिवाळींत तूं
राहिलीस माहेराला !

—शंकर रामाणी



स्वतंत्र भारतांतील सार्वत्रिक निवडणुका लवकरांत लवकर घेणें आवश्यक आहे. कारण त्यामुळे आमच्या पक्षाचें स्थैर्य निर्माण होऊन आजच्या अनिश्चिततेचा शेवट होईल।

